संगथडींत मिळविलेल्या निवडक लावण्या व

पोवाडे यांचा संग्रह सुंदर चितां



---

प्रकाशक

## शंकर तुकाराम शाळिग्राम यांनीं

पुणें येथें

गंगाधर गोविंद गोंधळेकर यांच्या ' भारतभूषण '

छापखान्यांत छापून पुणें येथें प्रसिद्ध केला.

---

सन १९०७ इसवी.

---

किंमत एक रुपाया.





श्री

श्रीमंत रा० रा० खंडेराव चिंतामण, उर्फ तात्यासाहेब
मेहेंदळे, बी. ए. सेकंडक्लास सरदार.

यांची

जुन्या लावण्या आणि पोवाडे प्रसिद्ध होण्याविष-
यींची आस्थापूर्वक सद्‌बुद्धि आणि रसिकता
या लोकोत्तर गुणांवर लुब्ध होऊन ग्रंथ
प्रकाशकानें परम विनयानें ही
कृति त्यांस अर्पण
केली आहे.

# परशराम.

परशराम कवीचा जन्म सोळाशें शकाच्या अखेरीस,शके सोळाशें शहाऐंशीस झाला. आणि मृत्यु शके सत्राशें सहासष्ट ( १७६६ ) श्रावण शुद्ध द्वादशीस म्हणजे सन आठराशें चवेचाळीसांत झाला. मृत्युसमयीं त्यांस नव्वदावें वर्ष लागलें होतें.

गंगथडींत परशरामी लावण्यांची प्रसिद्धि फार आहे. त्या प्रांतीं त्यांचे नांव गाजलें.लावण्या पोवाडे, ह्मणण्यावर परशरामाची प्रसिद्धि फार झाल्यामुळें लोकाश्रयास ते पात्र झाले.राजाश्रयाची त्यांस पर्वा वाटत नव्हती. त्यांनीं पुढें मुलुखगिऱ्याही केल्या. पण गोदातटाकीं परशरामाचा लौकिक फार.

महाराष्ट्रकवींत मोरोपंत जसे शिक्कापदधारी, तसेच शाहिरांत हे परशराम. यांस लावण्या करण्याची सनद मिळाली होती.

परशराम हे वावीचे राहणारे. नाशिकचे पूर्वेस सिन्नर तालुक्यांत वावी हें त्यांचे राहण्याचें गांव. वावी हें गांव राजाची वावी ह्मणून गंगथडींत प्रसिद्ध आहे. साताऱ्याचे आणि कोल्हापुरचे महाराज हे भोसले घराण्यांतील त्यांच्या भाऊबंदांतील भोसले वावीस पूर्वीपासून वास्तव्य करीत आहेत; ह्मणून राजाची वावी असें या गांवास ह्मणतात. हल्लीं तेथें त्यांची पाटिलकी असून तेथील जमीनदार आहेत. जंगली राजाच्या वंशजांचा वावीस वाडा आहे.

परशरामाच्या बोधपर अशा लावण्या ऐकतांना वैराग्य अंगीं संचरतें व देशांतील सांपत्तिक स्थिति, सामाजिक स्थिति चांगली कळते. तशीच ऐतिहासिक माहितीही कळते. पेशवाईंत परशरामाचा जन्म झाला. त्याच्या हयातींत स्वराज्य होतें, त्यामुळें वैभवशाली सरदारांची राहणी, तदनुषंगीं मराठमोळ्याशीं त्यांस चांगली माहिती होती. ह्मणूनच शृंगारपर लावण्या फारच उठाव झाल्या

बायका कल्यान सवतीचा भांडण धरीत कशा होतात, ती लावण्यांतून दाखविली आहेत. पेशवाई नष्ट होऊन इंग्रजी झालेली त्यांनीं पाहिली. या राजक्रांतीमुळें झालेला फरक त्यांनीं बरोबर रेखाटला आहे. क्रांतीमुळें सामाजिक स्थितीवर झालेला परिणाम त्यांनी स्पष्ट करून दाखविला आहे. परशरामांनीं शृंगार रसाच्याही लावण्या केल्या आहेत. त्या तर फारच सुरेख आहेत. त्या रामजोशाप्रमाणें उपदेशपर असून विषयीजनांस बोध होण्याजोग्या आहेत. परशराम भर्तृहरीप्रमाणें विषयविमुख म्हणून वैराग्याचा ठसा वाचकांच्या व ऐकणारांच्या मनांत उभा करण्याची त्यांची शैली अपूर्व आहे.

परशराम हे शिंपी जातीचे. परशरामाचे वडील नावीस राहत असत. त्यांचा धंदा शिंप्यांचा, म्हणून शिंपीपणाचा, कपडे शिवण्याचा धंदा लहानपणीं परशराम शिकले होते. तसेंच लिहावयाला वाचावयाला. बालबोधी लिपी वाचायास शिकले. मोडी त्यांस येत नव्हती. बाळबोध लिहिण्याचा व वाचण्याचा अभ्यास मात्र त्यांना केला होता. त्यावेळचें वाचन म्हणजे ज्ञानदेव, नामदेव आणि तुकारामादि मराठी कवींचे ग्रंथ वाचणें हें होय. अशा प्रकारचें शिक्षण परशरामास चांगलें मिळालें होतें. लहानपणीं त्यांनीं तुकारामाचे अभंग फार वाचले होते. म्हणून त्यांनीं आपल्या कवितेंत तुकारामकृत अभंगांतील निवडक शब्द जागजागी घालून लिहिले सांधिक वाचकांच्या ध्यानांत येतील. परशरामांनीं पूर्व वयांत रामायण, भारत भागवतादि ग्रंथांतील भाषांतरें, रामविजय हरिविजय पांडवप्रतापादि ग्रंथ वाचले, व ऐकले असावेत. पुढें पुढें ते ज्ञानेश्वरी ही वाचीत.

देवपूरकर बाबा भागवत हे परशरामाचे गुरु, भागवतांचा अनुग्रह झाल्यानंतर कांहीं अभंग, पदें करावीत असें परशरामाच्या मनांत आलें, श्रीपांडुरंग हे

रामजोशी पंढरपुरी गेले असतां त्यांनीं पंढरपूर क्षेत्र वर्णन रचलें, तुळजापुरी गेले असतां तुळजापूरवर्णन रचलें, अथवा आनंदफंदी ठाकुरास गेले असतां ठाकुरवर्णन रचलें, तसेंच परशराम कोपरगांवी गेले असतां गोदेचें वर्णन रचलें; नेवाशास गेले असतां मोहनीराजाचें वर्णन रचलें. प्रयागास गेले असतां प्रयागाचें वर्णन रचलें आहे.

परशरामाची राहणी साधी असून मितभाषी, विनयशील, आणि बहुश्रुत होते. त्यातल्या निर्व्यसनी आणि परदाराविन्मुख असे होते. त्यावेळची दरबारी भाषा त्यांस येत होती, रामजोशी आनंदफंदी यांच्याप्रमाणें परशरामानींहि उर्दू भाषेंत लावण्या केल्या आहेत, स्त्री पुरुषांचे विषयसंबंधी मनोगत विचार उठवून देण्याची कला त्यांस अपूर्व साधली होती, बायकांची भाषा, मुलांची भाषा, आजाऱ्याची भाषा त्यांच्या बोलांत घालण्याची तऱ्हा परशरामांनी मोरोपंतांप्रमाणेंच उचलली होती. 'जरी चाहील ते सजणी' ही लेकी सुनांवर त्यांनी लावणी केली आहे. बायकांस म्हणण्याजोगीं गाणीं केलीं आहेत. बीज नाईक भिड, भागुजी नाईक चौकमाळ याचा बाप यावर पोवाडा केला त्यांत "समदा" शब्द घातला आहे. मोठमोठ्या देणग्या मिळविल्या तरी कपडे शिवण्याचा जो शिंपीपणाचा धंदा, तो करून ते योगक्षेम चालवीत. यांचा गौरवर्ण होता व सुस्वरूप देखणे होते. पण सामान्य पोषाखानें ते पण ते साधू पहात ! यांच्या राहणीवरून हे रंगेल असतील असें वाटत नसे. मोठ्या मजलशींत हे साधा पोषाख करीत, वागणूक पवित्र तशी वागणूक करण्यास ते तमासगीरांस उपदेश करीत.

त्या वेळच्या चालीप्रमाणें परशरामानीं तमाशा करण्याची सुरुवात केली. वीणा हातीं घेऊन पडद्याच्या सुंदर जाळींमें कर्णमधुर अशा गोड सुरांत ते लावण्या म्हणत. तमाशांत लावण्या स्वतःच म्हणावयाच्या. गाण्याची तार लागली म्हणजे त्यांच्या लावण्या ऐकण्यास हजारों लोकांचा जमाव जमत असे. नगोरीन खेड्यापाड्यांतूनही यांस तमाशाची बोलावणी येत. परशराम कधीं कधीं डफ वाजवीत असे. बाबा फातमाबाई व मल्हराव हे ब्राह्मण परशरामास बोलीवार

होते. नारायण नाचत होता. असा तमाशाचा जमाव जमविला. परशरामाच्या लावण्या ह्मणण्याच्या तऱ्हेची कल्पना करावयाची असेल तर बापु मराठी चांभारगोंदेकर यांच्या लावण्या ऐकलेले येथें असतील त्यांच्या ध्यानांत ती तऱ्हा येईल. बापु मराठ्यानें परशरामास पाहिलें होतें असें ह्मणतात. परशराम परिस्थिति पाहून तात्काळ लावण्या पोवाडे करीत. चालतां चालतांही लावण्या करीत. अशी त्यांची प्रसिद्धि झाली.

परशरामी लावण्या तालसुरांत ऐकल्या ह्मणजे आनंद होतो. ज्यांनी परशरामाच्या मुखांतून त्या ऐकल्या असतील त्यांची धन्य !

इतकी प्रसिद्धि रामजोशी आणि आनंदफंदी यांच्या लावण्यांचीही झाली असेल असें वाटत नाहीं. त्या वेळच्या शाहिरांत परशरामाचीच प्रसिद्धि सर्वांहून विशेष झाली होती. सामान्य लोक तर परशराम हे अवतारी होऊन गेले असें समजतात. गांवोगांव खेड्यापाड्यांतून परशरामाच्या लावण्या, पोवाडे लोक ह्मणतात. इतकेंच नाहीं तर परशरामी लावण्या पोवाडे उतरून घेऊन त्या वह्या गीताज्ञानेश्वरीप्रमाणें फाटक्या तुटक्या असल्या तरी तें जपून ठेवितात. परशरामी लावण्यांचा पुरजा नाहीं, असें गांव क्वचित्. परशरामी लावण्या ह्मणणारे गांवोगांव आहेत. पुण्यासही परशरामी लावण्यांच्या वह्या आढळतात. त्या वह्या व कागदांचे पुरजे संभाळण्याची यातायात कमी व्हावी ह्मणून आह्मी मिळतील तितक्या लावण्या पोवाडे एकत्र करून छापण्याचा हा यत्न केला आहे. या पुस्तकास लोकाश्रय मिळेल ही खात्री आहे.

श्री पांडुरंगाचे विटेवरील पाय पाहण्यास परशराम हे तमाशा घेऊन पंढरपुरास गेले. तेथें राउळांत देवापुढें तमाशा करण्यास आरंभ करतांच देवळांतील भाविक भक्तमंडळींनी परशरामाच्या तमाशास देवळाबाहेर काढून दिलें. वाळवंटावर जाऊन तमाशा सुरू केला. परशरामानी "दधीसमुद्र मथिलारे जेव्हां" ही या पुस्तकांत असलेली लावणी गाईली, ती ऐकून पंढरपुरची सर्वच मंडळी चकीत झाली.

आकोल्या जवळील हेभोडी येथील तेल्याचा मुलगा भवानी हा नाचण्यास ठेवला. हा फार गुणी. पुढें परशरामाचा व नारायणाचा तमाशा पुनः एकत्र झाला. हा भवानी तेली चारपांच वर्षें नाचला. नंतर परशरामाच्या तमाशांत तो सोंगाची बतावणी करूं लागला. त्यासच बखोबास बाकेराव ह्मणत. बतावणी सोंगाची ही परशरामाच्या तमाशांतच प्रथम सुरू झाली. बाकेराव हा नाचत होता तो सोंगाड्या झाला. मग तर ह्या तमाशाचा फारच जमाव झाला. बाकेराव हा तमाशांत नकला फार करी. पण नकला करतांना अभद्र शब्द मुळीच उच्चारीत नसे. बखोबास हा बाकेराव फारच नाणवला. त्याच्या सोंगावर लोकांच्या मुरकुंडी पडत. खंडेराव महाराजांचे वेळीं याच बाकेरावास पुष्कळच देणग्या मिळाल्या बाकेरावाचे विषयींची माहिती शेवटीं सांगणार आहों. परशरामाच्या तमाशाबरोबर बाकेराव नेवाशाला गेला होता.

आमंदर्फवी हे परशराम असतां बावीस आले होते; त्यांनी एक लावणी करून तीत बत्तीस बाळ्यांचें वर्णन केलें. परशरामानी तेहेतीस बाळ्यांची लावणी केली. ती " माझी अर्ज विनंती पतिराया आज ऐका नग आज बखवा ", मधुरास लीलावती येत असलेला एक गोसावी आला. तो लीलावतीचे स्तोम सांगे. परशरामानीं " असंपार श्रीहरीचा नकळे भक्त उरला किती ", ही लावणी यावरून केली.

परशरामाच्या लावण्या सुशिक्षितांशिवाय इतरांनी ह्मणणें व ऐकणें यात मजा नाहीं. ह्मणणारास व ऐकणारास कांहीं तरी विद्येचा संस्कार झालेला व तो बहुश्रुत असला पाहिजे; एरवीं व्यर्थ. परशरामाच्या लावण्या ह्मणणारे व ऐकणारे गावमजीत [illegible] आहेत. पण त्यांच्याबद्दल परशरामानी ह्मटलें आहे: " बरोबर चालती और । चाली शुकअम गाती हुकर । " हल्लीं बावीस साथ परशरामाच्या लावण्या ह्मणणारे चांगले कांहीं आहेत.

या मानवदेहांत वागावें तरी कसें ? संसार हा क्षणभंगूर आहे, यावर उपदेश करतांना रावणाच्या वैभवाची लावणी करून " समस्त मवकव्याचें राज्य करणाऱ्या रावणाची संपत्ति लयास गेली तर इतरांची काय कथा ".

पूर्वीची राजकीय आणि सामाजिक स्थिति समजून घेणारांस परशरामी लावण्या ऐकणें फार चांगलें. परशराम हे देशाच्या व समाजाच्या पुढाऱ्यांतील एक होते. जातीनें शिंपी, तरी गुणापुढें जातीची ओळख नाहीं या कवीवर सर्वांचा हक आहे.

आरबी भाषेतील गोष्टींच्या मराठी भाषांतरांत जसा शब्दभरणा विशेष आहे ह्मणून वाचतांना आल्हाद वाटतो, तसाच शब्दभरण्याचा प्रकार परशरामाच्या लावण्यांतही आहे. तें भाषांतर सुबोध आणि साधें आहे. तशाच परशरामाच्या लावण्याही सुबोध आणि साध्या आहेत.

आपलें स्वत्व कायम ठेवण्यास व उदात्त बुद्धीस स्फूर्ति देणाऱ्या अशा परशरामाच्या लावण्या आहेत.

परशरामाची आई परशरामास एकदां ह्मणाली, " सर्वांस सोंगें दाखवितो, मला दाखवीत नाहींस ? " आईस ह्मणाले, " दाखवीन " एके दिवशीं समाधी लाऊन जे बसले, तों आई घाबरून गेली. तिचा जीव उडाला. मग बऱ्याच वेळानें समाधी उतरली.

योग्य अभिमान प्रगट करण्याचीखुबी परशरामाची विलक्षण आहे. सिंदे सरकार कीं, वालीस इनाम देत होते तर ह्मणाले " सुई दोऱ्यास ह्याती असो " असें ह्मणून इनाम घेईनात. ती इनाम दुसऱ्यानें नांवानें घेऊन परशरामाच्या मुलास दिला.

परशराम हे कपडे शिवून पैसे मिळवीत. वाईनजीकच निमोण येथील देशपांड्यांच्या येथें जाऊन परशराम हे त्यांच्या येथील कपडे शिवीत. तसेंच कणकुरीस सदाशिवपंत तात्या कणकुरीच्या जहागिरदाराचे कारभारी, यांच्या घरीं जाऊन त्यांचे कपडे शिवीत. परशरामास रामकृष्ण नांवाचा मुलगा होता. त्याच्या बायकोचें सासऱ्याशीं पटत नसे. ह्मणून उतारवयीं परशराम हे कणकुरीस येऊन आठ आठ दिवस राहत आणि कपडे शिवीत. कपडे शिवतांना लावण्या, पोवाडे ह्मणत, आणि सदाशिवपंत तात्या ते ऐकत. परशरामाशीं सदाशिवपंतांचा

एक पोवाडा केला, बाबा भागवत हे. परशरामाचे गुरु यांजवर आणि शिवाजी पाटील सुसळगावकर यांजवर जसे पोवाडे केले तसा हाही केला, पण तो आम्हास मिळाला नाही.

एकनाथ महाराज आणि तुकाराम महाराज यांच्याप्रमाणेंच परशरामाचें इच्छामरण झालें असें म्हणतात. याविषयींची माहिती परशरामास गातांना पाहिलेले गृहस्थ सांगतात. याबद्दलचें वाईचे थोडो दाजी कुळकर्णी यांच्या हातचें टिपण अवलोकनांत आलें. भवानी तेली ऊर्फ बाकेराव यानें माहिती तोंडी सांगितली तिजवरून हा मजकूर लिहिला आहे.

मरणाचे पूर्वी पंधरा दिवस आगाऊ मरणवार्ता परशरामानें शाहीस कळविली होती. तसेंच वाईहून मंजुरास [ गोदा तटाकीं ] जाण्यापूर्वी आपल्या इष्टमित्रांस पंक्तीस बोलावून भोजन केलें. वाईहून मंजुरास जातांना वाईच्या सर्व लोकांस सांगितलें कीं " आमचें मरण आजपासून चार दिवसांनीं आहे, मी त्या कामीं मंजुरास मरण्यास जातों, " असा वाईच्या लोकांचा निरोप घेऊन गोविंदा सोनारास बरोबर घेऊन ते मंजुरास गेले. मंजूर गांव वाईपासून तीन चार कोस दूर गोदेच्या कांठीं आहे, मंजुरास जाऊन गणपतीच्या देवळांत राहिले. मंजुरास जातांच तेथें भोसले राजे होते त्यांस व इतर लोकांस परशरामानें कळविलें कीं " आमचा मृत्यु चार दिवसांनीं होणार आहे, याजकरितां येथें आलों. मृत्यु झाल्यावर आमची दिवसाची व्यवस्था करावी, " हें बोलणें मान्य करून परशरामास सांगितलें कीं, आम्ही तुमची व्यवस्था करूं " पुढें दोन दिवसांनीं परशरामानें नारायण शिंपी वाईकर यांच्या नांवानें पत्र लिहून " आमचा मृत्यु दोन दिवसांनीं होणार आहे, तर तुम्ही तमासगीरमंडळीनीं, नाचणाऱ्या पोऱ्यासह मंजुरास यावें". पत्र मंजुरचे भोसले राजे यांच्या जवळ देऊन सांगितलें कीं, " हें पत्र वाईस मुद्दाम पाठवून मंडळी बोलवावी " त्यांनीं तें पत्र वाईस नारायण शिंपी यांजकडे पाठविलें. वाईस पत्र येतांच नारायण शिंपी व इतर मंडळी यांनीं वाचून पाहिलें, व आश्चर्य करूं लागले. नंतर तमासगीर मंडळीस ना-

गितलें कीं, "सर्वांनीं मंजुरास चलावें. काय हकीकत आहे ती सर्व पाहूं." तें
त्यांनीं कबूल केलें. नारायण शिंपी, बापुशिंपी, रामा कुंभार, भवानी तेली आणि
दोन नाचणारे, तसेंच परशरामाची सून काशीबाई इला बरोबर घेऊन परशरामा-
चा मुलगा रामकृष्ण हा भोकणी गांवास गेला होता त्यास आणण्यास गडी पाठ-
वून, ही मंडळी मंजुरास गेली. मंजुरास जातांच प्रथम गणपतीचे देवळांत जाऊ-
न परशराम सुखरूप आहेत हें पाहून तेथें उतरली, परशराम नारायण शिं-
प्यास ह्मणाले "बरा आला, आमच्यावर उपकार झाला" त्यावर नारायण ह्मणाला
"यावेंतर कसें करावें? तुमचें पत्र आलें, तूं मरतोसना! तूं ब्रह्मदेवाच्या घरून
आलास ह्मणून तुला मरण समजलें।" नंतर परशरामानीं विचारलें "रामकृष्ण कां
आला नाहीं," मंडळींनीं सांगितलें कीं, तो "भोकणीस गेला आहे" एकादशीचा दि-
वस होता, ह्मणून गंगेवर सर्व स्नानास गेले, स्नान करून आल्यावर परशरामानीं
एकादशीचा फराळ केला. इतर मंडळींनीं जेवण केलें, त्या दिवशीं सायंकाळपर्यं-
त परशरामानीं नवीन लावण्या केल्या. रात्रीं फराळ झाल्यावर कांहीं वेळ पावे-
तों गोष्टी केल्या, नंतर परशरामांनीं सांगितलें कीं, 'एकएकानें एकेक लावणी ह्मणावी.'
परशरामानीं प्रथम लावणी ह्मटली. तीच शेवटची लावणी. तीनच कडव्यांची क-
रून "हें शेवटचें चवथें कडवें तिसरें पिढीत होईल"। असें सांगितलें. दुसरी ला-
वणी नारायणानें ह्मटली, तिसरी गोविंदा सोनारानें ह्मटली, चवथी रामा कुंभा-
रानें ह्मटली, पांचवी बाबाजी सिंपी यानें ह्मटली शेवटीं भवानी तेली उर्फ बांके-
रावानें लावणी ह्मटली. तेव्हां परशरामानीं बांकेरावाची पाठ थोपटून ह्मणाले
कीं, "शाबास! हे बनेचा कांहीं नांव राखशील," नंतर सर्वांस सांगितलें कीं,
"उद्यांक आमचा मृत्यु आहे, आह्मी जाणार आह्मी गेल्यावर आमचे पुढें घोन्या-
वर राज चालवा तुह्मी चालावें" त्यावर सर्व निजले. पहाटेस परशराम हे उठून
सून काशीबाई इला स्वयंपाकास लागण्यास सांगून, आपण गंगेवर जा-
ऊन स्नान करून आले, धोतर वाळत घातलें. विसरू [illegible] भोजन केलें.
तंबाखू हातावर घेऊन ती चोळीत चोळीत लावणीतें मंडळी निजली होती तेथें

येऊन म्हणाले कीं, "स्वयंपाक झालेला आहे, लवकर स्नान करून भोजन करावें, नाहीतर अन्न पदरांत पडायाचें नाहीं" तें ऐकून नारायण शिंपी म्हणाला कीं, 'हा अमदेवाच्या घरून आला म्हणून याला मरण समजलें". मंडळी हसूं लागली. नं-तर उठून गंगेवर स्नानास गेली. 'परशराम शिंपी यांचा आज मृत्यु आहे ' ही वार्ता गांवांत आणि आसपासही पसरली होती, म्हणून गांवचे लोक व भोंवतालचे माळेगांव, बेलापूर, तास, मोरोसी, धामोरी, कोळगांव, सांगवी इत्यादि गांवोगांवचे लोक गणपतीच्या देवळापुढें येऊन बसले. ही मंडळी स्नानास गेलेली स्नान करून परत आली. पुष्कळ लोक जमलेले पाहून तीं आश्चर्य करूं लागली. दे-वळांत जातांच परशराम यांनीं सांगितलें कीं, " लवकर भोजन करावें. " भोजन आटोपत आहे तोंच परशरामानीं ज्ञानेश्वरीची पोथी काढून तींतील आकरावा अध्याय घडघडा वाचला. परशरामाजवळ मंजुरचे भोंसले राजे बसले होते. बाकीची मंडळी पोथी ऐकत होती, अध्याय संपतांच नारायण शिंपी यास परशरामानीं जवळ बोलाविलें; आणि मंजुरचे लोकांस हात जोडून सांगितलें कीं, "आतां आम्ही जाणार आमची शेवटची फुलाची तजवीज करावी" या बोलण्याचें सर्वांनीं आश्चर्य मानून त्यास सांगितलें कीं, " आप्पा असें काय म्हणतां ? वेळ आली तर आमचे आवलांची लांकडें आणून आम्ही तुमची वेळ शेवयास लावूं, नारायण शिंपी जवळच बसला होता "त्यास माझे पाठीशी बैस" म्हणून परशरामानीं सांगितलें तो पाठीशीं बसतांच त्याचे आंगावर मान टाकून " पुंडलिक वरदा हरी विठ्ठल. सीताकांत स्मरण जै जै राम. असें म्हणा " असें मोठ्यानें म्हणून देह ठेवला. मानेचा कांटा पडला ! नारायण शिंपी " आप्पा आप्पा मशीं बोला ,, असें म्हणाला, इतक्यांत कोणी म्हणालें, " राम कृष्ण आला " म्हणून एकदोळां उघडून पाहूं लागले. तर रामकृष्ण नाहीं. मग डोळे मिटले ! हें पाहून सर्वत्र लोकांस फारच आश्चर्य वाटलें. नंतर पाण्यानें साज घालून तासे वाजंत्री लाऊन गंगेवर नेण्याची तयारी केली. गंगेवर नेऊन, तेथें मंजुरचे लोकांनीं पूर्वींच चिता रचून ठेविली होती तिजवर ठेवून अग्नी दि-

आणि उपदेशपर लावण्या घातल्या असून दुसरे प्रकरणांत शृंगार वर्णनाच्या घातल्या आहेत. असें वर्गीकरण योजलें आहे; भाग व कागदी प्रकरण ह्मणण्याचें कारण, एकेका कवीचा भाग केला आहे.

ह्या लावण्या पोवाडे सर्व एकेच ठिकाणी मिळालेल्या नसून ठिकठिकाणी मिळविल्या आहेत तीं ठिकाणें.

१. मारो आबाबास ऊर्फ दादाभटजी वेयटाणकर यांच्या तोंडून परशरामी लावण्या प्रथम ऐकल्या. हे गृहस्थ बहुश्रुत असून मोठे स्मरणाचे धड आहेत. यांच्या तोंडच्या लावण्या ऐकूनच त्या संग्रह करण्याकडे मन वेधलें. यांनीं स्वतः कांहोंकाळ परशरामाचा नाच्या होता त्याजकडच्या ऐकल्या होत्या.

२. बापु शिंपी कोल्हेवाडी जोरव्याची येथें रहात होता त्याजकडून कांहीं लावण्या मिळाल्या.

३. सखाराम शिंपी काळे वावीकर परशरामाच्या भाच्या वेथाशास होता. त्याजकडून कांहीं लावण्या मिळाल्या.

४. सीताराम रामकृष्ण शिंपी परशरामाचा नातु याची वही एकवेळ पाहण्यास मिळाली होती. तिच्यांतील कांहीं लावण्या घेण्याच्या राहिल्या.

५. साधव्याराम मधू शिंपी हा परशरामाच्या भाच्याचा मुलगा याच्या एकें वहीत लावण्या मिळाल्या व दुसरीतील घेणें राहिल्या.

६. धोंडो बाजी कुळकर्णी यांच्या वहींतील लावण्या मिळाल्या.

७. बळवंत मल्हार मुळे जोशी याजकडून कांहीं लावण्या मिळाल्या.

८. रामचंद्र त्र्यंबकदेशपांडे कोदूरकर यांची साठ सत्तर लावण्याची वही मिळाली तींतील कांहीं लावण्या घेतल्या.

९. विठोबा नारायण शेटे कुबेरकर यांच्या जवळच्या व तेथील सराफाच्या वहींतून कांहीं घेतल्या.

परशरामाचा शिष्य भवानी शेठी ( बाकेराव ) याचा जन्म शके १७३९ साली ह्मणजे सन १८१७ हा आकोलाजवळच्या हमीवीचा राहणार,

त्याच्या आईबापांनीं त्यास बावीस दहा रुपये सालावर नाचण्यास ठेविलें. पुढें त्यास पंधरा रुपये साल केलें, नंतर वीस रुपये साल केलें. तीन चार सालें त्यानें नाचण्याचा धंदा केल्यावर स्त्रियांचीं सोंगें आणूं लागला, नंतर पुरुष भागाचीं सोंगें आणूं लागला. त्या कलेंत तो अत्यंत प्रवीण झाला. तो परशरामाच्या तमाशाबरोबर मुलुखगिरीस जाई. ग्वाल्हेरीच्या मुलुखगिऱ्या पांच केल्या, त्यावेळीं आगगाडी नव्हती. दोन वर्षेपर्यंत तर परशरामाचे तमासगीर तेथेंच राहिले, आणि तीन वर्षे जाऊन येऊन ग्वाल्हेरीहून प्रथम तीन हजार रुपये ( सावखेड्यास हुंडी वटऊन रुपये घेतले ) नऊ दुपाटे आणि पागेंतील दोन घोडे आणले. इंदुरच्या मुलुखगिऱ्या दोन केल्या, एक मल्हारराव होळकरांच्या वेळीं आणि दुसरी हरीराव होळकरांच्या वेळीं. असे दोन शिमगे इंदुरास केले, एक शिमगा साताऱ्यास बुवासाहेब महाराज असतां केला. बडोद्यास एकवीस मुलुखगिऱ्या केल्या, बाकेराव प्रथम परशरामाच्या बरोबर बडोद्यास गेला, त्यावेळीं सयाजीराव महाराज गायकवाड हे बडोद्यास होते. सयाजीराव महाराजांस पांच पुत्र, गिरजाबाई महाडिकांच्या त्यास एक पुत्र, चिमणाबाईस चार पुत्र व नऊ कन्या होत्या.

परशरामानंतर बाकेराव हा तमाशा घेऊन बडोद्यास गेला. त्याच्या तमाशास बडोद्यास बाकेरावचा तमाशा म्हणत. बाकेराव प्रथमच तमाशा घेऊन बडोद्यास गेला, त्या वेळची हकीकत बाकेरावानेंच सांगितलेली येथें लिहिली आहे. "त्यावेळीं गायकवाड सरकारचे मेहुणे कडुसले थोर- वर रघुनाथराव बाबासाहेब, यांचे बंधु माधवराव भायबाए हे तमाशाच्या कामावर असून त्यांना कारकून वर्दी घेणारा होता. तो बाकेरावास विचारूं लागला कीं, " तुम्ही कोठले ? " बाकेरावानें सांगितलें, " आम्ही राजाच्या बाबीचे तमासगीर आहोंत. " कारकून म्हणाला " तुम्ही दुबळे फार दिसतां ! इतके लोक आलोंत पण तुमच्या बिदार नीट दिसत नाहीं. बाकीचे भिकार दिसतें ! पांचपन्नास रुपये मिळाले तर बरें ! नाहींतर हालमास आपत्तींत जाल ! " असें म्हणून

नांव नोंदिलें. तो होळीचा दिवस होता. समासगिरांसह बाकेराव राजवाड्यांत गेला. रामाचा तमाशा कृष्णाबाचा तमाशा हे सयाजीराव महाराज यांच्याकडेस नेमले होते. तमाशाच्या ह्या नेमणुका कारकुनानें वाचून दाखविल्या. “ बाकेराव नारायण यांचा तमाशा कोंडाबाई नाटकशाळा यांच्या महालांत नेमला. ” म्हणून वाचलें. तमाशा शुरू झाला, तमासगीर मशालजी आणि एक चोपदार हींच कायती तेथें हाती। तमाशा चांगला आहे, अशी बातमी सयाजीराव महाराजांस लागली. रघुनाथराव बाबा फडुसकर धायबर यांनी सयाजीराव महाराजांस सांगितलें कीं, “ सोंगाड्या फार गमती आहे, पुण्यापासून येथपर्यंत पहात आलों; पण असा गमती सोंगाड्या पाहिला नाहीं ” बाकेरावाच्या तमाशास सयाजीराव महाराजांकडचें बोलावणें आलें. बाकेरावाच्या चौक्यास चिंधीवजा फाटकें पागोटें, खादीची बंडी, हा पोषाख. तमाशा चवथ्या मजल्यावर गेल्यावर तेथें शंभर चोपदार इकडे व शंभर चोपदार तिकडे हें राजवैभव पाहून बाकेराव दिपला. प्रथम त्यानें कवनास सुरवात केली.

भूवैकुंठ अक्षर आगळें । मोक्षाचें मोहर सगळें ।
ज्यामाजीं देह उगळे । विठ्ठल म्हणे सार्थक सगळें ॥
आषाढी कार्तिकी दाटी । परधाराम येसू म्हणे वाळवंटीं ।
धमलास फार जराजेठी । मारे विटेवरी कर कटी ।
त्यापुढें—ब्रह्माळीचें वर्तमान राजसा सुचयील आ हरघडी ।
पंचप्राण तुजपाशीं०

बाकेरावानें चलावणीच्या बोलण्यास सुरवात करतांच प्रेक्षकांवर छाप बसविली. सयाजीराव महाराज हे हसतां हसतां थकले. नव्वद रुपयांचा तोडा तीनपदरी पागोटें व दुमाटा त्यांनी बाकेरावास दिला. मग दिवस बाकेरावाचा तमाशा जारी-वर झाला. साडेपांचशें रुपये बिदागी बाकेरावास मिळाली. तीनशें रुपयांची नि-मणूक व शंभर रुपयांचा पोशाग दरसाल चालू झाला. त्यापुढें एकवीस वर्षें बा-केरावाचा तमाशा बडोद्यास जात असे. खंडेरावमहाराजांनीं बाकेरावास एकदां

सोन्याचे कडें दिलें. पांच कडीं त्यास बडोद्यास मिळालीं. मल्हारराव महाराजांच्या राणीनें अठरा तोळ्यांचा गोफ बाकेरावास दिला. अकरा तोळ्यांचा किल्लेदारांनीं दिला. भागूबाईच्या बापानें गोफ दिला. अशा देणग्या बडोद्यास बाकेरावास मिळत. तिनशें रुपयांची नेमणूक आणि शंभर रुपयांचा पोषाख हल्लींच्या महाराज साहेबांच्या वेळेपर्यंत मिळत असे. बाकेरावानें बडोदें, ग्वालेर, इंदूर आणि सातारा अशीं चार राज्यें पाहिलीं. मथुरा, गोकुळ, वृंदावन, अयोध्या, काशी, इत्यादि उत्तरेच्या तीर्थयात्रा केल्या. बडोद्यास असतां डाकूरची यात्रा केली. तमाशाखेरीज दुसरा धंदा केला नाहीं. घाणाही हांकला नाहीं. तमाशांत कोणास जय येत नाहीं; पण बाकेरावास यश आलें. दंभोडी व बाबीस घर केलें. शेत केलें. निर्व्यसनी, परस्त्रीपरद्रव्याभिलाषाची शपथ. दारू भांग गांजा असें कोणतेंच व्यसन नव्हतें."

वरील अवतरणांत आलेला मजकूर बाकेरावानें सांगितला. तो भरंवशाचा वाटल्यावरून व आमच्या गांवानजीकचा बाकेराव हा राहणारा म्हणून तो दिला आहे. बडोद्यास असतां तेथील शिमगा आम्ही पाहिला. त्या वेळीं गाइकवाड सरकारचा कर्णासारखा दानशूरपणा पाहून चकीत झालों. पेशवाईंत पुण्यास काय मजा असेल याची कल्पना बडोद्यास आमच्या मनांत आली. पुण्यास जुने गाणारे, सगनभाऊ, होनाजीबाळादि यांच्या लावण्या म्हणणारे आतां राहिले नाहींत. स्वराज्याबरोबर आमची करमणूकही नष्ट झाली, याबद्दल जुन्या रसिक वर्गास हळहळ वाटते. पण काळापुढें उपाय नाहीं.परशरामाच्या अखेरची जी हकीकत बाकेरावानें आम्हास सांगितली ती, धोंडोपंत कुळकर्णी वाघी यांच्या सांगण्याशीं ताडून पाहतां बरोबर मिळाली. धोंडोपंतांच्या चिरंजिवांनीं तें सांगणें आम्हास पाहण्यास दिलें, याबद्दल त्यांचे आभार आहेत.

परशरामानीं इतर शाहिरांप्रमाणें देवाच्या लावण्या, क्षेत्रवर्णनें, ऐतिहासिक पोवाडे आणि शृंगारिक लावण्या केल्या आहेत. समाजस्थिति सुधारण्यासाठीं दीस अनुलक्षून उपदेशपर ज्या लावण्या केल्या आहेत, त्या ऐकण्यासारख्या

उठवून देण्याची कला जी त्यांस साधली आहे त्यावरून त्यांची योग्यता विशेषच वाटते. समाज सरळ मार्गानें नेण्यासाठीं मार्मिकता आणि बहुश्रुतपणा त्यांनीं प्रगट केला आहे, त्याचा आचंबा वाटतो. स्फुट लावण्यांचें प्रकरण पाहूनही तें कळेल. महिपतीराथ, मोरोपंतादि कवि ज्या वेळीं होते; त्याचवेळीं परशराम कवि होऊन गेले. ते किती पापभीरू होते हें ' कोण्या शास्त्रीं वर्णिल्या कीर्ति जार जारिणीच्या ' या चरणावरून कळेल. यांचा शृंगाराचा अनुभव शालिवाहन महाराजासारखा होय. यांच्या कांहीं लावण्या वेदांताच्या [ भेदीक ] आहेत. त्या समजण्यास तर टिपांचा कोश दिला पाहिजे. या कवीच्या दहापांच लावण्या जरी असत्या तरी यांची कीर्ति अजरामर राहून त्यांच्या जन्माचें सार्थक झालें असतें. परशरामाच्या लावण्यांचे सूर मनांत भरले तर उत्तम गवयाचें गाणें ऐकल्यापासून जो आनंद व्हावयाचा तो आनंद या लावण्यांपासून होतो. अर्थ-स्वारस्य त्यांत आहे तो लाभ तर निराळाच.

नेवाशाच्या मोहोनीराजाची लावणी पांच चौकांची आहे पण ती पुरी मिळाली नाहीं. पापाचें क्षालण करणारी गंगा तिची लावणी शेवटीं आहे. कांहीं वेदांच्या लावण्या मागाहून ओढल्या आहेत.

परशरामाच्या लावण्यांच्या चाली समजण्यासाठीं दुसऱ्या शाहिरांच्या लावण्यांच्या दिल्या त्या टाईप बदलून दिल्या असत्या तर बरें होतें.

---

# अनुक्रमणिका.

## परशराम कवीच्या लावण्या.

### प्रकरण पहिलें.

#### देवांच्या लावण्या.

## प्रकरण दुसरें.

### ऐतिहासिक पोवाडे.

## प्रकरण तिसरें.

### स्फुट लावण्या. [समाजस्थिति]

# प्रकरण चौथें.

## साक्या लावण्या.

---

# परशरामाच्या लावण्या.

## प्रकरण १ लें.

### चाल धुमाळी अनुष्टुप्छंद.

जय सिद्ध विनायक वेषा । ओंकार नमूं आदिपुरुषा ॥
जेंव्हां कांहींच नवतें सार । होतें निरगुण निराकार ॥
स्वइच्छा शून्याकार । शून्यापून ध्वनी ओंकार॥
तें मूळ मायेचें घर । मायेपून त्रिगुणाकार ॥
त्रिगुणाचे षड्विकार आदिअंत विनायक वेषा ॥
जय सिद्धीविनायक वेषा । ओंकार नमूं आदिपुरुषा ॥ १ ॥
ज्योतिप्रकाश तरू आणि छाया । जळ तुरंग एकच ठाया ॥
झाली प्राणरूपिनी माया । तिनें ब्रह्मांड आणलें लया ॥
घर पंच भूतांचें राया । आली सगुण निरगुण पाया ॥
लघु स्वर्ग दिर्घ अक्षिरें भाषा । करी जप एकवीसहजार सहाशी ॥
जय सिद्धीविनायक वेषा । ओंकार नमूं आदिपुरुषा ॥ २ ॥
निर्वर्त निरगुण दोन्ही । आम्ही ना ऐकूं हो ज्ञानी ॥
मायापुण सगुण आणि ध्यानीं । होय श्वेतधातूचें पाणी ॥
पाण्यांत ज्योत आली ध्यानीं । चिद्रुप वस्तु गुरु ज्ञानी ॥

कोणी जातील विरळा प्राणी । घणघणाट घण करी घोषा ॥
गुरुपुत्र शोध करी भाषा । जय सिद्धिविनायक वेषा ॥
ओंकार नमूं आदिपुरुषा ॥ ३ ॥
सर्व निरगुण निरगुण ह्मणती । नाहीं सगुणाविण मनशांति ॥
जे कोणी अष्टगणाशीं ध्याति । गण नाहीं मळीचा आदिआंति ॥
तो विटेवर आवीट मूर्ति । त्या विठ्ठलाची गाऊं कीर्ति ॥
विठू परशराम करी आशा । भावें वंदून पद ठेवी सरशा ॥
जय सिद्धि विनायक वेषा । ओंकार नमूं आदिपुरुषा ॥ ४ ॥

## लावणी २ री.

॥ चाल ॥ लाडे लाडे येते मनरंजना । उचलुन कडेवर कां घ्याना ।
॥ सगनभाऊ ॥

रक्षी रक्षीरे करुणाघना । श्रुति निरवाणहो ॥ ध्रु० ॥
मच्छ रूप धरिलें ज्याने देवा शंखासुरें । शंखासुरें साधिला दावा ॥
कच्छ वेष धरून । कच्छ वेष धरून केशवा पृष्ठीवर सृष्टि ।
पृथ्वी वर सृष्टी साधना ही वराह रूप तुझें । साधना दंत झाले हिण।
रक्षी रक्षिलें करुणाघन श्रुति निर्वाणहो ॥ १ ॥
नारसिंह वेषानें क्रूर धरिला भक्तास्तव स्तंभीं । भक्तास्तव स्तंभीं ॥
गुरगुरला हिरण्यकशप हो । हिरण्यकशप दैत्य चिरला ।
वामनमूर्त लहान । वामनमूर्त लहान बळी हरला ।
आक्रंट पाद भूमि । आक्रंठ पाद भूमि मागुनया केला पण ।

रक्षी रक्षीरे० ॥ २ ॥

सहावा परशराम महाक्षेत्रीं । एकवीस वेळां हो ।
एकवीस वेळां भूमि केली निक्षेत्री । रावण रूपा ।
रावण रूप. राम राज्य एकक्षेत्री । कृष्ण नेला हो ।
कृष्ण नेला कौंस पहा रात्री । बौध्य पंढरपुर हो ।
बौध्य पंढरपुर कर कटावरी ठेऊन । रक्षी रक्षी० ॥ ३ ॥
दहावा कलंकी पुढें होणार । कच्छ वदनीं जाती ।
कच्छ वदनीं जाती तेव्हां तों भूमीवर नाहीं तृण उरणार ।
नाहीं तृण उरणार गुणी विठु परशराम हो ।
गुणी विठु परशराम लीन तार हो । रामालीन होऊनी ।
रामालीन होऊनी गातसे हरीचे गुण ।
रक्षी रक्षीरे रक्षी रक्षीरे करुणाघन श्रुति निरवाण हो ॥ ४ ॥

## लावणी २ री

॥ चाल ॥ पति गेले माझे काठेवाडी। गीरनार अबूच्या पहाडी॥

अथवा

किती आवरू ही वेडी माया।राग सोडा पडतेपाया।वद्या मावरी॥

अनुप

श्रमलास फार जगजेठी। बारे विटेवरी उभा कर कटीं। धृ०॥
दधि समुद्र मंथिला जेव्हां । शेषाचा दोर लाविला सेव्हां ॥
दिलें अमृत वांटून जेव्हां । राहु चंद्राचा तपीपुन वासा

दह्या गर्भ अंबऋषीसाठीं । घेऊन लावी चक्र दैत्यापाठीं ॥
श्रमलास फार जगजेठी । वारे विटेवरी उभा कर कटीं ॥१॥
नखी गोवर्धनाशी धरिलें । गोपींचें जोबन हस्तें चुरलें ॥
गाय दोहोता दोन्ही कर हरले । पार्थाचे रथ जोडून आवरले ॥
महा आंबुवंत वीर जेठी । सकळा सोडून दिलें वैकुंठीं० ॥२॥
साक्षपे सिते केवारा । मिळवून दळ पद्म सहा आणि बारा ॥
सोडून बाण जळधारा । त्यानें माहित केलें अवघ्या जगारा ॥
केलें निर्मूळ त्या रावणासुरा । देव बंदी तेहेतीस कोटी ॥
सकळा सोडुनि गेला वैकुंठी । श्रमलासी फार जगजेठी० ॥३॥
भुई वैकुंठ अक्षरें आगळें । एक्या मोक्षाचें माहेर सगळें ॥
ते मार्गी देह जरी उगळे । देतो विठ्ठल म्हणे सार्थक सगळें ॥
आषाढी कार्तिकी दाटी । परशराम येसू महादू म्हणे वाळवटीं ॥
श्रमलास फार जगजेठी । वारे विटेवरी उभा कर कटीं ॥४॥
सोहोंळंड क्षेत्र शशीभारा । युगें आठावीस जुनाट जागा ॥
आले पुंडलिकाच्या मागा । त्यानें केलें या माहित अवघ्या जगा ॥
देव भक्त क्षेत्र तिन्ही गोष्टी । धुंडितां तपिले त्रिभुवन सृष्टी ॥
श्रमलासी फार जगजेठी ॥ ५ ॥

लावणी ४ थी.

चाल ॥ कटाव ॥

माझी तीळ रसीचळ । तुझी कळा चंचळ ॥

तूं निर्मळ ब्रह्मचारी । अनंत माया शेष वर्णिला दुभांगली वैखरी ॥
विधी करी ध्यान । नाहीं स्वरुपाशीं वान ॥
त्रैलोकीं निधान । ते आवतरले गोकुळीं ॥
बहुत प्रकारें रिझवी माता । पिता नंद गौळी ॥
दधी ठेवी पुढें । हरी फुंदु फुंदु रडे माय घेती कडे ।
तव अधिकच रडे वनमाळी ॥
घरांत नेतें बाहेर आणितें । गाती स्वर मंजुळी ॥
राधा नार उभी द्वारीं । रूप लावण्याची कळी ॥
हासे गदगदा हरी । राधिका अनंत सुख प्रक्षाळी ॥
बोले यशोदा सुंदरी । राधेची विनंती करी ॥
ने तुझ्या घरीं हा हरी । राधा आनंदली फार ॥
कडे घेई मनोहार । तिचे सासू भ्रतार ॥
गेली हाटा एकली घरीं । मुखचुंबन दे टाळी वाजवी ।
गदगदा हासे हा हरी ॥
नाहीं तीळ रतीमळ । तुझी कळा अचळ ॥
तूं निर्मळ ब्रह्मचारी । आनंत माया शेष वर्णिला दुभांगली
वैखरी ॥ १ ॥
भरी लोणियाची वाटी । आज झाले स्तन तुटी ॥
सिच्या आंगुल्या चाटी । पुढें वदन करी दे मुका ॥
दुड दुड धावे नृत्य करी । त्यानें रिझविली राधिका ॥

गेले आवसान करी प्रार्थना । व्हा लहाव जगजिवना ॥
हरी झाला निपट बाळ तान्हा । पती उत्तर दे कामिना ॥
वैसले हरी भोजना । माझे मनीं एक भाव ॥
तुम्ही कपटी कुभाव । पडला राधिकेचा डाव ॥
मग पतीची छळणूक करी । दिली पतीनें रजा राधा नित
हरी आणित जाय घरीं ॥
नाहीं तीळ रतीचळ । तुझी कळा अचळ । तूं निर्मळ
ब्रह्मचारी० ॥ ३ ॥
राधा हरी दोघे जण । किती रिझविती मन ॥
तिचें सारें तनमन । मद मक्षकारशी ॥
जरा पडेना चैन राधेला । हरी विण आंधळी जशी ॥
ल्याली सोळा श्रृंगार । भांगीं भरुनया गुलाल ।
घाली अवघा अलंकार । भरतारुण्य मुसमुसी ॥
अमळ सासु बाहेर गेल्या घरीं आणि रुषकेशी ॥
एके दिवशीं फार । कर्मिले मनोहार ॥
विसरली द्वार । नाला विलें त्यादिवशीं ॥
अवचित आली सासु बाहेरून । उभी पलंगापाशीं ॥
होती नवार आंत बाहिशीं । करकचून दोहीला कशी ॥
जसें बांधी बांधू दिले तिशीं । राधाकरी हळहळ ।
गेली अबरू नाहीं ताळ । व्हा लहान गोपाळ ॥

[illegible] हरीची करी । थोर होऊं जाणतो लहान होईना
ही गोष्ट नाहीं बरी ॥
नाहीं रतिचळ । तुझी कळा अचळ तूं निर्मळ ब्रह्मचारी॥४॥
राधा हरी धरून । मारकुटी करून ॥
[illegible] यशवदे जवळ बांधुनि । तुझा हरी हा चोरटा– ॥
आणून गवळ्यानें घातली धुणी ॥
[illegible] राहा तुम्ही स्थीर व्हा । यशवदे पहा हा पलंग उघडूनी ॥
राधा राधेचा भ्रतार दोघे कसे आणले बांधुनी ॥
बरा केला सेळ–अवघड राज्याचा खेळ ॥
हरी माझें तान्हें बाळ–पहा मंदिरांत जाऊनी ॥
पाळण्यांत रडे हरी सावळा बाळरूप होऊनी ॥
राधा खुशाल झाली मनांत । राधेची सासू लज्जीत ॥
[illegible]कळे हरीचें मत । नामी विठ्ठल नामांकित ॥
[illegible] हिताचें काम । मुखीं स्मरा राम राम ॥
[illegible] परशराम । कवीश्वरी ॥
[illegible] सत्राचें [illegible] होता मुक्काम मथुरेवरी ॥
नाहीं तिळ रतीचळ– तुझी कळा अचळ–तूं निर्मळ ब्रह्मचारी ॥
अनंत माया शेष वर्णितां [illegible] वैखरी ॥ ५ ॥

लावणी ५ वी.

॥ चाल ॥

[illegible]पाणी । नको भरूं पाणी । भरूं दे पाणी । आईल पाणी म्हणी माझें ॥

मी नवी तरणी माथा तरणी देहभान गेलें हरी तुझें । चक्रपाणी अघटित कर्णी केली मजकर्णी तुझी कुलकर्णी पडेल कर्णी अव-ध्यांच्या॥ जन सरनिवनी जातों आह्मीं अवनी सोड पदर हरी नंदा-च्या । चानमसुद्रा बुद्धिसमुद्रा परखुणमुद्रा सुवर्णमुद्रा दे आसुच्या । जगदोद्धारा प्रजन्यधारा होती गर्जना गोपीविण कृष्ण तूं श्रीकृष्ण तुजविण कृष्ण असतील तृष्ण त्यांशीं रिजे । मी नवी तरणी माथा तरणी देहभान गेलें हरी तुझें । चक्रपाणी नको धरूं पाणी० ॥ १ ॥ कमलाकांता आह्मी परकांता येऊन एकांता । रुक्मिणीकांता पडू-शी गळा । नको धरूं पदरीं आह्मी तुझे पदरीं रयतेचा पाळीजे लळा । जगन्यवासी गोकुळवासी । तूं कामवासी । सासुरवासी आह्मी अबळा ॥ मज घरधंदा चळला नंदा नको करूं तूं गोपा-ळा । नाभीकमळा । विनवी कमळा । तुज पदकमळा । त्या श्रीक-मळा । वाहीन ऐसें शीर माझें । मी नवी तरणी माथा तरणी देह-भान गेलें हरी तुझें ॥ चक्र० ॥ २ ॥

या संसारीं । किलेस्वारी । तूं कंसारी । करून स्वारी खगावर ऐकुन मुरली इच्छा मुरली अगाध लीळा तूं श्रीधर । हरी गोपाळा वेळुन गोपाळा । यमुने पाळा । करून पाळा कमळावर । जन्म-शिधोरी । वाटी शिधोरी । भक्तालागीं कृपा कर । पडु यमाते वरी रमा तें । सुख आह्मातें । तुज वांचुनिया कोण बुझे । मी नवी-

मनविनंती हरीची करी । थोर होऊं जाणतो लहान होईना
ही गोष्ट नाहीं बरी ॥
नाहीं रतिचळ । तुझी कळा अचळ तूं निर्मळ ब्रह्मचारी॥४॥
राधा हरी धरून । मारकुटी करून ॥
नेले यशमदे जवळ बांधुनि । तुझा हरी हा चोरटा– ॥
आणून गवळ्यानें घातली धुणी ॥
बरें राहा तुम्ही स्थीर व्हा । यशवदे पहा हा पलंग उघडूनी ॥
राधा राधेचा भतार दोघे कसे आणले बांधुनी ॥
बरा केला मेळ—अनघड राज्याचा खेळ ॥
हरी माझें तान्हें बाळ—पहा मंदिरांत जाऊनी ॥
पाळण्यांत रडे हरी सावळा बाळरूप होऊनी ॥
राधा खुशाल झाली मनांत । राधेची सासू लज्जीत ॥
नाकळे हरीचें मत । नामी विठ्ठल नामांकित ॥
पुरे हिताचें काम । मुखीं स्मरा राम राम ॥
गिरी परशराम । कवीश्वरी ॥
बापे सवाई सवाल होता मुक्काम मथुरेवरी ॥
नाहीं तिळ रतीचळ— तुझी कळा अचळ—तूं निर्मळ ब्रह्मचारी ॥
अनंत माया शेष वर्णितां तुमराली वैखरी ॥ ५ ॥

लावणी ५ वी.

॥ चाल ॥

नकपाणी । मको धरूं पाणी । भरूदे पाणी । जाईल पाणी म्हणी माझें ॥

मी नवी तरणी माथा तरणी देहभान गेलें हरी तुझें । चक्रपाणी अघटित कर्णी केली मजकर्णी तुझी कुलकर्णी पडेल कर्णी अव- ध्यांच्या॥ जन सरनिवनी जातों आह्मीं अवनी सोड पदर हरी नंदा- च्या । बानमसुद्रा बुद्धिसमुद्रा परखुणमुद्रा सुवर्णमुद्रा दे आमुच्या । जगदोद्धारा भजम्यधारा होती गर्जना गोपीविण कृष्ण तूं श्रीकृष्ण तुजविण कृष्ण असतील तृष्ण त्यांशीं रिजे । मी नवी तरणी माथा तरणी देहभान गेलें हरी तुझें । चक्रपाणी नको धरूं पाणी० ॥१॥ कमलाकांता आह्मी परकांता येऊन एकांता । रुक्मिणीकांता पड- शी गळा । नको धरूं पदरीं आह्मी तुझे पदरीं रयतेचा पाळीजे ळळा । जगन्यवासी गोकुळवासी । तूं कामवासी । सासुरवासी आह्मी अबळा ॥ मज घरधंदा चळला नंदा नको करूं तूं गोपा- ळा । नाभीकमळा । विनवी कमळा । तुज पदकमळा । त्या श्रीक- मळा । वाहीन ऐसें शीर माझें । मी नवी तरणी माथा तरणी देह- भान गेलें हरी तुझें ॥ चक्र० ॥ २ ॥

या संसारीं । किलेस्वारी । तूं कंसारी । करून स्वारी खगावर ऐकुन मुरली इच्छा मुरली अगाध लीळा तूं श्रीधर । हरी गोपाळा घेऊन गोपाळा । यमुने पाळा । करून पाळा कमळावर । जन्म- शिधोरी । वाटी शिधोरी । भक्तालागीं कृपा कर । पडु यमासे घरी रमा तें । सुख आह्मासे । तुज वांचुनिया कोण बुझे । मी नवी-

तरणी माया तरणी. देहभान गेलें हरी तुझें । चक्रपाणी नको धरूं पाणी० ॥ ३ ॥

हरीनें राधा केली सुराधा । मागू अपराधा । कृष्णराधा । कृष्ण-राधा । सकळ जनीं । कल्प अधिकारा । जग अधिकारा ॥ दृढ धरा राघवा मनीं । मामादानी कैवल्यदानी । बळीच्या दानीं । शिवदानी । रुक्मिणी । नामीं तरले पार उतरले ॥ विठ्ठल ध्यातो मनीं । परशराम म्हणे नाम हरीचें घेतां । नाहीं बहुत ओझें । मी नर्मी तरणी माया तरणी । देहभान गेलें हरी तुझें । चक्रपाणी नको धरूं पाणी० ॥ ४ ॥

## लावणी ६ वी.

॥चाल॥ कुंकू कपाळीं शोभत नाहीं रत्नागिरीच्या जोतिबा ।
माझें हें रूप स्वरूप चांगलें झाला आहे तोबा तोबा ॥

चाल. दुसरी

आला हो वनवास पति गेला नवतीचा गडे चहाणारा॥
आतां समजलें राजा भर्तृहरी भरतपुरचा राहणारा०॥
गणगोतानीं आशा सोडली संसाराला हात धुतले ॥
जीव घेवो त्याचे नवरे परपुरुषीं हें मन रतलें ।
गणगोतानीं आशा सोडली संसाराला हात धुतले ॥ धृ०॥
पूर्ण ब्रह्म जो ब्रह्म सनातन ज्याला ध्याती धुरजटी ॥
यज्ञ याग जपतप साधन ज्यास्तव करिती अटाअटी ।

त्या हरीला जिंतून सहपरिवारें यमुनातटीं ।
यज्ञशाळा उभविल्या हरोहरीं दिव्य तरूच्या पर्णकुटी ।
गोपाळांसहित विसरून शिंदोऱ्या आलों आनंदी जगजेठी ।
गोपाळ ह्मणती कसें करावें क्षुधा लागली हरी मोठी ।
ऋषीपासून जा अन्न आणारें हृद्गद जाणून सांगितलें ।
गणगोताची आशा सोडली संसाराला हात धुतले ।
जीव घेवो लग्नाचे नवरे परपुरुषीं हें मन रतलें । गण० १ ॥
ज्यास्तव करती यज्ञ ऋषी तोच उपाशी वनीं आला ।
श्रीरंग स्वमुखीं अन्न मागतो भाग्योदय तुमचा आला ।
ऐकून उत्तर अवघे क्षोभले क्रोधें धुनकारून त्याला ।
अवमानून परतविलें दांभिक भक्ती भुलले वेदाला ।
ह्मणून आपल्याकडे पाठविलें अवघ्याजणी सख्यांनो चला ।
या भक्तीला आग लावा निष्काम फक्त कटफाला ।
सकळ विषय हा भावें पुजितां मग जिंतले ।
गणगोताची आशा सोडली संसाराला हात धुतले ।
जीव घेवो लग्नाचे नवरे परपुरुषीं हें मन रतलें ॥ २ ॥
चंचळ झाल्या ऋषीपत्न्या त्यांनीं षड्रस अन्न हे भरले ।
एक राहिली मार्गी निपट तिच्या पतीनें तिशीं धरलें ।
न पुसतां कशी जाशी जारणे विधी इंद्रानें तुशीं वरिलें ।
बंधन करितां उत्तर करी सग अनंत जन्मीं मी फिरलें ।

स्थूळ सूक्ष्म कारण महाकारण चार देहांतून तीन उरले ।
स्थूळ देहाचा स्वामी तुझा तूं होऊन नातें हें ठरलें ।
भजनीं पुजनीं निमग्न होऊनी हरीपदीं मन रमलें ।
अवघ्याजणी उद्धरल्या देवा भागवतीं व्यासीं कथिलें ।
गणगोताची आशा सोडली संसाराला हात धुतले ॥
वीस येवो कशाचे नवरे परपुरुषीं हें मन रतलें ॥ गण० ३
सकळ गोपी विषयानें तरल्या परपुरुषीं ज्यांचें मन रमलें ।
प्रकृति दृष्टि पाहतां कवलें । उफराटें सकळांत दिसलें ।
तैसा नारदी जाऊन द्वारके सोळाहजारां घरीं पुसलें ।
ऐकून मरला रागें त्यावर अक्षरुद्ध गदगद हांसले ।
परपुरुषाला गावें ध्यावें स्वहित करणें जर असलें ।
नामी विठल करून पसारा परशराम म्हणें जिवीं रुतलें ।
गणगोताची आशा सोडली संसाराला हात धुतलें ।
वीस येवो कशाचे नवरे परपुरुषीं मन हें रतलें ॥ गण० ४ ॥

## लावणी ७ वी.

॥ चाल भूपाळी.

शुद्ध सत्व ज्याची क्रिया तयाला कांहींच अवघड नसे ।
क्रियाहीन जे नाडक प्राणी सुख कणा हीन जसे ॥ धृ० ॥
जन्म पुराण घटांत झाला नाम अगस्ती तया ।
पुरा तयाचे वय नाहीं तनु जया ।

भोजपत्र आणि वस्त्रउपवनु ज्याशीं लया।
कंदमुळांविण आहार न रुचे मन जळगंगा जया।
उदरीं भस्म केलें आतापि वातापि दैत्य पावले लया।
इलविल तिसरा समुद्र लपाला देह आपुला जगवाय
तीन आचमन केले सिंधु सगळा एक दैत्याच्या मि
लघवी करून रत्नाकर भरला अद्यापि जळ खारसे।
शुद्धसत्व ज्याची क्रिया तयाला कांहींच अवघड नसे।
क्रियाहीन जे अमुक प्राणी भुसकणाहिन जसे॥ शु० १.
कणाचक्र पहा एकच घोडा सूर्याच्या रथीं असे।
अरुण सारथी तोही लोला हातपाय त्याशी नसे।
निढळ मार्गी फिरे आकाशीं आधार कांहीं एक नसे।
एक कणा मेरूच्या मस्तकीं कळ राहटी फिरतसे।
असें रणकंदन करीत असतां चळी जातसे।
छपन्नकोटी भवता फेरा साठ घड्या पुरतसे।
सहज नखाग्रीं लागे ज्याला पृथ्वीवर प्रकाशे।
शुद्धसत्त्व ज्याची क्रिया तयाला कांहींच अवघड नसे।
क्रियाहीन जे अमुक प्राणी भुसकणाहीण जसे॥ शु० २॥
देहकांती सुकुमार शेषाची दडदोर ज्या हरी।
करश्रवण नाहीं वाटव हरी करी।
पोटानें चालला वेटोळें घालून निद्रा करी।

सकल सृष्टीचा भार केवढा अखंड वाहे शिरीं ।
अभक्ताच्या भावें दुखें ओकित गरळा विषें ।
जेव्हां तेव्हां फडी सरसावी पृथ्वीकंप होतसे ।
शुद्धसत्व ज्याची क्रिया त्याला कांहींच अवघड नसे ।
क्रियाहीन जे अमुकप्राणी० ——— ॥ ३ ॥
विजयी लंका अथांग दर्या भौतीं खंदक भरून ।
तेहेतीस कोटी देव रावणें बंदीं घातले धरून ।
अजिंक्य झाला तो सर्वांला तप सामर्थ्यें करून ।
नवग्रहांच्या करून पायऱ्या नित्य वागे त्यांवरून ।
एक वचनी एक पत्नी श्रीरामचंद्र अवतरून ।
निराहार व्रतें सौमित्रें धरिलें चवदावर्षं पुरून ।
फळाहारी आठरा पद्में क्रियावंत येतसे ।
म्हणून घेतली लंका विठू परशराम गातसे ।
शुद्धसत्व ज्याची क्रिया त्याला कांहींच अवघड नसे ।
क्रियाहीन जे अमुक प्राणी भुसकणाहीन जसे ॥ शु० ४ ॥

✓ लावणी ८ वी.

॥ चाल ॥ मला लेकरूं झालें मी बाळंतीण ही सहिन्याची ।
का हो स्वामी जलदी करता मजपाशीं येण्याची ।
चला चला गोपिनो अशा ह्या नवती गौपदाराई ।
रथीं बसून बळी रामकृष्ण अक्रूर नेतो मथुराई ॥ धृ० ॥

कोण आला रथवाला नकळे कपटी त्या रुपाचाई ।
त्वरें चला पुसूं यशवदेला कुठे तरी हरी आमुचाई ।
धनुर्याग कंसानें मांडिला वैरी तो मुळचाई ।
अक्रूर मनचा निष्ठुर इतका आला स्नेही त्याचाई ।
चाल। या सोळा सहस्त्र गोपिका येऊन विनविती ।
जधींपासुन हरी जन्मला आनंद चित्तीं । यशवदे ।
नाहष्टी पडतां आमचे प्राण जाती । यशवदे ।
चाल । गोपाळ गोधनें होतील देशोधडी ।
मंजुळ मुरलीविण भयाण यमुना थडी ।
तो आत्म जिवाचा सखा न आमचा गडी ।
त्याविना गमेना आम्हांस एक पळघडी ।
चाल । कसें वदवलें कर्महीन त्या पडल्या विचाराई ।
तटस्थ अवघें गोकुळ नघेती पशुपक्षी चाराही ॥
चला चला गोपिनों अशा ह्या वदती गोषदाराई ।
रथीं बसून बळीरामकृष्ण अक्रूर नेतो मथुराई ॥ १ ॥
मार्गावर बैसुनया नित मुरली वाजवितो ।
धरी कुचाग्र दाबूनया आवळून गळा पडतो ।
जळो गोकुळची वस्ती हरी मस्कऱ्या करितो ।
रंगाची झाली गर्दी वयाची शुद्ध नाहीं । अरे हो ।
नट नाटक चेटक या या गोकुळांत बाई ।

आम्ही जातों मथुरेशीं हा आडऊनि दान घेई ॥ २ ॥

## लावणी ९ वी.

॥ चाल ॥ दिल्ली शहरचा बटाव पंची स्वरूपानें सरस ।
मायबापाचा त्याग करून आला अमदानगरास ।
मी चांगट फांकडी रूपानें तूं काळा बेंदरा ।
दूर होय वाट नको धरूं पदरा, चित्त चोरट्या धिरा॥ धृ० ॥
वय तरण्या आम्ही गरती देखण्या एकीहून एकरूपचढी ।
वाट सोड आज हाट मथुरेचा आहे जाणें तातडी ।
जर दंगा बेढंगा करशील श्रीरंगा तूं या घडी ।
कवलाचा बाजार कोण लावील फुलाची छडी । चाल ।
दहीं दुधाच्या कावडी । माठ भरून ।
तुझे आडवे झाले गडी । वाट धरून ।
नाहीं चालणार कांहीं अटी । बोल दुरून ।
मीड [illegible] म्हणून गाई केली मुरचत धरली जरा ।
॥ कान कोलरून हालांत घेईन मुकाच जाशिल घरा ॥
मी चांगट फाकडी रूपानें तूं काळा बेंदरा ।
दूर होय वाट नको धरूं पदरा । चित्तचोरट्या धिरा ॥ १ ॥
वनमाळा घाली गळां हातामधीं वेळूची बासरी ।
पर मोराचे डोईवर बांधून मुगुट सिरविशी शिरी ।
कान्हे कोसे कुमडे मैपे मुलें गवळ्याचीं हरी ।

मिळवून करशील धिटाई तेव्हां मी नाहीं दुरी ।
जर कां मजवर धिटाई करशील तेव्हां गोष्ट नाहीं बरी ।
तुझी कळंदे मज मनसुबी । बोल दुरून ।
जें दान होईल वाजवी । न्याय करून ।
काय असेल मनामधीं खुबी । दाव करून ।
पाप नजर तुझी परनारीवर जनांत हा बोभारा ।
नाहीं वाघाचे वाडे-वसले पहा विचारून जरा ।
मी चांगट फाकडी रूपानें तूं काळा वेंदरा ।
दूर होय वाट नको धरूं पदरा, चित्तचोरट्या धिरा ॥ २ ॥
गोरीपान लसलसीत मी गवळण चांगट फाकडी ।
नग डागिने जडाव अगदीं, मस्तकीं मुद राखडी ।
जुरत कोणाची पाहील मजकडे नजर करून वांकडी ।
नाकेदार म्हणशील गोकुळचा घेऊं चवकीरोकडी ।
नवी सरणी जान जमान । कांहीं वदर ।
नको आसडूं लचकेल मान । सोड पदर ।
चांगट म्हणून येशील छान । सांग सदर ।
नायकांत नायकण होऊन तूं बसली पाहशील कुरा ।
धुळ घालून जाऊं मथुरेशीं आम्ही कंसाच्या घरां ।
मी चांगट फाकडी रूपानें तूं काळा वेंदरा ।
दूर होय वाट नको धरूं पदरा ॥ चित्तचोरट्या धिरा ॥ २ ॥

अनंतरंग जो श्रीरंग आवडे चित्तापुन गोपिसी ।
वियोग तयाचा घडी नसावा ही इच्छा मानसी ।
तो नाबोले आपुणच बोले करून भलती हांशी ।
आधीं माया लाऊन प्रीतीनें वश केलें हृषीकेशा ।
करी विलास यमुने तिरा । दहीं लुटाव ।
कवि नामी विठ्ठलची तऱ्हा । खूप घटाव ।
परशराम येसूचें छंद शिरा । करी कटाव ।
सहजलीळा मांग टिळा कशाला दे वचन इल शिरा ।
अशी पोटाची कमाई लाभल पहा विचारून पुरा ।
मी श्रांगट फाकडी रूपानें तूं काळा बंदरा ।
दूर होय वाट नको धरूं० ———————— ॥ ४ ॥

## लावणी १० वी.

॥ चाल ॥ घनश्याम सुंदरा श्रीधरा अरुणोदय झाला ।
उठ लवकरी वनमाळी उदयाचळीं मित्र आला ।

होनाजीबाळा.

उठ झाला प्रातःकाळ तुझे गोपाळ आले घननीळा ।
पूर्वदिशे उगवला भानू आला उदयाचळा ।
पाणिमात्र पशुपक्षी विश्रांतवृक्षी आपापल्या स्थळीं ।
निद्रा सारून जागृत होती पंच उषःकाळीं ।
[illegible] तापसी गुप्त जळीं स्थळीं ।

सकळ विहंगम काक पिंगळे किजबिजती एकेवेळीं ।
रावे मयुरे हंस साळया सुस्वर मुखकमळीं ।
सद्-भावें तुज गाती ध्याती स्वमुखें नामावळी ।
मंथनास प्रारंभिली गोपी घरोघर त्या गोकुळीं ।
सडासंमार्जन करून घालिती रंगमाळा रांगोळी ।
कनकाचे घट शिरीं यमुनातिरीं जाती आणूं जळा ।
पूर्वादिशे उदयला भानू आला उदयाचळा ।
उठ झाला प्रातःकाळ तुझे गोपाळ आले घननिळा ।
पूर्वदिशे ०———————॥ १ ॥

क्षुधित वासरें सोडून-धार आणी काढून, झडकरी ।
गोपवृंद उभे द्वारीं वहाती, मुखमार्जन तूं करीं ।
दधि दुग्ध नवनीत साय ही तुखीं भरी ।
घृतमिश्रित शर्करा उभी मी घेऊन आपुल्या करीं ।
मधुसूदना माधवा मुकुंदा नारायणा नरहरी ।
रामकृष्ण विष्णु सर्वोत्तम आलाशी मम उदरीं ।
त्रिविक्रमा केशवा जनार्दना गाया स्तवी यापरी ।
उठ कान्हा तान्हज्या आळवितां शिणली ही वैखरी ।
निद्रा तुझी कशी नासरे-माझ्या तूं भक्तवत्सला ।
पूर्वदिशे उदयला भानू आला उदयाचळा ।
उठ झाला प्रातःकाळ तुझे गोपाळ आले घननिळा ।

नामीं विठ्ठलपद प्रीति-परशराम गीति गाई हरीलिळा ।
पूर्वदिशे उदयला भानू आला उदयाचळा ।
उठ झाला प्रातःकाळ तुझे गोपाळ आले घननिळा ।
पूर्वदिशे०-----------॥ ४ ॥

लावणी ११ वी.

चाल ॥ घनःशाम सुंदरा श्रीधरा अरुणोदय झाला ।
उठ लवकरी वनमाळी उदयाचळीं मित्र आला ।

हे नाजीबाळा -

तुझी लीळा तूंच वदविशी बहुएक नानापरी ।
करतां तूंच करविता वेगळा होऊनियां श्रीहरी ॥ धृ० ॥
दहा गर्भवास त्वां सोशिले भक्ताचे संकटीं ।
शंखासुर मर्दिला समुद्र मंथिला, धन्य तुझ्या हतवटी ।
चवदा रत्नें काढिलीं हरी हीं परोपकारासाठीं । चाल ।
धरी कासवरूप आगळें पृथ्वी रसातळा जातां ।
पाठीवर धरिशी । सर्व तूंच रक्षिता ।
कां संकट हें तुजला । दाविशी लीला भक्ता ।
वराह वेष नटलास हरी तूं पृथ्वीचा कैवारी ।
रसातळां जातां तेव्हां मग धरीशी दाढेवरी ।
तुझी लीळा तूंच वद० ॥ १ ॥
नरसिंह रूप धरिलेंस तेव्हां खांबामधीं गुरगुरी ।

हिरण्यकशिपु मर्दुनि प्रल्हादा राज्य देत श्रीहरी ।
वामन रूप हें लहान धरिलें मन्य कळा कुसरी ।
जगदाता सर्वांचा बळीचें दान घेतसें करीं । चाल ।
अर्धपाद भूमि । कमी आली वचनाशी ।
बळी म्हणे शरीर । घे अर्ध पांडाशी ।
असें वचनीं गुंतउनी । शेवट घाली पाताळाशी ।
असा तूं साह्य झाला । त्या इंद्राचे समयाशी ।
परशु धरिलें हातीं निक्षेत्री मातेचे कैवारी ।
कसाची तूं नटले कधीं म्हणविशी ब्रह्मचारी ।
तुझी लीळा तूंच वदविशी ० ॥ २ ॥
रामअवतार धरशी तेथें बहु दाविली लिळा ।
रावण वधुनि बिभिषण स्थापी प्रताप बहु आगळा ।
श्रीकृष्ण नटशी चिमणी आकृति तें जेव्हां गोपाळा ।
मातापितूंचेवारें बंदीच्या तोडुनियां श्रृंखळा । चाल ।
कंसासुर वधुनियां । खेळे विलास गोकुळीं ।
गोपिका वश केल्या । मन मोहित वनमाळी ।
केले पराक्रम भारी । धरी पर्वत अंगोळी ।
रासक्रीडा बहु केल्या । कपटी पूतना निर्दाळी ।
असे विलास नाहीत झाले कोणतेही अवतारीं ।
चैतन्य बाळाशी संकटें कोण आला निवारी ।
तुझी लीळा ० ॥ ३ ॥

कलंकी पुढें होणार शास्त्री भेद असा कथिला ।
असे अनंत अवतार तुझे हे शेष वर्णितां शिणला ।
मी काय वर्णू एक मुख वैखरीशी शीण आला ।
कळा वेगळा करून निराळा भक्तिभावें गुंतला ॥ ४ ॥

## लावणी १२ वी.

चाल ॥ घनशाम सुंदरा श्रीधरा अरुणोदय झाला० ॥

होनाजीबाळा.

जग जायाचें जसें अशी ही क्षणभंगुर काया ।
हरिभजनीं असावें सावध होशी वृथाच मग जाशी वाया ॥ ध्रु०
चवदा कल्प आयुष्य ज्याला तृण शिरीं ज्याचे अहोरात्रीं ।
तेही मानिती तसें पाहून तुमची आमची कथा किती ।
बगदालभ्य कपिल लोमेश रोम झडे एक कल्पांतीं ।
महान महान असंख्य ऐसे होऊनि गेले आणि होती ।
असे स्वताला साच मानुनि भ्रमिष्ट जर करशील काया ।
हरिभ० जग जा० ॥ १ ॥

रा अक्षरीं अनादि सिद्धी मकार झाला मग पुढती ।
दो अक्षरीं सार निवडूनि कंठीं वाहे उमापती ।
विषाचें अमृत नामें प्रल्हादाला प्रचिती ।
नामें तरला गजेंद्र गणिका नारद भ्रमती त्रिजगती ।

वेदवाणी कुंठित झाली श्रवणीं बसली ऐकाया
। हरिस० । जग० ॥ २ ॥
परीक्षिती हरी गर्भी असतां नांव ठेविलें परीक्षिती ।
साता दिवसीं मोक्ष साधला अक्षई किमया आली हातीं ।
उद्धवास साधला लाधला जातां जातां जगत्पती ।
तोच नामा तुकयावाणी होऊनियां नामा गाती ।
अजामिळ हा नामें तरला दीनावर करितो छाया
। हरिभज० जग०॥ ३ ॥

### लावणी १२ वी.

॥ चाल भूपाळी ॥

त्रिगुणांचें तीनपण केलें सर्व पाहिली मजा ।
आत्महित काय जन्मून केलें मी अपराधी तुझा ॥ ध्रु० ॥
मूळ जननीच्या जठरीं जन्मलों उत्पन्न झालों जेव्हां ।
नवमास भागासी आला इथून सोडवी देवा ।
मागा जन्माची आठवण प्राण्या माहित होती तेव्हां ।
नवजन्मांची दुःखें रडसी कांहींच नाहीं अनुभवा ।
चाल ॥ आली बाळदशा गोजरी । लेण्यानें दिसे साजरी ।
लेवविती वस्त्र भरजरी । शोभवते हात गुजरी । मोड ।
पके लावि पेकनची बोलतात हित गुजा ।
पाळण्यांत घेऊन निजविली हाळवीर म्हणती निजा ।

त्रिगुणांचें तीनपण केलें सर्व पाहिली मजा ।
आत्महित काय जन्मून केलें मी अपराधी तुझा ॥ १ ॥
बारा सोळा वीसपंचविशी तारुण्याचा भर ।
मद विषयांमध्यें चाले उताणा पगडी कानावर ।
वडिलांचें सांगितलें ऐकेना हित अनहित तिळभर ।
खास सोयरे बोलती बळानें दौलतीची भरभर ।
चाल । तीस चाळीस आले घडून । अवघ्यांवर जरब कडकडून ।
इच्छिलें कार्य ये घडून । चालता काळ चहूकडून । मोड ।
पुजेचा वर खटलान पडल अर्धे आयुष्य झालें वजा ।
नेम धर्म तीर्थ नाहीं घडलें आणिक साधूपुजा ।
त्रिगुणांचें तनिपण केलें सर्व पाहिली मजा ।
आत्महित काय जन्मून केलें मी अपराधी तुझा ॥ २ ॥
साठसत्तर वर्षें झालीं आली उतरती कळा ।
शाम केस सफेत झाले मंद दिसतें डोळा ।
दंत भग्न झाले मुखाचीं लाळ गळे भळभळा ।
कोण कोठून आलें म्हणून पुसतसे हात लाऊन निढळा ।
चाल । उठतां बसतां संकटीं । बुलबुला हाले हनवटी ।
जवळ कोणी नये शेवटीं । अवघ्यांशीं पडल्या तुटी । मोड ।
स्त्री शेजेची राग करिती असूस तरी हरी भजा ।
शरीर संपदाही निघून जाईल आपण देतील निजा ॥

त्रिगुणांचें तीनपण केलें सर्व पाहिली मजा ।
आत्महित काय जन्मून केलें मी अपराधी तुझा ॥ ३ ॥
पैकीं नव्वद वर्षें झालीं अझून नाहीं भरला धुरा ।
पित्त कफाचा अम्मल बसला कंठ वाजे घरघरा ।
गुदद्वारानें धीर सोडला वाजतसे भरभरा ।
बळें खाटेवर नेऊन निजविती ओढूनिया फरफरा ।
चाल । घर थुंक्यानें नासलें । शेजारी जन त्रासले ।
शत वर्षें दुःख सोशिलें । हें असें खचीत भासलें । मोड ॥
विठ्ठल नामें परशराम ह्मणे चुकलों कीं मूळबिजा ।
रामकृष्ण गुणी रामा गाती नामें लाऊन ध्वजा ।
त्रिगुणांचें तीनपण केलें सर्व पाहिली मजा ।
आत्महित काय जन्मुन केलें मी अपराधी तुझा ॥ ४ ॥

## लावणी ९४ वी.

चाल ॥ नाजुक साजुक कळ्या पिवळ्या गुंफिन आप हस्तकीं ।
प्राणविसाव्या बैस मंचकीं तुरा खोवीन मस्तकीं ॥
दुर्घट माया ब्रह्मादिकांही ऐक कवीच्या मुला ।
शेषाला नाहीं अंत लागला काय समजलें तुला । ध्रु० ॥
अशी माया कोणी पाहिली कोण पुरुषाचा पुरा ।
खाणापरी अवर्षन मुंकती दृष्टि गार ना हिरा ।
निराकार जे निर्गुण ज्योति अभंग अक्षई धुरा ।

इच्छा रचना त्यामधें मिश्रित मूळबीज हें अंकुरा ।
नर नारी जेथें नांवच नाहीं ह्मणशील कलगी तुरा ।
ज्योतीचीं काजळी गोठली विराट् स्वयंभू चिरा ।
विघ्न वाहाली त्यावर केली कोणी प्रमाण बोला ।
आकूट यक्र हेंच अखंडित श्रीगुरुमुखें दाखला ।
दुर्घट माया ब्रह्मादिकांही ऐक कवीच्या मुला ।
शेषाला नाहीं अंत लागला काय समजलें तुला ॥ १ ॥
निरगुण शून्यापून शून्याकार निरगुण इच्छाबळें ।
इच्छा नारी अचळ चळेना ज्योतिर्मय आगळें ।
शून्यापासून ध्वनि निघे अगणित असे केवळ ।
स्वयं ओंकार ह्मणती तयाला शून्य तेंच मावळें ।
ओंकारांतून माया झाली हिऱ्याहून झळझळें ।
मायापासून त्रिगुणात्मक हे तिन्ही गुण जावळें ।
आजी आली माय मावशी चारी नाहीं जिला ।
स्त्री भगिनी ती कन्या सातवी दोष ठेवी तिला ।
दुर्घट माया ब्रह्मादिकांही ऐक कवीच्या मुला ।
शेषाला नाहीं अंत लागला काय समजलें तुला ॥ २ ॥
निज वस्तु संचली अभास ज्योतिर्मय झगझगी ।
त्या भवतींच पाहुन मूळ माया तगमगी ।
शून्य आकारी येऊन गगन खाण कलगी ।

गगनापासून वारा गव्हारा तुरा ह्मणशील जगीं ।
वायूपासून तेज निजपलें अग्नीपरी धगधगी ।
तेजापासून आप आपापून वर पृथ्वी उगमगी ।
पंच मिळून मुसीं ओतलें ब्रह्मांड तंतुपट विणविला ।
शून्यापासून आंख नव झाले पुढच्या योग्य गणणीला ।
दुर्घट माया ब्रह्मादिकांही ऐक कवीच्या मुला ।
शेषाला नाहीं अंत लागला काय समजलें तुला ॥ ३ ॥
महतभूतापुन पंच भुतातें एकमेका प्रसवली ।
जस्मून मायाचक्र भ्रमती नांव नसे त्याप्रती ।
मायेनें त्याचें नांव ठेविलें ऐका कोणे रीति ।
प्राण अपान व्यान उदान समान जी उत्पत्ति ।
त्या हननी रता परमात्मा ज्योती तेथें मायानिवृत्ति ।
सहा चक्र उभविले उभारी चैतन्यापुन रीति ।
जीव शिव दोन्ही भावें मागून चैतन्यघन कोंदला ।
ह्मणून ह्मणती चैतन्य माया कोण पाहुनि आला ।
दुर्घट माया ब्रह्मादिकांही ऐक कवीच्या मुला ।
शेषाला नाहीं अंत लागला काय समजलें तुला ॥ ४ ॥
त्रिगुण नार गुण प्रकृति पुरुष धातुमय एक मुशी ।
पिंड ब्रह्मांडाची रचना झाली तिघांत ऐका अशी ।
अगाईस सगुणास आणिलें स्वइच्छा समरसी ।

ह्मणून श्रीभगवान नांव ठेविलें परी माया इलसी ।
साधुसंत निरगुण मिळाले महान महान ते ऋषी ।
कोणीच माया नाहीं पाहिली ह्मणून अगोचर पद इशी ।
घडमोडीच्या अनंत कोटी अंत नाहीं लागला ।
तुमची आमची कथा किती जेथें सहस्रमुख भागला ।
दुर्घट माया ब्रह्मादिकांही ऐक कवीच्या मुला ।
शेषाला नाहीं अंत लागला काय समजलें तुला ॥ ५ ॥
निरगुण ज्योति सगुणमाया हेंच खचित अनुभवी ।
सगुणावांचून निरगुन भक्ती न घडे काळत्रयीं ।
उंच नीच कोणास म्हणावें सगुणाचे गंधर्वमही ।
एक पक्षीं जर निंदा करशील जाशी तूं खरवी ।
मायबापाची सेवा करून दे वच आणिलागाही ।
खरी सनद परी नयनीं पाहून भाण्या शाहाणा होई ।
विठ्ठल वरदे परशराम ह्मणे आला भाग चांगला ।
निंदा द्वेष कसेंही गाऊं हाच छंद लागला ।
दुर्घट माया ब्रह्मादिकांही ऐक कवीच्या मुला ।
शेषाला नाहीं अंत लागला काय समजलें तुला ॥ ६ ॥

लावणी १५ वी.

चाल ॥ सवती सवतीचा कज्जा लाऊन तुह्मी देतां स्वामीराया ।
लाऊन पदर मुखीं आडवा हांसतां नाहीं तुह्मा तिळभर माया ॥

केस थोडे थाई पुरुष इतके करू करू बसले तपी ।
इतकें करून पतिव्रता मी आगळी घर माझें निजरूपीं ।धृ० ।
त्रिगुण तीयाशाची झोपडी दहा दरवाजे तिला ।
कडी कवाडें असून उघडें एक, महामुर कवीला ।
पांचांचा परिवार पंचवीस घरांत नित गलबला ।
सासू आशोच्या प्रपंच सासरा नित्य गांजितो मला ।
कामक्रोध दीर फारच खंदे जीव माझा काहवला ।
आशा ममता जावा यांनीं घरचा बाहवला ।
नणंद ही कल्पना घडोघडी लोटूं पाहे तमकुपी ।
इतकें करून पतिव्रता मी आगळी घर माझें नीजरूपीं ।।१।।
पति संसार दुःख मज देतो सुख नाहीं पळघडी ।
मन आवरून म्यां बळेंच धरिलें त्याशीं केलें निजगडी ।
ऐसा पायथी बोध बोला अनुताप कडकडी ।
घर मायावी सांडून निघालें निसंग जणु घातली उडी ।
मायबाप दोन जिवें मारले झालें जनरी सडी ।
गणगोतांची आशा सोडली सहा चवघांच्या रूढी ।
दुष्टाई तीन एक मुलाहजी दीप लाविला छिपी ।
इतकें करून पतिव्रता मी आगळी घर माझें निजरूपीं ।।२।।
वैराग्य वस्त्री सेज उभारून केली म्यां सडी पट्टी ।
ज्ञान अंजन घालून डोळां वळली फिर आडुडी ।

नाम पुष्पें हार गजरे गुंफले घेऊनं चंदन उटी ।
परपुरुषाची वाट पाहातसे बसून निरंजन मठीं ।
रात्रंदिशीं एक तार लाविली कधीं पाहिन हटतटीं ।
निसंग झालें सवरी मवरी अक्षदा बळवटी ।
कुमारपण नाहीं अझून मोडलें करूं नका अद्यापि ।
इतकें करून पतिव्रता मी आगळी घर माझें निजरूपीं ॥३॥
एकापासून अनेक झाले अगणीतले नेणों किती ।
परपुरुषावीण नगमे पळभर ह्मणून मी नीत सती ।
नवेंपण माझें अझून सरेना कुंठित झाली मती ।
ज्यासाठीं भ्रमणीं पडलें ती वस्तु आली हातीं ।
जिकडे तिकडे माझीच मी बाई आनंदली चित्तवृत्ति ।
नासी विठ्ठल परशराम येसू छानून गाती रती ।
रामकृष्ण गुणीं रासा सार अक्षरें वोवुनी गुंफी ।
इतकें करून पतिव्रता मी आगळी घर माझें निजरूपीं ॥४॥

## लावणी १६ वी.

चाल ॥ सवती सवतीचा० —— ॥
दह्या शिवळन्या करीन परंतु एक लग्नाचा नको नवरा ।
माहेरीं माझें चित्तमन रमलें सासरचा नलगे वारा ।
दह्या सिदळन्या करीन परंतु एक लग्नाचा नको नवरा ॥धृ०
आधींच मी चंचळ पहिल्यापुन मूळ माहेरीं गडे फंद पडला ।

घर भावाचें बळें निघालें त्याचा माझा संग घडला ।
रुस्तम काठी अक्षई दोन्ही सत्वावर डोळा जडला ।
त्रिकुट चोहोटा पाल मांडिलें यथार्थ पाहूनया पुढला ।
दहा दारीं नित गरका घालून प्राणसखा एक निवडला ।
गणगोताशीं निसंग होऊन नाहीं मानलें मीं वडिला ।
सहा सवघांचे वसनें रिझले म्हणून जीव झाला सवरा ॥
दहा शिंदळक्या करीन परंतु एक लग्नाचा नको नवरा ।
माहेरीं माझें चित्तमन रमलें सासरचा नलगे वारा ।
दहा शिं० ॥ १ ॥
मरज्वानीचा धूर डोळ्यावर कळो लागली जिनबाजी ।
आधींच मन मोहिलें तुम्हास्तव पत लावून केली राजी ।
कामक्रोध हे सर्व छपाऊन सोदे शिकंदर गडे पाजी ।
वैराग्य पलंगीं शेज सवारून नामावर पुष्पें ताजीं ।
पर पुरुषाची चटक लागली त्यावर मर्जी खुप माझी ।
वीर भावें जाता नणदा प्रपंचांत पडले माजी ।
सासु विषया प्रपंच सासरा ठिकाणींच आपला डबरा ।
माहेरीं माझें चित्तमन रमलें सासरचा नलगे वारा ।
दहा शिंदळक्या करीन परंतु एक लग्नाचा नको नवरा ।
माहेरीं०————————॥ २ ॥
महाजनी मी वसांत आणिल्या प्रेमानें पाजून पाणी ।

नवाजणींची संगत घडली सोन्याचें काजळ नयनीं ।
कुंटण जगाची जुनाट पक्की तिनें बिर फुंकून कानीं ।
तेच शब्द मीं हृदईं धरले इतर पसारा धुळधाणी ।
चढून घाट अवघड वाट वर वाहे झुळझुळ पाणी ।
सतरावीपुढें दुसरी तिसरी एकीहून एकचढी शाहणी ।
त्रैअवस्था त्रिवेणी संगम घणघणाट घणके भवरा ।
माहेरीं माझें चित्तमन रमलें सासरचा नलगे वारा ।
दहा शिंदळक्या करीन परंतु एक लग्नाचा नको नवरा ।
माहेरीं०————॥ ३ ॥
परेहून परता त्याहून वरता परपुरुष पाहून बाई ।
करून इतकें पतिव्रता मी मन थाला माझें ग्वाही ।
आजवाचें बोलणें साहिलें सासर ना माहेर कांहीं ।
फुटलें जातें तुटलें नातें अंतर खुण मनीं समजावी ।
पतिव्रतेला विचार ऐसा जागे सख्यांनो लवलाही ।
विठ्ठलवरदी परशराम गुण येसू नामीं छंद गाई ।
चंगावरती निशाण कलगी बांधून गातों ब्रीदचवरा ॥ ४
माहेरीं माझें चित्तमन रमलें सासरचा नलगे वारा ।
दहा शिंदळक्या०————॥ ४ ॥

## लावणी १७ वी.

चाल ॥ रतिवंत महाराज पेशवे अमोलिक स्तुति मोती ।
सवाई माधवराव स्वारी निघाली नबाबावरती ॥
श्रीमंताच्या बावन पागा त्यांमधीं बावन सरदार
रघुजी भोसले दौलतराव शिंदे तुकोजी होळकर ॥

अंतपार नाहीं हरीचा कळला बोलती शास्त्र श्रुती ।
शेषाला नाहीं अंत लागला कुंठित झाली मती ॥ धृ० ॥
चार युगें सहस्र वेळां एक ब्रह्मयाचा दिवस झाला ।
तितकीच युगें रात्री खालीं करून वांटणी नीट बोला ।
सवा लक्ष घडी मोठी विळभर आणू विश्रांती नसे ज्याला।
एक्या दिवसांतून चवदा इंद्र दहा अवतार महाविष्णूला ।
असे दिवस ब्रह्मयाचे तेंव्हां घडी भरतसे विष्णूला ।
विष्णु घडया जंव बारा लक्ष पळ येतसे शिवाला ।
तिन्ही देवाला तीन शंभर आयुष्याची एकच गणती ।
हिशोब येईल तर करून पाही दूर कर तुझी लीळावती ।
अंतपार नाहीं हरीचा कळला बोलती शास्त्रश्रुति॥ शे०॥१॥
शंभर वर्षे आयुष्य विधीला किती युगें झाली कर गणना ।
विष्णु महेशा अंत होय जंव मार्कंडीचा कल्प म्हणा ।
महान महा असे आयुष्याचे जाती एकाहूनि एक शहाणा ।

शेष मुखांतून लोंडाळ बोलका एक निवडून दाखीव शहाणा ।
वद मानवा राजेंद्र शिणला पार नाहीं कळला कवणाला ।
सद्‌गुरुवांचून न पडे ठाई साधुसंत जाणती खुणा ।
तोडसटाळे हिशोब पुसतां ढोळी मानतो घरीं येईना ।
लीळावतीचे पाहून अडाखे ज्याशीं त्याशीं घाली पैना ।
अशे असंख्य युगें एकसहा होती ।
अशीं चार सहस्रयुगें त्यावरून गणना होती ॥
अंतपार०—॥ २ ॥
सतरा लक्ष अठावीस हजार कृतयुगाचें प्रमाण ।
बारा लक्ष शाणव हजार त्रेतायुग ह्मणती जाण ।
अठरा लक्ष चवसष्ट हजार द्वापाराचें संपूर्ण ।
चार लक्ष बत्तीस हजार कली चालतो विद्यमान ।
चवयुगांचा धुरा एकंदर बैस सांगतों कर मनन ।
लक्ष त्रेपन वीस हजार बेरीज याशीं घे करून ।
यापरी निर्णय असा युगांचा करून दाखवी भिन्न भिन्न ।
नामीं विठ्ठल परशराम म्हणे कळों येईल गुण अवगुण ।
रामकृष्ण गुणीं रामा गातो फार अक्षरें निवडून रती ।
वितंडवादी वाद करूनी जातील अधोगती ।
अंतपार नाहीं हरीचा कळला बोलती शास्त्रश्रुति ।
शेषाला नाहीं अंत लागला कुंठित झाली मती ॥ ३ ॥

## लावणी १८ वी.

चाल ॥ हा फंदी फाकडा मज सांपडला गुंडा ।
चालू दे प्रीति शेवटा देवा मार्तंडा ।
शिपाई चाकरी गेले नागपुराला ।
केली वाणी उदमी डाला बांधू लागला ॥

कुशाबा.

चाल दुसरी.

या काय भाग्याची संपत्तीचा पिंगा । या मानवदेहीं भजरे श्रीरंगा ।

रामजोशी. ( चवदा अक्षरी. )

पार्वती पुसे खूण अंतरींची शिवसांबा ।
तुम्ही भजन कोणाचें करितां मज आचंबा ॥ ध्रु० ॥
भीड अपर्णेची जाणूनी वदे शूळपाणी ।
मूळ वेदाचें बीज ओंकाराचें म्हणऊनी ।
दोषाचे पर्वत जसा दग्ध करी वन्ही ।
तो रामनाम अक्षरें मी ध्यातों वनीं ।
विष घेतां शीतळ केलें तीक्ष्ण जंबा ।
म्हणूनि स्मशानीं हातांत घेऊन तुंबा ।
पार्वती पुसे खूण अंतरींची शिवसांबा ।
तुम्ही भजन कोणाचें करितां मज आचंबा ॥ १ ॥
हें उत्तर ऐकून उमा म्हणे धूर्जटी ।

गुह्यज्ञान सांगितलें हेंच निजधन गांठीं ।
जो स्त्रीलोभें लागला मृगाचे पाठीं ।
पाषाण वृक्ष आलिंगी सितेच्या साठीं ।
वडिवार तयाचा वर्णून वर वर दंभा ।
त्याशी इश्वर आणितें तरीच मी अंबा ।
पार्वती पुसे खूण अंतरींची शिवसांबा ।
तुम्ही भजन कोणाचें करितां मज आचंबा ॥ २ ॥
जो सर्वां भूतीं सर्वोत्तम सर्वसाक्षी ।
पदनाद मुंगीचा होऊन स्वार परीक्षी ।
तेथें उमा होऊन गेली सीता तुझी कमलाक्षी ।
राक्षसी सोडविल्या लक्ष्मणा मग लक्षी ।
ओळखिली तुकाई अगम शुंभनिशुंभा ।
तुज भस्मांतून आणविलें होऊन रूपसंगा ।
पार्वती पुसे खूण अंतरींची शिवसांवा ।
तुम्ही भजन कोणाचें करितां मज आचंबा ॥ ३ ॥
पाषाण वृक्ष ऋषी मंडळी दिसती साचे ।
पार्वती पाहून मनीं कुंठित बोले वाचें ।
जो ब्रह्मसनातन जीवन विश्व जिवाचें ।
आज खरें भासलें निज आचरण शिवाचें ।
त्रेतायुगापून तुकाई तुळजापुरीं थांवा ।

विठु परशराम करी कवन हृदय घटकुसा ।
पार्वती पुसे खूण अंतरींची शिवसांबा ।
तुम्हीं भजन कोणाचें करितां मज आचंबा ॥ ४ ॥

## लावणी १९ वी

॥ चाल भूपाळी ॥

भजा राम लक्ष्मण जानकीस्वामी रघुवीर पंचवटी ।
जप तप साधन ऋषी मुनी करिती अनुष्ठान गंगेच्या तटीं ॥धृ०॥
धन्य भाग्य दशरथाचें सूर्यवंशी श्रीराम ।
गुण गाती कौसल्या हलवी पालखांत मेघशाम ।
कोटी सूर्यचंद्र लोपले स्वरूप ज्याचें परब्रह्म ।
एक वचन एक पत्नी बाण अक्षई तयाचा हा नेम ।
शिळा सागरीं सेतु बांधिला काम करुनी नळा हातीं ।
अठरा पद्में वानर उभे का करितील उठाउठीं ।
भजा रामलक्ष्मण जानकीस्वामी रघुवीर पंचवटी ।
जप तप साधन ऋषी मुनी करिती अनुष्ठान गंगेच्या तटीं ॥ १ ॥
अयोध्यानाथ भगवान तोरे सर्वत्रांचा दाशरथी ।
पतीतपावन दीनदयाळ सीतापती त्याला म्हणती ।
असुर वधाया धरला अवतार धनुष्यबाण घेऊनि हातीं ।
कुंभकर्ण रावण मर्दिले जाळलिया लंकेपती ।
बिभीषणासी राज्यीं स्थापिलें आंगें जाऊनि जरांजेठी ।

त्रैलोक्यांत आनंद झाला देव सुटले तेहेतीस कोटी ।
भजा रामलक्ष्मण जानकीस्वामी रघुवीर पंचवटी ।
जप तप साधन०——————॥ २ ॥
चरणापासून गंगा वाहती अवघे ध्याती पदकमळा ।
दृढभाव जो असेल ज्ञानी तोची भक्तीचा जिव्हाळा ।
साठ सहस्र वर्षे अहिल्या होऊन पडली होती शिळा ।
रघुनाथाचें पद लागतां दिव्यरूप झाली अबळा ।
वाल्हा कोळी वाल्मिक झाला रामनाम धरितां कंठीं ।
पुढें होणार तें आधींच कथिलें रामायण शतकोटी ।
भजा रामलक्ष्मण जानकीस्वामी रघुवीर पंचवटी ।
जप तप साधन०——————॥ ३ ॥
पंचवटीमधें राम जानकी तेथील लोक हे दैवाचे ।
रामकुंडाचें स्नान करिती पातक हरिती जन्माचें ।
घडोघडी चौघडा वाजतो भय नाहीं कळिकाळाचें ।
टाळ विणा मृदुंग घेऊन गुण गाती श्रीरामाचे ।
परात्पर परमेश्वर तो तर भरून उरला सर्वांघटीं ।
नामें विठ्ठल × × × गाती येसू परशरामाची जुटी ।
भजा रामलक्ष्मण जानकीस्वामी रघुवीर पंचवटी ।
जप तप साधन ऋषी मुनी करिती अनुष्ठान गंगेच्या तटी ।

## लावणी २० वी.

॥ चाल कटाव ॥

राज्यीं स्थापिलें पंडुसुता । तोषविलें पांडव भक्ता ।
तेचि सभा गातों सभेमधीं तेचि सभा गातों ॥ ध्रु० ॥

पांडव वीर भारी । धर्मराज धर्मनीतीचे होते द्वारीं ।
मयासुराचे हातें करविली सभेची रचना सारी ।
॥ चाल ॥ हें शल्य निरंतर डाचे शत्रूंच्या हृदयांतरीं ।
परी न चाले उपाय कांहीं ज्याला नित्य श्रीहरी ॥
ऋषी केले साहित्या करितां । न्यून नपडे तेथें सर्वथा ।
नानापरी केली कुशळता । तेजें झांकली जशी विद्युल्लता ।
तेचि सभा गातों सभेमधीं तेचि सभा गातों ॥ १ ॥
सभेमधीं बैठकी बांधिल्या कोण कशा ऐका ।
रत्नखचित मधीं तक्त बांधिलें यदुनायका ।
द्रोण गुरु आणि भीष्मकर्ण आणीक ऋषीदिका
शाण्णव कुळीचे राजे मिळाले यज्ञभूमिका ॥ चाल ॥
प्रथम पुजिलें लक्ष्मीकांता । ऋषी पुजन करी धर्म स्वहस्ता।
तेच सभा गातों सभेमधीं तेच सभा गातों ॥ २ ॥
शिवसभा विष्णुसभा ब्रह्मसभा तृतीयी ।
इंद्रसभा ध्रुवसभा सांगतों एक सभा सहावी ।
सूर्यसभाह          सप्तसभा झाल्या आदिपर्वी ।

धर्मसभा वर्णिली कशी देऊं उपमा येठाई ।
चाल ॥ तशी तसे बेसले सभा करून । मी प्रार्थितों कर जोडून ।
लहान थोर अवघ्यांलागून । जागविलें आज म्हणून ।
श्रम मागून घेतों घडले श्रम मागून घेतों ।
तेचि सभा गातों सभेमधीं तीचि सभा गातों ॥ ३ ॥
सभेशी बसले सभा करूनि तुह्मी श्रीमंत ।
पांच तिथें परमेश्वर आमचे भगवंत ।
वेडें वाकडें गाणें ऐकिलें देऊनिया चित्त ।
आतां करावी क्षमा मागतों रजा जोडुनि हात ।
चाल ॥ राम राम घ्या सकळ सभेला । विठ्ठलगुणी कवी नामीं रंगला॥
मतिमार्ग त्यानें आह्मा दाविला । परशराम करी वंदन त्याला
येसूगुण गातो । करूनिया वावीमधीं राहतो
तेचि सभा गातों सभेमधीं तेचि सभा गातों ॥ ४ ॥

लावणी २१ वी.

चाल ॥ दुपार मजला झाली जाऊंद्या घरीं सासु घालील वादु
दुष्ट माझे दीरभावे हे काढितील माझा शोधु ॥ तुरेवाले
जयद्रथाला रणीं आज मारीन तरीच अर्जुन खरा ।
पण चुकला अग्नी प्रवेशीन तुझीच आण श्रीधरा ॥ धृ० ॥
द्रोण कर्ण दुर्योधन यांनीं सेना केली दुफळी ।
समसप्तकास गेले युद्ध कराया अर्जुन आणि वनमाळी ॥

मार्गे बंदोबस्त ठेविला राखण सेनापती भीम बळी ।
चक्रव्यूह द्रोणानें रचला ऐका कौरवदळीं ।
व्यूह भेदिल असा वीर दिसेना धर्म मनीं तळमळी ।
प्रती अर्जुन अभिमन्यु दुसरा उभा येऊन त्या वेळीं ।
चक्रव्यूह भेदीन आज मी देईन धर्मा धीरा ।
गर्भी ऐकली कथा निरूपण समूळ युधिष्ठिरा ।
जयद्रथाला रणीं आज मारीन तरीच अर्जुन खरा ।
पण चुकला अग्नी प्रवेशीन तुझीच आण श्रीधरा ॥ ज० १॥
वय लहान सुकुमार बाळ अभिमन्यु रथीं मग चढून ।
जर्जर केली सेना बाणें गेले कौरव हाडबडून ।
द्रोण डोलवी मान जेव्हां कां आला व्यूह दोन तीन फोडून ।
मागें परतून निघतां येईना अवघेच पडले उडून ।
पांचांनी अभिमन्यु मारिला क्षत्रिय स्वधर्म सोडून ।
महीवर पडतां जयद्रथानें लत्ताप्रहारें ताडून ।
म्हणून धरला कंठीं प्राण मनीं आठऊन रुक्मिणीवरा ।
अर्जुनासी विदित करावें दृढ निश्चय अंतरा ।
जयद्रथाला रणीं आज मारीन तरीच अर्जुन खरा ।
पण चुकला अग्नी प्रवेशीन तुझीच आण श्रीधरा ॥ २ ॥
युद्ध करून परतले पार्थ मग येऊन शिबिराप्रती ।
रणीं पडला अभिमन्यु ऐकून ओंगा टाकिलें क्षिती ।

देव द्रौपदी पांची पांडव बहु दुःखें आक्रंदती ।
वंशरत्न आज धुळींत हरपलें कैशी झाली गती ।
रणभूमि शोधित चालले अर्जुन आणि श्रीपती ।
तेव्हां तो महीवर स्फुंदत पडला मधुरध्वनी ऐकली ।
असंख्य दळ पाडिलें पाहिलें महान महावीरा ।
दीपिका होती हातामध्यें ओळखिलें आपल्या कुमरा ।
जयद्रथाला रणीं आज मारीन तरीच अर्जुन खरा ।
पण चुकला अग्नी प्रवेशीन तुझीच आण श्रीधरा ॥ ३ ॥

वदन धुळीनें भरलें पालवें पुसूनिया निजकरीं ।
काय झालें पाडसा विचारी घेऊन अंकावरी ।
जयद्रथानें लाथ मारली हेंच दुःख अंतरीं ।
उदईक मारीन तुझीच आण साक्ष मज श्रीहरी ।
उत्तर ऐकूनि प्राण सोडिला विष्णुपदाप्रीं ।
धनंजय तो विलाप मोहें बुडऊन शोकसागरीं ।
पण केला ही वार्ता कळली कौरवदळीं आंबेरी ।
अवघे-मिळून रक्षा जयद्रथ मग यशाचा तुरा ।
जयद्रथाला रणीं आज मारीन तरीच अर्जुन खरा ।
पण चुकला अग्नी० ———————— ॥ ४ ॥

तीन प्रहर केलें निक्षुनि युद्ध गगनीं नमाई धुळी ।
अस्त उदय कोणास कळेना उर्वी डळमळी ।

कोटी भानूंचें तेज असें तें सुदर्शन झळझळी ।
तें सूर्याआड धरितां दिसती नक्षत्राच्या वळी ।
पण चुकला म्हणून अग्नी प्रवेशा प्रदीप्त केली होळी ।
दुरून तमाशा पाहती निर्भय दुर्जन खळमंडळी ।
अग्नीभौता फेरे घाली चाप लाऊन शरा ।
गवाक्षद्वारीं पाही जयद्रथ ध्यानीं आणून वरा ।
जयद्रथाला रणीं आज मारीन तरीच अर्जुन खरा ।
पण चुकला अग्नी प्रवेशीन तुझलि आण श्रीधरा ॥५॥
अर्जून काढितां सुदर्शन मग प्रकटला दिनमणी ।
हा सूर्य तो जयद्रथ पहा चारी होता गुणी ।
तद्घडीं उडविलें शीर जयद्रथाचें रणीं ।
जयवाद्यें वाजती ऐकतां कौरव भ्याले मनीं ।
सुदर्शनाचें तेज हरपलें कैसें त्या दिनीं ।
नवशिक्याला काय पुसावें शाहाणा पोहचेल अडणी ।
विठ्ठल नामीं परशराम कवि नित्य तन्द्रा ।
तुझी आई कळगी निंदा करशील तुझा बाप तो तुरा ।
जयद्रथाला रणीं आज मारीन तरीच अर्जुन खरा ॥६॥

## लावणी २२ वी.

### मुद्रिका.

नकळतां पडली चुकी इच्छिली मृगांकमुखी ।

नगनरी काळ काळ आहार करून अहोरात्र ।
एके दिवशीं आली मज इवशी कशी अपवित्र ।
श्रीरामाचे निजअंकीं । बैसलें पर मला ठाऊकी ।
नकळतां पडली चुकी । इच्छिली मृगकंचुकी।
म्हणून अंतरलें जनलोकीं रघुवीरपायां । मुद्रिके॥ १॥
शरचाप घेऊनिया करीं वनांतरीं गेले ।
संन्यास वेष दशमुखें कपट मनीं धरिलें ।
वाहुनिया स्कंधीं स्मशान लंके आणिलें ।
मज मागें सांग वेगीं कैसें झालें ।
॥ चाल ॥ वाल्मिकें कथुनि भविष्यार्थ ।
एक कपि येईल समर्थ । जाळील लंका पुरुषार्थे ।
ममशुद्धी नेईल यथार्थ । आज कथिलें अवघें व्यर्थच गेलें वाया॥
॥ मुद्रिके ॥

नकळतां पडली चुकी । इच्छिली मृगकंचुकी ।
म्हणून अंतरलें जनलोकीं रघुवीरपायां । मुद्रिके । २ ।
नाकळून साधूंना छळून वनीं पाठविलें ।
यावरी रेसबा हरी सेवा पद ठेविलें ।







त्या फळास्तव या स्थळीं दुःख आठवलें ।
मुद्रिके सखे त्वां रघुवीर नाम ठेविलें ।
चैतन्य निजधाम । जो विश्वाचा विश्राम ।
ते सुखी आहेत कीं राम । असा निश्चय केला नेम ।
सद्‌गद झाली सप्रेमें प्राण त्यागाया । मुद्रिके ।
नकळतां पडली चुकी । इच्छिली मृगकंचुकी ।
म्हणून अंतरलें जनलोकीं-रघुराया । मुद्रिके ॥ ३ ॥
रघुपती अयोध्येप्रती गेले माघारीं ।
कीं वनांत झाला घात सांग निर्धारीं ।
तूं सदा सर्वदा निजकरींचा अधिकारी ।
तुज आणिलें पक्षी किंवा गिध अंतरीं ।
। चाल । वर्तलें सांग प्रमाण । नाहीं तरी त्यजिन हा प्राण ।
मज श्रीरामाची आण । ऐसा निश्चय केला नेम ।
कपिचरणीं मग ठेऊन धन्य आदिमाया । मुद्रिके ।
नकळतां पडली चुकी । इच्छिली मृगकंचुकी ।
म्हणून अंतरलें जनलोकीं-रघुराया । मुद्रिके ॥ ४ ॥
वाऊनिया प्राण तूं आदिमाया आदिशक्ति ।
घनरूप राम सौमित्र कसे हे पासी ।
तुजसाठीं होतसे कष्टी स्वपनांतरीं प्रीति ।
तेव्हां सीता म्हणे हनुमंता कहानकी स्मृति ।

म्हणून अंतरलें जनलोकीं—रघुराया । मुद्रिके ।
मुद्रिके सखे त्वां कसें त्यजिलें रामासी । मुद्रिके ॥ ५॥

## लावणी २३ वी.

॥ चाल भूपाळी ॥

चाल ॥ सोळासहस्र कामिनीं भोगुनी जो ब्रह्मचारी० ॥
जरी ना देशील सीता, बुडविशील राक्षसकुळ वाया ।
रावणासी करी बोध बिभीषण म्हणे बंधुराया ।
जरी ना देशील सीता० ॥ ध्रु० ॥
सोळा सहस्र कामिनी भोगून जो ब्रह्मचारी ।
अनादि सिद्ध कीर्ति ज्याची गाती वेद चारी ।
तपसामर्थ्यें वर तुज देतां वदला शूळपाणी ।
रीस वानर तुज मानव वधतील असत्य नहो वाणी ।
शेषशाई अवतार उभयतां हेच चापपाणी ।
आदिमाया जानकी सती हें सत्य वचन मानी ।
सकल निर्जरांसहित असरपती अवतरला अवनी ।
रामाआधीं रामायण कथिलें ऋषी वाल्मीकांनीं ।

परद्वारा परधन हरितां होय सुकृताची हानी ।
केली वेदाची खंडें मी शाहाणा तुजहूनी ।
चवदा चवकडे राज्य भोगी हे मंदोदरी जाया ।
जरी ना देशील सीता बुडविशील राक्षसकुळ वाया ॥
रावणासी करी बोध बिभिषण ह्मणे बंधुराया ।
जरी ना देशील० ॥ १ ॥
राक्षसवंशी जन्मुनी वदसी धिक् लाजिरवाणें ।
मानवाची सांगसी प्रशंसा तूं मरणाऱ्यानें ।
रीस वानरें देखोनी बधावें काय मानवानें ।
सकळ देव मी बंदी घातले आणून रावणानें ।
स्वतां प्रतापबळें हलविलें कैलास मर्दानें ।
त्र्ययलोकीं मी अजिंक्य आहें श्रीशिव वरदानें ।
कल्पवरी जरी आयुष्य असलें मरती आयुदानें ।
नाशिवंत देह आशा धरावी रणी नामर्दानें ।
कीर्ति किंवा अपकीर्ति दोहींतून एक उरेल गाया ।
जरी ना देशील सीता० ॥ २ ॥
श्रीरामाशीं मानव म्हणशी तूं एक शतमूर्खा ।
पदरजस्पर्शें गौतमकांता उद्धरली देखा ।
खरा दूषण ताटिका मारली एक्या शर निरखा ।
तुझें तूंचि वाणशी जल्पशी नसतेच कुतर्का ।

पडतां उरावर धनुष्य, घेतला लज्जेचा बुरखा ।
तें रामानें सहज मोडिलें नसता वीर पुरखा ।
नुलंघवे तुज सौमित्राचे रेखा ।
भीक मागून जानकी आणिली मानसीं सुद हरखा ।
जननी आज्ञेस्तव आलों तुजला शिकवाया ।
जरी नादेशील सीता०—॥ ३ ॥

त्रिविक्रम बळी द्वारीं उभा मम धाकें भ्याला ।
क्षीरसागरीं तो जातां मागें शोधितां बळी गेला ।
संकट पडतां त्याशीं कृत्रिम विचार योजिला ।
कळ साहून उंच सहस्र गांवें क्षीरसागर केला ।
वदली आकाशवाणी दे जयपत्र रावणाला ।
असा पराक्रमी असून आतां काय भिऊं मानवाला ।
महान महान वीर युद्धीं कांपे थर थर मही ज्याला ।
तो सन्मुख तिवृती थाट करी कडीकोट भोवताला ।
भय वाटतसे तुला बिभीषणा वांचीव जीवकाया ।
जरी नादेशील सीता०—॥ ४ ॥

सहस्र अर्जुनें बांधुन नेलें स्मरण कसें नाहीं ।
पौलस्तीनें तुज सोडविलें तें न आठवे कांहीं ।
आणखी वाळी बुडवीत होतां महासमुद्र डोहीं ।
अंगदाचे पालखीं बांधिलें तुझें मन तुज ग्वाही ।

स्थूळ शरीरीं ऐरावती पुढें सिंहा पुढें गाई ।
तसा राम रघुवीर प्रकाशक भरेल दिशा दाही ।
एक्या कपींद्रें येऊन लंका क्षणांत केली लाही ।
इंद्रजित विवरांत कोंडिला रडे उभ्या घाई ।
आठरा पद्म दळ येईल तेव्हां मोकशील धाया ।
तरी सोडशील सीता बुडवि० —॥ ५ ॥
कोप आला रावणा, त्यावर शस्त्र उगारिलें ।
रामबंधु म्हणुनि सभाजन चतुरानें धरले ।
लत्तामहर एक त्याशी लागतां सकळ यत्न हरले ।
स्वहित सांगतां अनहित वाटे आयुष्य तुझें सरलें ।
शरण जातों रामास पांचजण गगनपंथीं भरले ।
भक्त बिभीषण अभक्त रावण समसमान ठरले ।
एक चिरंजीव एक कीर्तीनें त्रिभुवन भरलें ।
तें गीत गातां ध्यातां जडमूढ सकळही जन तरले ।
विठ्ठल वरदी परशराम सुत रामकृष्ण पाया ।
सखारामाची जोड नूतन गीत तोड सर्व गाया ।
तरी नाडशील० ॥ ६ ॥

चवदा चवकडे राज्य ज्याला । योजनें लांबी रुंदी तिरकुट
लंका आधीं पेती ।
परीघ खंदक चार हजार शाहाणव आगळे हुडे म्हणती ।
खंदक परी पांचवा भवताला अजिंक्य जो सुरवरापती ।
ज्ञानाचा जो सागर केवढा वेद केला ज्यानें लिखंडी ।
चलतीमुळें कां भलतेंच करिशी अझून तरी सावध लंडी ।
रावणाचें घर खालीं यासी० ॥ १ ॥
शहरपन्यामधीं वस्ती घरें पद्म किती गणमावळ केली ।
रत्नखचित सुंदर मंदिरें पांच लक्ष आलीं ।
सातकोटी सोन्याची लखलखीत प्रभा ज्यांची गगनीं गेलीं।
सात लक्ष निर्दस चांदीचीं उंच उंच तीं चौताली ।
तीन कोटी तांब्याचीं संगीन सुढाळ ज्यावरती केली ।
सव्वा लक्ष विटबंदी जेथें छोटेखानी एकताली ।
साठ हजार कांचाचीं झळकती ज्यांचीं त्याला सवतालीं ।
नवकोटी रत्नांचीं शिवालयें पूजा अर्चा करी तिकाळीं ।
रुद्राचे अभिषेक होती नित्य लखोल्याहार रुंडी ।

चलतीमुळें कां भलतेंच करिशी अझून तरी सावध लंडी ।
गर्वाचें घर खाली० ॥ २ ॥
चौऱ्याशी योजनें सभामंडप बैठकीला ।
नवगृहांच्या त्याशीं पायऱ्या बाकी लंका गडकिल्ला ।
सुरवर नर जैसे ज्याचें तपसामर्थ्य हर एकला ।
आत्मलिंग पार्वती दिधली मंदोदरीवर तो झकला ।
ऐंशी हजार ज्याशीं बायका लक्षपुत्र पोटीं पिकला ।
सव्वालक्ष झाले नातू ऐसा मागें पुढें नाहीं ऐकला ।
अंतकाळीं जीव प्राण सोडितां जवळ नाहीं कोणी एकला ।
यावरतीं एकमुखी चालाया सोन्याचा नामिळे सकला ।
मग नरदेहाची कोण अवस्था ती मेल्यावरती हालें मुंडी ।
चलतीमुळें कां भलतेंच करिशी अझून तरी सावध लंडी । ग० ॥ ३ ॥
रती अनुकूळ दिलीच तीं हरीनें सर्व भूतीं राम भजावा ।
बोलायावरली कर्मरहाटी करून पाहे जोडावा ।
साठ वर्षांचा मळ अमंगळ एक घडी तरी झाडावा ।
नामस्मरणीं लाऊन माण्या एक दुशालो पाडावा ।
कवी धुरंदर म्हणती यास संशय मनाचा फेडावा ।
क्षण भंगुर नरदेह उत्तम वेळ खुशी जो वेढावा ।
नामीं विठ्ठल परशराम म्हणे नवऱ्याशीला सुरसंडी ।
चलतीमुळें कां भलतेंच करिशी अझून तरी सावध लंडी । पा० ॥ ४ ॥

मच्छयंत्र वीर भेदील जो कोणी मग द्रौपदी देईन त्याला ॥ ध्रु० ॥
द्रोण प्रतिज्ञा खरी करी अर्जुन द्रुपद बांधुन रथीं आणिला ।
अपमानाची वीरश्री आंगीं लज्जित होऊन मनीं शिणला ।
द्रोण वधीन रणीं तरी मी द्रुपद विचार पाहून करी चुकला ।
धृष्टद्युम्न द्रौपदी शिखंडी तीन बाळें यज्ञीजनला ।
कौरवास जड पडलें पांडव प्रताप त्यांच्या जिवीं भिनला ।
धृतराष्ट्रापुढें रडे दुर्योधन सभा रंग दिसे भणभणला ।
चार पावलें दुरठेवा पांडव कपट मनसुबा पट बिणला ।
लाक्षागृहीं जाळावे पांडव कर्ण शकुनी गुणगुणला ।
विदुर भक्त जो त्रिकाळ ज्ञानी समजून धर्माला ।
बरबर भाषा बोलून श्रुत करी समूळ वार्ता धर्माला ।
ठावे पडावे पांडव वास्तव द्रुपदरायें पण केला ।
मच्छयंत्र वीर भेदील जो कोणी मग द्रौपदी देईन त्याला ॥ १ ॥
पुरंची नामें यवन कुशळ तो दुर्योधनाचा स्नेही होता ।
लाक्षागृह त्याहातें करविलें वारुणावतीस नकळतां ।
सन्मानें बोलाविलें पांडव सर्व कुंती माता ।
धर्म म्हणे बंधूंशी, असावें पुढें येथून सावध आतां ।

साह्य सखा श्रीहरी कैवारी भवदुस्तरी संकटीं त्राता ।
आधींच कोरलें विवर निघाया मार्ग करून ठेविला ऐता ।
हरि जागरनित करून राहती आठऊन रुक्मिणीकांता ।
घात कराया जपे येवोन तो रात्रंदिस भवतां सवतां ।
तेच दिनीं कापडी पांचजण सहज आले रहायाला ।
अग्नि लावितांक्षणीं धर्म भीम जागृत होते पहायाला ।
ठावे पडावे पांडव यास्तव द्रुपदरायें पण केला ।
मच्छयंत्र वीर भेदील जो कोणी मग द्रौपदी देईन त्याला । २ ॥

अग्नि पेटला जेव्हां धडाडी विवरद्वारीं पांडव गेले ।
प्रळयज्वाळा पाठी लागतां खांडव वन देऊं केलें ।
जगीं वार्ता अशी फुटली लाक्षागृहीं पांडव मेले ।
सकळ कौरव हर्ष अंतरीं उपरोधिक पाहूं आले ।
सहाजणांच्या अस्थी पाहून दुर्योधनाचें मन धालें
क्षोभ ईश्वरी न कोणाला कर्माचे अघाटित घाले ।
इकडे निर्भय सुखी सहाजण सूर्य जसे धुळी भिरालें ।
राक्षसवन ते महा भयंकर गिरी कंदरीं वन उल्लंघलें ।
हेडंब मारून वरली हेडंबा गर्भी घटोत्कच समावला ।
एक संवत्सर तेथें राहिले पुढें बकासुर निमाला ।
ठावे पडावे पांडव यास्तव द्रुपदरायें पण केला ।
मच्छयंत वीर भेदील जो कोणी मग द्रौपदी देईन त्याला । च० ॥ २ ॥

दुर्धर पण उभविला कळीच्या काटचांवर फिरता मासा ।
कढईत पाहून यंत्र भेदील जो धनुर्वेदी निपुण लईसा ।
तीन बाणांचें प्रमाण चुकल्या कढईंत टाका त्या पुरुषा ।
रावरंक कोणीहि असूद्या नांवगांव सहसा नपुसा ।
त्यांत मुख्य श्रीहरी सिंहासनीं विश्वंभर विश्वाचि त्याला ।
पांडवास आज वरील द्रौपदी नेम करून ऐता ठेविला ।
ठावे पडावे पांडव यास्तव द्रुपदरायें पण केला ।
मच्छयंत्र वीर भेदील जो कोणी मग द्रौपदी देईन त्याला ॥ ४॥
होऊन कापडी आले तेंथ पांडव हरीविण कळलें नाहीं कोणा ।
याचक येऊन सभेशी बसले आंगावर भगवा बाणा ।
पण भेदावया उठला कर्ण धरून मनीं अभिमाना ।
धनुष्य उचलतां झाला कासाविस दुर्योधन आवरी कर्णा ।
निर्वीर झाली सभा बोलती हिय्या कोणाचा पुढें होईना ।
असें म्हणतां उठले कापडी मिरमिर पाही सारी सेना ।
पार्थबाणें यंत्र भेदिलें माळ घातली अर्जुना ।
द्रौपदी स्वयंवर यापरी झालें कौरवाचें दळ केलें राना।

नामीं विठ्ठल परशराम म्हणे भावें सखा श्रीहरी ज्याला ।
रामकृष्ण गुणी रामा गातो ताजव्यांत अक्षरें तोला ।
ठावे पडावे पांडव यास्तव द्रुपदरायें पण केला ।
मत्स्ययंत्र वीर भेदील जो कोणी मग द्रौपदी देईन त्याला ॥ ५ ॥

## लावणी २६ वी.

॥ चाल कटाव ॥

करी जिजाबाई प्रार्थना धाव विठाई ।
द्रव पावला वस्त्र दिलें कोणग ठाई । ध्रु०
दृढ भक्ति तुझी करुनि तुका केवळ ।
हरी जन्मोजन्मींचा दास म्हणती सकळ ।
अहोरात्र तुझा निजध्यास लागला चळ ।
मी त्याची स्त्री आन्याई तुझी लडिवाळ ।
एक जीर्णवस्त्र होतें मला मी न्हाते वेळ ।
नाही आज म्हणतां होऊन बसला काळ ।
त्याविरहित तिथी घरांत सहसा नमिळे ।
अशी अडचण पाहून कशी साधली वेळ ।
लग्नास न्यावया आले सोयरे मूळ ।
निरउपाय करूं मी काय होऊन दुर्बळ ।
तुजविणा माधू कोणास आलां काबाई ।

दासीची लाज जाईल मग काय राहिल मोठाई ।
करी जिजाबाई प्रार्थना धांव विठाई ।
द्रव पावला वस्त्र दिलें कोणेग ठाई । १ ॥

तूं दिनानाथा दीनबंधु भक्तकैवारी ।
तुज उष्ण दुध पाजिलें सख्या श्रीहरी ।
दासास तुझ्या न्यांछळिलें राग तो नधरी ।
अन्याई तुझी मी अगदींच मागें सारी ।
गरुडावर येतां उशीर होईल भारी ।
पवनाहून येऊन लवकर संकट वारी ।
असा जिजाबाईचा धांवा श्रवणद्वारीं ।
पंढरीस ऐकला देव उभे गरुडपारीं ।
गरुडास जातों म्हणून नाहीं पुसाया वारी ।
म्हणून वेगीं धांवला दासाला साह्यकारी ।
आले देहूगांवीं विठ्ठल अतिनिकटाई ।
आपलाच पितांबर आपले स्वकरानें लपटाई ।
करी जिजाबाई प्रार्थना धांव विठाई ।
द्रव पावला वस्त्र दिलें कोणेग ठाई । २ ॥
देदीप्यमान पिवळा पितांबर हरीचा ।
तो जिजाबाई नेसली पदर भरजरीचा ।
अवघेच सऱ्हाडीं दिपले पितांबर नवलपरीचा ।

ठाऊकच नांदणूक म्हणती असेल खुलभरचा ।
काय झालें तुकोबाला कुबेर आहे घरचा ।
घ्या मेजवानीचा लाभ आज आहेराचा ।
वरमाईला पितांबर मोतीचुर जरीकाठाचा ।
एक म्हणती आहेर घेऊं व्याह्याबराबरीचा ।
अशा करून टवाळ्या थिजले ठाईं ठाईं ।
बरहुकुम करवा याद नाहीं घटाई ।
करी जिजाबाई प्रार्थना धांव विठाई । ० ॥ ३ ॥

ब्रिदाचा बोल लागेल भक्तासाठीं ।
विठूशेट गुमास्ता तदघडी झाला चाटी ।
व्याह्याला पुसले कळेल त्या मनसाठीं ।
रुक्मिणी हातें स्वयपाक करी जगजेठी ।
अनुक्रमें दिले विडे भोजनापाठीं ।
चौकशीनें कापड आणविलें नारायणपेठी ।
मग सोडून दिलें सरी सर्वांला वांटी ।
अशी अमोलिक वस्त्रें पाहून हर्षले चित्तीं ।
अशी ज्याशीं त्यास कामास आली खोटाई ।
संताचा महिमा संताला एकठाई । करी जिजाबाई० ॥ ४ ॥
भांडारी डोंगर त्यास्थळी एकांत स्थानीं ।
तेथें भजन करी सप्रेम तुकोबा वाणी ।

ओळखिला पितांबर नेत्रीं आलें पाणी ।
श्रमलास तूं देवा त्वां मजला केलें ऋणी ।
नवसाची साडीचोळी एक्या उदम्यानीं ।
ते वऱ्हाडी गेल्यावरती नेसवली आणुनी ।
असें संतचरित्र ऐका कानीं ।
करी विठ्ठल नामीं नामाची भाटाई ।
म्हणे परशराम मन होईल परलोकीं मोठाई ।
करी जिजाबाई प्रार्थना धाव विठाई ।
द्रव पावला ० ॥———————— ५ ॥

## लावणी २७ वी

॥ चाल ॥

वेडीच झालें फार सुचेना घरधंदा कांहीं ।
पती प्रवासी जाती हौस मनची पुरली नाहीं ।
देह गेला तरी जावो परंतु नेम नटळे कधीं ।
आम्हा स्त्रियांचा स्वधर्म ऐसा लक्ष पतीच्या पदीं ॥ ध्रु० ॥
सकळ तीर्थें धर्म अवघे एकीकडे ।

सद्भावें पतिसेवा करिती अवघे तिजला घडे ।
मी सेवेशीं उभी तिष्ठत दासी दोन्ही कर जोडून पुढें ।
सत्वशीळ म्हणूनि वैभव पाळी पळभर वरना चढे ।
जशी कमळन असतां जळीं–तशी जवळी मी पतीचरणीं ।
लक्ष लावि शशिमंडळीं ।
दृढ भाव स्वरचिती गाऊं आर्जविले गुणनिधी ।
देह गेला तरी जावो परंतु नेम नटळे कधीं ।
आम्हा स्त्रियांचा स्वधर्म ऐसा लक्ष पतीच्या पदीं ॥ दे० ॥१॥
चौपाळ्यावर पहुडी पतीला आपण तांदुळ सडी ।
सवेंच होता जागा भ्रतार पाणी मागे तत्घडी ।
तशी उठली घाव न देतां आधार मुसळ सोडी
मनोभंग होईल पतीचा म्हणून लगबगीनें तातडी ।
होती शेजारीण जवळ–ती पुसे सतीला केवळ ।
कसें स्थापिलें आधार मुसळ ।
हें गुह्य सांग मज आधीं ।
देह गेला तरी जावो परंतु नेम नटळे कधीं ।
आम्हां स्त्रियांचा स्वधर्म ऐसा लक्षपतीच्या पदीं । दे० ॥ २ ॥
सती म्हणे पतिव्रता पण करशील तर तूं होशील अशी ।
उत्तर ऐकून घराशीं आली प्राणपतीला पुसे ।
मी आजे पतिव्रता आजपासून तुम्ही व्हावें तसें ।

देह गेला तरी जावो परंतु नेम नटळे कधीं ।
आम्हा स्त्रियांचा स्वधर्म ऐसा लक्ष पतीच्या पदीं । दे० ॥३॥
करी सेवा निर्मळ निश्चळ असा एकमास लोटला ।
कांहीं तरी पालट पडला असेल म्हणूनि संशय चित्तीं वाटला ।
आज मागा मजपाशीं पाणी यास्तव जीव आटला ।
सांगितल्या सारखें करी मग कंठीं प्रेम दाटला ।
दे पाणी निजहस्तकीं करी कांडण स्वहस्तकीं ।
सोडिला मुसळ वरून कीं ।
येऊन सतीच्या भाळीं पडलें रुधिर वाहे जशी नदी ।
देह गेला तरी जावो परंतु नेम नटळे कधीं ।
आम्हा स्त्रियांचा स्वधर्म ऐसा लक्ष पतीच्या पदीं । दे० ॥४॥
धनद्रव्य लुटविलें तुजसाठीं सर्वांशीं नाडिले ।
तुजसारख्या बाष्कळ म्हणुनिया मुसळानें ताडिलें ।
थर थर कांपे पती स्त्रियाला आजपासून हात जोडिले ।
पण निश्चय एक सती ।
जन सभा चतुर भाविती । नामी विठल कवींची मदी ।

परशराम येसूचे छंद जशी साखर विघरे दुधीं ।
देह गेला तरी जावो परंतु नेम नढळे कधीं ।
आम्हा स्त्रियांचा स्वधर्म ऐसा लक्षपतीच्या पदीं । दे० ॥५॥

## लावणी २८ वी.

॥ चाल ॥

फडपळारी डोळे झांकून बसला मलुराया ।
स्वामीचरण भेटीचन कैसें केलेस मलुराया । सगन । चाल दुसरी ।
कवळीरे माझी काया रूप केळीचें कवळें जसें ।
नढती पराई माझी शरीर हें सूक्ष्म केवळ तसें ।
दुधीं धुतल्या निर्दोष पुरुषमळेना तिळरती ।
आम्हां स्त्रियाची जात ढाळ मोत्याला असतो किती ॥ ध्रु०॥
पतीव्रता सती गौतमकांता इंद्रानें भोगिली ।
साठ सहस्र वर्षें शापें शिळा होऊन डागली ।
देवयानी शुक्राची कन्या कचें भोगिली ।
ययाती राजा क्षत्रिय वरला जुनी कथा मागली ।
चाल । दुभंगली रामचंद्रा सेरावणाची राणी ।
पतिमरण सांगितलें दिलें संसारास पाणी ।
द्वापारीं तीच भामा कृष्ण तिनें दिला दानीं ।
तुळसीदळ देऊन सोडविला रुक्मिणीनें श्रीपती ।

सूर्यकन्या कर्ण जन्मला कुंतीचे कुमारपणीं ।
गुरुपत्नी चंद्रानें भोगिली बुध झाला त्यापासुनी ।
भारद्वाज रायांचें वीर्य राघु जाऊनी आणी ।
इंद्र झडपतां मार्गीं सांडलें बाळें झालीं तिन्ही ।
॥ चाल ॥ पाराशर दुर्गंधा, तो द्रोणगुरु तिसरा ।
त्या पाराशरापासून पुढें ऐका गुण चातुरा ।
झाले व्यास नारायण त्या दुर्गंधीच्या उदरां ।
दुर्गंधाची केली सुगंधा शांतनुवर तिजमती ।
सुधीं धुलल्या निर्दोष पुरुष हा मळेना तिळरती ।
आम्हा स्त्रियांची जात ढाळ मोत्याला असतो किती ॥ध्रु० २॥
पण भेदून अर्जुनानें परणिली पांचाळी द्रौपदी ।
दोन महिन्यांवर बारा दिवस आली वांटणी सुधी ।
कर्ण कुंतीला साक्ष असतां म्हणे मूळ पाहूं आधीं ।
जांभुळफळ लटकेना तेव्हां विदित केलें श्रीहरी तधीं ।
॥ चाल ॥ मृग कंचुकी इच्छितां नेली सीता रावणानें ।
सहा महिन्यां सोडविली जीव घेऊन रामानें ।
याकरितां स्त्रिया आम्हीं नित्य असावें नेमानें ।

पति ईश्वर मानून आपल्या जगांत सुख आचरती ।
दुधीं धुतल्या निर्दोष पुरुष हा मळेना तिळरती ।
आम्हा स्त्रियांची जात ढाळ मोत्याला असतो किती ॥दु० ३॥
पतिव्रतेची सत्ता महिमा जिचा देवावरी पहा ।
त्रैलोक्यामधीं श्रेष्ठ निवडली अनसूया एक महा ।
तिन्ही देव तिनें करून बाळकें पाळण्यांत ह्मणे रहा ।
दत्त दिगंबर कुशी मज व्हावें सोडून दिलें तेव्हां ।
॥ चाल ॥ निर्गुण पुरुष ह्मणती तीस जी सगुण तीच माया॥
अहो रूप ना जर नारी भांडती मूर्ख वाया ।
यास्तव हें वृत्त चालें नाहीं नाबळ कविराया ।
विठू परशराम ह्मणे सुभावण्या दे गायाला मती ।
दुधीं धुतल्या निर्दोष पुरुष हा मळेना तिळरती ।
आम्हां स्त्रियांची जात ढाळ मोत्याला असतो किती ।
दुधीं धु०॥४॥

## लावणी २९ वी.

॥ चाल ॥ वा काय घालतोशी संपूतीचा पिंगा । या मानव देहीं भजरे श्रीरंगा ।

परनार पट्ट्याची धार घाल करी जीवा ।
अज्ञानिक चकले काय इतरांचा केवा ॥ ध्रु० ॥

निमाले संद उपसंद स्त्रियेच्या संगा ।
परनारीस्तव करी वाळी सुग्रीवाशी दंगा ।
श्रीरामें त्यासी मारिलें आणून रणरंगा ।
एकोत्तरशत कींचक गेले यमाच्या गांवा ।
ब्रह्मादिक चकले काय इतरांचा केवा ।
परनार पटयाची धार घात करी जीवा ।
ब्रह्मादिक०॥ १ ॥

वैभव असून रावणें सीता नेली चोरून ।
त्याच्या कुळासहित परिवारें गेला तो मरून ।
द्रौपदी सभेसी आणिली केस धरून ।
गदाघायें घेतला प्राण भीमानें हरून ।
नारदें गोपी मागितली देवा विसरून ।
झाली नारदाची नारदी त्या पापेंकरून ।
परसंग असा बहुतांस प्रचित अनुभवा ।
ब्रह्मादिक चकले काय इतरांचा केवा ।
परनार पटयाची धार घात करी जीवा ।
ब्रह्मादिक०॥ २ ॥

एकपत्नी पुरुष पतिव्रता स्त्रिया घरोघरीं ।
दोषाचा किंचित लेश नसे तिळभरी ।
तईं पुण्यपरायण राजे पृथ्वीवरी ।
त्रैलोकीं करावें गमन सदा निरधारीं ।
स्वइच्छा मरावें उजाड यमपुरीं ।
त्या युगाचें नांव आलंकृत निरधारी ।
पुढें कृता त्रेता द्वापार कलीची हवा ।
ब्रह्मादिक चकले काय इतरांचा केवा ।
परनार पट्याची धार घात करी जीवा ।
ब्रह्मादिक०॥ ३ ॥

परस्त्री परपुरुषाची योगमाया ।
ब्रह्मांडीं घडामोडी लिळा दाखवी पहाया ।
तें दृष्टी पाप पाहूं नये गुणी राया ।
जन दृष्टी पाप पाहिलें तें गेलें वायां ।
पांचांची साक्ष वर नेली आपली जाया ।
तिशीं भोगावें प्रीतीनें लाऊन माया ।
विठ्ठल नामीं परशराम रामकृष्ण मनीं ध्यावा ।
ब्रह्मादिक चकले काय इतरांचा केवा ।
परनार पट्याची धार घात करी जीवा ।
ब्रह्मादिक०॥ ४ ॥

## लावणी २० वी.

॥ चाल ॥ कवळीरें माझी काया सेप केळीचें कवळें जसें ।
चढती पराई माझी शरीर हें सूक्ष्म केवळ तसें ।
अहो शिव सांबा वेडें कसें झालें मन गंगेवर वळलें ।
तिजपाशीं अक्षई राहतां तुमच्या वचना कंटाळलें ॥ ध्रु० ॥

म्हणे पार्वती ऐक गंगे तूं माझे सवती ।
कसें भुलविलें शिव सांबाला धिक् तुझी नवती ।
जटेमधें लपून राहिलीस जसें जंगल गवती ।
वेड्याभोळ्या चक्रवतीची मी आहें पुरती ।
अष्टवसु शांतनूसारखा भ्रतार तुज भवलीस मजसौवती ।
मजला अचुक पणिली रातदिस वाहती । चाल ॥
नाहीं शुद्ध मूळ तुज गडे । शोध मनीं ।
शोधितां एकांतीं गांठून विन धडे । शिव वनीं ।
हें दूषण तुम्हांला जडे । मुख जनीं ।
न दाखऊन मस्तकीं राहिली कसें नाहीं कळलें ।
ऐकून क्रोधावली पार्वती वृत्त माझें चळलें
अहो शिवसांबा वेडें कसें झालें मन गंगेवर वळलें ।
तिजपाशीं अक्षई राहतां तुम्ही वचनाला टळले ॥ १ ॥
ऐक शेषकन्यके किती स्तुति आपुली कीलें

तिन्ही लोकचें पातक माझे स्नानानें हरतें ।
विषकंठानें धरून मस्तकीं दाह केला दूरते ।
शुद्ध धरून कांहीं बोलणें साजणी आलें आंगीं भरतें ।
असे अगोचरपणें सांब गेले रागें तुजवरते ।
भिल्लिणी तपा ढळविलें शोध मनीं पुरतें । चाल ।
बडिवार काय मिरविशी । बोल आधीं ।
कांहीं विचार करी अंतरीं । म्हण सुधी ।
संभाषण मधुरोत्तरी । ताही कधीं ।
अदावतीनें खास्त लाविते मन अगदीं चळलें ।
आतां तुझे हातीं काय मुक्त तें हंसानें गिळलें
अहो शिवसांबा वेडें कसें झालें मन गंगेवर वळलें ।
तिजपाशीं अक्षई राहतां तुम्हीं वैचनाला टळले ॥ २ ॥
उघडा माथा करून बोलते गंगे तूं मजला ।
मजला सोरून कशी राहिली काय म्हणूं तुजला ।
सिंधु संगम कशास झाली तिथें कां जीव रिझला ।
शिवसांबासारखा भ्रतार गंगे तूं त्याजिला ।
मस्त तुझे हे व्यर्थ वायली दिड तांदुळ शिजला ।
चल दूर पलिकडे नको बोलूं जरी दिल बहु खिजला । चाल
मगरूर केली मजवर । तुज कशी ।
सिद धरली मी आजवर । तुझी अशी ।

अहो [illegible]
तिजपाशीं अक्षई राहतां तुम्ही वचनाला टळले ॥३॥
चढोवढीनें गंगा बोले गौरी तूं पाही ।
पंचलोक मी तारक झालें भगीरथा साह्य ।
कमंडलु तो ब्रह्मदेवाचा त्यामध्यें सुख वाही ।
स्वर्ग मृत्यु पाताळा महिमा झाली दिशा दाही ।
सर्व ठाऊकें हिमनगजे कां विचार मनीं नाहीं ।
मला प्रपादून हेका आपला तामापरी कांहीं ॥ चाल ॥
नागभूषण माझा पती । आहे खरा ॥
नाहीं उण्या दोन्ही । तिळरती शंकरा ।
ही गोष्ठ उभयतां रीति । शिव हरा ।
मूळ कुळ पाहतां लांब दोहींचें एका जंत्रीं मिळले ।
व्यासाची मति शिणली वर्णितां तुलनीं ना तुळलें
अहो शिवसांबा वेडें कसें झालें मन गंगेवर वळलें ।
तिजपाशीं अक्षई राहतां तुम्ही वचनाला टळले ॥ ४ ॥
वृत्तांत ऐकून दोघी स्त्रियांचा शिव त्यांवर रुसले ।
आयुधें टाकून फक्त निरंजनीं स्मशानांत बसले ।

वाद नित्य प्रतिवाद ऐकून प्रभुचें मन त्रसलें ।
यासाठीं पुरवलें आह्मां कैलास भुवन्न मसलें ।
काय कथा मानव जन्माची शिव देखलि फसले ।
आश्चर्य सर्वांसी वाटलें जन गदगद हांसले ॥ चाल ॥
नामीं विठ्ठल ह्मणे दोघी स्त्रिया । महापीडा ।
मोकलून शिवानें हिया । मूळबुडा ।
परशराम येसूची क्रिया । बिलवडा ।
केल्यावर मग ज्याचें त्याजला दुःख जाईल कळलें ।
रामकृष्ण गुणी रामा गातो शिवचरणा जुळलें
अहो शिवसांबा वेडें कसें झालें मन गंगेवर वळलें ॥ तिज० ॥५॥

## लावणी २१ वी.

चाल ॥ दैवानुसार गांठ पडली देवभक्तांची ।
दोघांत प्रीत तर आण माझ्या रक्ताची ।
दोघी सवती भांडती पति भंगड भुंगा ।
आपसांत बघ बोलती गौरी आणि गंगा ॥ ध्रु० ॥
पार्वती ह्मणे गंगेला तूं पाट करणी ।
होशील अभंडी विष्णूच्या चरणी ।
भुलविला शिव तूं कशी केलीस करणी ।
राहिली सख्खी मजला चोरूनी
चाल नपूर होय अमंगळ सवती । नाही मूळ कुळ तुजला जाती ।

नरनारी तुजमध्यें न्हाती ।
मी आदिमाया आदिशक्ति अर्धांगा ।
घर समुद्राचें निघालीस निःसंगा ।
दोघी सवती भांडती पति भंगड भुंगा ।
आपसांत वर्म बोलती गौरी आणि गंगा ॥ १ ॥
मग गंगा ह्मणे गवरीला दूर परती ।
जाणतें मुळापून मी तुझ्या कीर्ति ।
कशी अगोचरे रुसलीस शिवावरती ।
भिल्लिणीचें स्वरूप तूं धरलेंस अपकीर्ती ।
चाल ॥ टाकिली उडी होमांत । केला दक्ष पित्याचा घात ।
काय जाणसी उत्तम जात ।
भ्रमांत बैस तूं ना येशी पासंगा ।
मी जळ निर्मळ नित पातक जाती भंगा ।
दोघी सवती भांडती पति भंगड भुंगा ।
आपसांत वर्म बोलती गौरी आणि गंगा ॥ २ ॥
मग गवरी ह्मणे गंगेला तूं ऐक आतां ।
शांतनूसारखा भ्रतार तुज होता ।
तो सोडून आलीस शिव भ्रमणीं भ्रमतां ।
मारलें सप्त पुत्रांस पोटीं होतां ।
चाल ॥ हीन मानसीं दुःख व्यथा । जनांत उघडा माथा ।

तूं दगा दिला भागिरथा ।
मी तुजहून आगळी प्रिय हर शिवलिंगा ।
दोघी सवती भांडती पति भंगड भुंगा ॥
आपसांत वर्म बोलती गौरी आणि गंगा ॥ ३ ॥
समतोल दोहींचे बोल निज कानीं ।
ऐकून मसणवटी शिव बसले ध्यानीं ।
थोरांची दशा काय इतरांची कहाणी ।
मग दोघी बायका साकरती कोणी ।
चाल ॥ आडल्यावर करणें लागे । असें होतच आले मागें ।
करी विचार आपले जागे ॥ चाल ॥
नामीं विठ्ठल सांगे ब्रिद लावून चंगा ।
गुणी परशराम येसूचे अभंगा ॥ ४ ॥
( बायका हें गाणें नेहमीं ह्मणतात. हें सर्वांस ऐकिवांत आहे. )

## लावणी ३२ वी.

एकुणेरीला उणें बोलती एकाहून एक आगळी ।
आपआपल्या स्वरूपाला वाणिती गोरी आणि काळी ॥ ध्रु० ॥
काळी ह्मणे गोरीला ऐक हा मुळीहून वृत्तांत ।
कांहींच नवतें रात्र काळी अक्षई आदि अंत
सत्यापासून आकाश काळें पाहे धास्तीस ।

आकाशापुन वायु त्याचा निळा रंग नित ।
वायुपासून तेज तांबडें व्यापून आप श्वेत ।
आपापासून पृथ्वी झाली वर्ण तिचा पीत ।
पांच मिळोन मूस ब्रह्मांड ओतली काळी श्रेष्ठ स्थीत ।
काळ पुरुष करी उसास गगनी बसून अहोरात ।
काळ्यानें गोऱ्यास ओळखिलें अभिमान गाळी ।
एकुणेरीला उणें बोलती एकीहून एक आगळी ।
आपआपल्या स्वरूपाला वाणिती गोरी आणि काळी ॥ १ ॥

गोरी ह्मणे काळीला वाणिशील तुझेंच तूं सारें ।
कांहींच नवतें निर्गुण होतें ज्योतिर्मय गोरें ।
ह्या ज्योतीची जमली काजळी आकाश निर्धारें ।
मधें निर्गुण तें सगुण झालें शून्याकारें ।
श्वासोच्छ्वासाशीं चंद्र सूर्य दोन्ही पा गोरे ।
नाभी निघालें अष्टकमलदल पुष्पपत्रभारें ।
नाभी ब्रह्मा हृदयीं विष्णु मस्तकीं हरि हर ।
एक स्वरूप हरि त्रिगुण झाले उभवर्णीस न्यारे ।
तारागणें नव लक्ष निघालीं रोमरंध्रें सगळीं ।
एकुणेरीला उणें बोलती एकीहून एक आगळी ॥ २ ॥

काळी ह्मणे गोरीला काविशील मोठेपण वाया ।
काळीं बाहुली मी नेत्रां तधीं जनयात्रा पाहाया ।

काळें काजळ काळ्या पापण्या काळ्या दोन्ही भिवया ।
काळे केस मस्तकींचे बसशील चौरंगीं न्हाया ।
काळी पोत गरसुळी आहेवपण जगांत मिरवाया ।
काळें दांतवण न लाविशील तर शुभ्र दंत लाया ।
काळी शाई काळीं अक्षरें हरीचे गुण गाया ।
काळी कस्तुरी उंच मोलाची आरोग्य करी काया ।
काळी मृत्तिका करून पार्थिव पुजी भाल:काळीं ।
एकुणेरीला उणें बोलती एकीहून एक आगळी ॥ ३ ॥
उलट जाब काळीला गोरी मग सरसाऊन देती ।
नेत्रीं बाहुल्या कशानें पाहशील अति गोऱ्या ज्योती ।
गोरी कांती गोरें सुवर्ण गोरें मोती ।
गोरें रत्न करूं परीक्षा श्रीमंत जन घेती ।
गोरें चांदणें गोरा चंद्र गोरा गभस्ती ।
उदय होतां यज्ञ याग आणि स्नान दान करिती ।
गोरें अमूल दुर्लभ सर्वां गोरा पेरावली ।
गोरा अग्नी परिपाकामधें स्थूळ देह पाळी ।
एकुणेरीला उणें बोलती एकीहून एक आगळी ॥ ४ ॥
काळी गोरीचें भांडण असें चढावढी होतां ।
आली सांवळी तिसरी म्हणती कां भमणी भमतां ।
काळें गोरें हें एकाचेंच आंगीं अक्षई आदि अंता ।

रहा आनंद करून येथून निर्वैर होईल आतां ।
निवृत्ति प्रवृत्ति दोहींची झाली लाघव मूळवार्ता ।
समाधान चित्तीं वृत्ती नामीं विठ्ठल गीत गातां ।
कागपिंगळा हंस बगळा भिन्नभाव पाहतां ।
परशराम ह्मणे असार सोडून सार घेई आतां ।
भेदावांचुन करिती शाहिरी पोटास्तव दुबळीं ।
एकुणेरीला उणें बोलती एकीहून एक आगळी ॥ ५ ॥

## नेवाशाच्या मोहनीराजाची लावणी ३२.

### पांच चौकांची.

देवदैत्यांनीं मिळून केलें समुद्रमंथन जधीं ।
शेषाचा दोर लावतां मंदराचळाची रवी ।
हातपायांची करून मालडी नाटक हरी लाघवी ।
पृथ्वी लागली बुडूं कच्छरूप देवें धरिलें तधीं ।
सुरापान अमृत वांटतां कळूं लागली दुही ।
देवपंक्तीमधीं राहु बैसला चंद्रें दाविली खूण ।
तानोडानें शीर छेदिलें निवडून जैसे कणू ।
मोहनीराज महाराज शामसुंदरा सांवळी तनु ।
नेवासें केलें ह्मणून नेवासें अवघे लागले म्हणूं ॥ १ ॥
मूळद्वारांतून मुळा निघाली कंठांतून प्रवरा ।

रत्नगडापशी रत्नें वांटून दिलीं सुरासुरा ।
राहु मारिला ह्मणून राहुरी वस्ती मुळातिरा ।
टोक्यापाशीं संगम झाला स्थापून सिद्धेश्वरा ।
हरिहरांचीं दोन्ही स्थानें जुनाट परंपरा ।
अमृताची धार वाहतसे बारीक वालाहून ।
पुण्यप्राणी कोणी योगी असेल त्यास घडेल प्राशन ।
मोहनीराज महाराज शामसुंदरा सांवळी तनु ।
नेवासें केलें ह्मणून नेवासें अवघे लागले म्हणूं ॥ २ ॥

## लावणी ३४ वी.

पश्चिमवाहिनी गोदा प्रती मूळगंगा ।
त्रैलोक्यतारणी पंचनाम भवभंगा ।
हे तृतीय नाम भोगावती पाताळगंगा ।
पश्चिमवाहिनी गोदा प्रती मूळगंगा ॥ ध्रु० ॥
वास्तव्य मूळ वैकुंठीं विष्णुचरणीं ।
तिथें मंदाकिनी म्हणतात ऐका श्रवणीं ।
हें प्रथम नाम भगीरथा पावली स्मरणीं ।
बदरिकाश्रमीं शिवमस्तकीं स्वर्गाहूनि ।
तिथें द्विभाग ओघ भागीरथी संकटहरणी ।
मूळद्वारीं गेली पाताळीं अगाध करणी ।
हें तृतीय नाम भोगावती पाताळगंगा ।

त्रैलोक्यतारणी पंचनाम भवभंगा ।
पश्चिमवाहिनी गोदा प्रती मूळगंगा ॥ त्रैलोक्य० ॥ १ ॥
चतुर्थनाम गौतमानें गंगा आणिली ।
त्र्यंबकेश्वरापासून पुढें गोदा झाली ।
वैतरणा कोंकणामधें पश्चिमेस गेली ।
ही पंचनामाभिधानें शास्त्रीं ठेविली ।
पांचांत श्रेष्ठ जव आगळी गौतमा झाली ।
दर्शनें क्लेश नासती मोक्षपदवली ।
ऐश्वर्य घेऊनिया पूर्वीच्या सिंधुसंगा ।
त्रैलोक्यतारिणी पंचनाम भवसंगा ।
पश्चिमवाहिनी गोदाप्रती मूळगंगा ॥ त्रैलोक्य० ॥ २ ॥
रमणिका रमणिका पाहून भविष्यार्था ।
आर्चा शुक्र दैत्याच्या बाकी न सुख सारथा ।
आपसवे घेऊन त्या गोदा त्या समर्था ।
चालली म्हणून कच कोपर हन्वी यथार्था ।
तधींपासून कोपरगांव नाम या तीर्था ।
त्रिदशा वाहतसे अद्यापि त्रिपुरुषा ।
मधें बेट हयाशिर विष्णूनें ववआंगा ।
त्रैलोक्यतारिणी पंचनाम भवभंगा ।
पश्चिमवाहिनी गोदा प्रती मूळगंगा ॥ त्रैलो० ॥ ३ ॥

गुरु शुक्र कचेश्वर ऋषी गोदातीरवासी ।
क्षेत्राचा महिमा पाहून पंचक्रोसी ।
तें अपूर्व स्थळ मानलें राव श्रीमंताशी ।
मधें महाल बांधिला पुढें द्वारावती जैशी ।
लाविले रहाट जळें पुष्प बागांशी ।
अमोल तऱ्हेचे सरू शीतळ छाया ऐशी ।
महाद्वारीं शिवालय पुढें धावे अभंगा ।
पश्चिमवाहिनी गोदा म्हणती मूळगंगा ॥ त्रैलोक्य० ॥ ४ ॥
गेले परतंत्री साहेब दादा अवतारी ।
ह्यास्तव हिंगणीशीं जातां सडी स्वारी ।
त्यापुढें आणिक एक राघेश्वर कुंभारी ।
बेटाच्या पश्चिमभागींचा हा शिरी ।
पूर्वेशीं कोकमठाण नाम त्या नगरी ।
तेथें सुतगुल स्वामी मूर्तिमंत मदनारी ।
केलें गंगावर्णनमाहात्म्य या प्रसंगीं ।
त्रैलोक्यतारिणी पंचनाम भवभंगीं ॥ त्रैलोक्य० ॥ ५ ॥
राव राजेंद्र सुकशिला पूर्ण सांब अवतार ।
शिवनेरी तख्त सातारा पुणें शहर ।
चौ देशींचे नृप आणून देती करभार ।
छप्पन देशींचे मनुष्यजन अपार ।

झालें श्रीमंताचें दर्शन हें एक सार ।
विठ्ठल माय करी कृपा भुवन नाहीं तार ।
म्हणे परशराम येसू असो राज्य अभंगा ।
त्रैलोक्यतारिणी पंचनाम भवभंगा ।
पश्चिमवाहिनी गोदा प्रती मूळगंगा ॥ त्रैलोक्य० ॥ ६ ॥



## लावणी ३५ वी.

दशमुख लंकेशाची स्नुषा सुलोचना एक सती ।
भुज पाहुनी करी अकांत पडिले इंद्रजित रणीं पती ॥ ध्रु०॥
रवि कुळभूषण श्रीराम जो कां राजा अयोध्यापती ।
सितेस्तव वानरदळ घेऊनी आले सुवेळा प्रती ।
दुश्चिन्हें जाणवती सतीला गेले संग्रामा पती ।
वदनेंदु कोमेला कळाहीन वाटे सुखसंपत्ती ।
मोक्षसदन पावला इंद्रजित सौमित्राचे हाती ।
कंदुकवत् शिर नेलें वानरें उभें धड रणक्षितीं ।
सव्यभुज आली उडून उलंघुनी लंका निकुंभळेप्रती ।
आंगणीं पडतां नाद ऐकिला चिंतातुर झाली सती ।
॥ तोडचाल ॥ पहागे सख्यांनो कशाची ध्वनी ।
प्राणेश्वर रणीं सुखाचा असो ।
तंव त्या धांवत आल्या सेवक जणीं ।
प्रभा आंगणीं लागली दिसो ।
ह्मणती आला तुटून विराचा पाणी ।
पाहूनी भुज नयनीं आले आश्रू ।
उठली गजबजून डचकली मनीं ।
विघ्न पतिरायावर ह्मणी नसो ।
॥ चाल ॥ देखिला सुशोभितहो । कर रुधिरानें भरला ।

पेटी भुज हीर कंकण । चमके नीळ मुदिवरला ।
ओळखिला सतीनें तो । सप्रेमें ह्रदयीं धरला ।
सौभाग्यमणी माझा । चमूसागरीं निघरला ।
चाल ॥ घाली उडया आंग धरणीवर केश कुरळी ।
माखली धुळी । विखुरली पोत झळझळी ।
आहळली जशी करदळी । कीं शोकानळीं ।
सुमनकळी । तशी विरालित भूमंडळीं ।
आग लावारे सदनांत । होऊंद्या होळी ।
जीव तळमळी । मूर्छित पडे त्या वेळीं ।
चाल ॥ तेव्हां सखयांनी सावरून । केलें सावध पदरीं धरून ।
संकल्प मनाचा करून । स्वधर्म आपला स्मरून ।
चाल ॥ भोजपत्र आणविलें तत्क्षणीं । दउत कलम दिलें हातीं ।
पतिव्रता जरी मी असेन लिहून द्या जाली कैसी गती ।
दशमुख० ॥ १ ॥
वर्तमान वर्तला लिहितसे भुज देता लेखणी ।
सकळ स्त्रिया चौभोतीं पहा हातीं पत्र लक्ष राखुनी ।
पैक शेषकन्यके सर्वसंपन्न चतुर देखणी ।
समय आले आम्हासही तंव पूर्वीची आंखणी ।
मध्य हव देतां अग्नी केलें हवन मंत्र झांकुनी ।
आराध्यदैवत क्षोभविलें वानरें सिळा ओकोनी ।

केला पराक्रम उदंड परी तो जयपरिखा निरखुनी ।
उदारमन आह्मीं केलें संग्रामीं वीर मानवी देखुनी ।
चाल ॥ चवदा वर्षे तप निराहार केलें । आह्मांस्तव वीर त्या लक्ष्मणें ।
ती मज आली दया दान शिर दिलें । आपुल्या स्वकाया वाचा मनें ।
श्रीरामपदीं निजसुख मनीं लाधलें ।
अर्पून धड सुफळीत केलें जिणें ।
ह्मणून भुजमूळ तुज पाठविलें । उतरूनी भवदुस्तर सत्वर येणें ।
चाल ॥ तव प्रीतींत जीव रिझला । मी उभा तुझेसाठीं ।
होईल उशीर मजला । दे येऊन प्रिये भेटी ।
असें पत्र लिहून तिजला । भुज दावीत हातवटी ।
देह कागदभर झिजला । झाली भयाभीत पोटीं ।
चाल । चुकली मृगाक्षी हरण दुःख वाटलें । वर्म पटलें ।
वाटे गगन जणूं फाटलें ।
क्षणभंगुर जाउनी दुःख मायीक लोटलें ।
वदन उटलें । रोमांच अंगीं उठले ।
आलें स्फुरण सतीचें आंगीं प्रेम दाटलें ।
आश्रु आटले । चित्त प्रपंचांत विटलें ।
चाल ॥ झाली उतावेळ लढ्ढडी । करी शय्या दान आवडी ।
पतिव्रतापणाची आढी । त्रैलोकीं उभवीन गुढी ।
चाल ॥ स्वार होऊनी अश्विनीवर घेऊनी भुज शिबिकेमधी प्रीती ।

रावणाशी आली विदित कराया रूपगुणी जन वर्णिती ।
दशमुख० ॥ २ ॥
नख दृष्टी नपडे जिचें ती निर्भिड आली एकली ।
भुजे निढळ निकुंकुम येतां रावणानें देखिली ।
शिबिकेतून भुज सभेशीं आणितां होती वस्त्रें झांकिली ।
उघडुनी पाहतां नयनीं सकळीं रुधिरानें मांखली ।
हाहाकार झाला एकचि लंकाधीश धाय मोकली ।
धैर्यमेरू आज खचला शोकें मंदोदरी शोकली ।
शक्र जिंकिला समरीं कीर्ति त्रैलोकीं फांकली ।
तव सामर्थ्यें निर्जर बंदीं आज ही दशा ठाकली ।
चाल ॥ पुत्राचा प्रताप आठवूनी मनीं ।
दाही वदनीं घाली मृत्तिका ।
तंव ते विनवितसे शुभलोचनी ।
शय्यादानी मला चित्तवृत्तिका ।
लिहिलें जें आहे मजला स्वामिनीं ।
पहा वाचुनी हेच पत्रिका ।
द्यावें तुह्मीं सत्वर शिर आणुनी ।
आले ह्मणुनी हेच अर्थीका ।
चाल ॥ नाहींतरी मीच जातें न कार्य तुह्मा तोलें ।
करकरा दशन खाऊनी ।

विस नेत्र लाल केले ।
दळ सकळ सिद्ध व्हारे शिर आणून देइन वाहिलें ।
जयराम वधीन आज मी सुतपंथीं जाइन बोले ।
चाल ॥ करी उत्तर मंदोदरी । चतुरा सुंदरा । दशकंधरा ।
आणिलें विघ्न तुह्मी घरा । श्रीरामचंद्र गौरवा बहुत आदरा ।
व्हा विजयी धुरंधरा ।
वंशाशीं दीपक लावा निजमंदिरा ।
लावुनी इंदिरा । सांगतें गोष्ट जिवीं धरा ।
चाल ॥ ऐकणें नसेल अंतरीं ।
जाऊंद्या तिजला तरी ।
लंकापति उत्तर करी ।
आणिली सीता आहे घरीं ।
चाल ॥ वर्म धरूनी अभिलाषील तिजला कैसी करावी गती ।
परद्वारीं कोण जय पावला पहा विचारुनी चित्तीं ॥ दश० ३ ॥
साह्य बिभीषण दयाब्धिनायक राजा रघुवीर आहे ।
मंदोदरी ह्मणे जाय मायगे तुझी तूंच निर्भयें ।
अर्वसहस्त्र डवेंदासी निघाल्या नधरितां संशय ।
येतां निकट वानरें देखिली अंतरीं आनंदमय ।
दिली सिता सोडूनी रावणें धरूनी प्रभूचें भय ।
श्रीरामाशी येऊन सांगती आली जनकजामाय ।

न पडे दृष्टी तुमच्या जावत रावण जिवंत आहे ।
युद्धावीण तो कदा न सहसा सोडी कालत्रय ।
चाल ॥ रत्नमणीमय पायीं पादुका ।
दूर तोंचि उतरूनी अश्विनीखालीं ॥
शुक्लपक्षींचा लघु इंदु का ।
सेना सर्वही पाहूं लागली ।
श्रीराम सौमित्र कृपासिंधु का ।
पाहूनी सान्निध नेत्रकमळीं ।
चाल ॥ पहा ही शक्रारीची कांता ।
सुकुमार धुळें भरिली ।
ठेवितां भाळ चरणीं राघवें हृदयीं धरली ।
तूं धन्य धन्य माते तव नामें दुरितें हरिलीं ।
श्रमलीस पृथ्वरी कां उत्तर करूं अनुसरली ।
चाल ॥ तूं मच्छ कच्छ वराह नारसिंहरूपा ।
रवि कुळदीपा ।
तूं धैर्य ध्यान चिद्रूपा ।
वामना तूंचि भार्गवा आचरशी तपा क्षात्रिणी क्षपा ।
गोब्राह्मण आणिले रूपा ।
शिवाचें निज बीज आचरूनी जपा ।
दाविसी रूपा ।

मजवरी करावी कृपा ।

चाल ॥ राघवा तनु कोमळा ।

तव नामीं तरल्या शिळा । चरिल दाविशी लिळा ।

स्तुति करूनी उभी अबळा ।

चाल ॥ उशीर होतसे मला ।

आणूनि द्या पतिशिर सत्वरगति ।

कुशळ बोल ऐकूनी तोषली सकळ सभा जीत पती । दशमुख०॥४॥

रघुवीर ह्मणे आह्मीं शिर आणिलें हें तुजला कळलें कसें ।

लिहुन दिलें दाखवी पत्र हे भूज पुढें ठेवितसें ।

आश्चर्य सर्वांशीं निर्जिव कर लिहितां न दिसे ।

बरें असो शिर हासवील तर हें खरें आह्माला ठसे ।

रामचंद्र ह्मणे पतिव्रता हें अगाध तिजला नसे ।

केश धरूनी आणविलें रुंड तें वृषभा हातें जगदिशें ।

सव्य नेत्र झांकिला वाम नेत्र तो उघडा असे ।

उत्तरी व्रस्त्रावर मग ठेवी सकळ सभा पाहतसे ।

चाल ॥ आठऊनी मग निजसुख ह्रदयांतरीं ।

कर्माची गती गहन ईश्वरा ।

निष्ठा पदीं असेल तुमच्या जरी ।

एक वेळ हासावें प्राणेश्वरा ।

राहील ही कीर्ति दिगांतरीं ।

सीमा सौभाग्याच्या ऐश्वरा ।
आणखी ही सभा मानवेल सारी ।
होयील सांगाया सुरा असुरा ।
चाल ॥ उभयतां तुह्मीं आह्मीं मनीं इच्छा नाहीं पुरली ।
जुंझतां रणभूमीं कीं धनुर्विद्या सरली ।
नाहीं आलें समरंगणीं मी ह्मणूनी आढी धरली ।
राहिले चित्त कासी कल्पना मनींच मुरली ।
चाल ॥ सगा विनोद प्रारंभूनी काय बोलती ।
सुलोचनासती ॥
खिजवूनिया आपुला पती ।
विटंबिली शूर्पनखा तुमची आती ।पंचवटी प्रती ।
निर्नासिक आली रीती ।
वीर कुंभकर्ण पावला रणीं विपत्ती ।
वानरा हातीं तो राग आलासेल चित्तीं ॥
चाल ॥ बोले सुलोचना गहिंवरून ।
अभिमान दासीचा धरून ।
हांसावें कृपा करून ।
मुखचंद्र गेला उतरून ।
चाल ॥ एक चुकलें पिता शेष न साक्ष आणिला पती ।
हें उत्तर ऐकूनि शिर हांसलें उघडूनि नेत्र पाहती ।
दशमुख०

॥ ५ ॥

पिता शेष न साह्य आणिला ऐकूनिया उत्तरा ।
शेष हाच सौमित्र ह्मणूनि आलें हास्य सतीच्या वरा ।
ज्ञानदृष्टीनें खूण दाविली शिर हालवूनी थरथरा ।
मम कन्या जाणूनी कळवळला लक्ष्मणं अंतर ।
सजीव करा इंद्रजित ऐकुनी हीव आलें वानरा ।
भीड उलंघूनीं मारुती बोले न्याय नीतीनें करा ।
पिता सुत गुरू बंधू समरीं दोष नाहीं रणशूरा ।
चाल ॥ द्यावें शिर ठरलें सर्वांमुखीं ।
चित्ता निराशा बहु वाटली ।
तंव तें शिर घालूनीया पालखीं ।
पाह्मा मंडपीं सभा दाटली ।
रामा तूं विजयी होशील सुखी ।
आज्ञा घेऊन चरणीं लोटली ।
आवरी हें वानरदळ मजविशीं ।
युद्ध न करी ह्मणूनी उठली ।
चाल ॥ मग लंकेसमीप येऊन ।
सकळांशीं श्रुत केलें ।
वरी स्मशानभूमी पाहून ।
परिवार सकळ आले ।
विधियुक्त पूजा वाहून ।

विस्तीर्ण कुंड केलें ।
पत्रांपत्रीं लिहून वर्तमान दान दिलें ।
चाल ॥ करी धर्मशिळेची पूजा उभी राहूनी ।
स्तब्ध होऊनी ।
पतिरूप आणिलें मनीं ।
निघाली मुखांतूनी ।
अंतरज्योति ह्मणीं ।
ताठ ध्वनी ।
मी दासी ह्मणवुनी ।
अग्नीमध्यें पडिला देह प्रेत होऊनी ।
सुरवरगणीं ।
वर्षाव केला सुमनीं ।
चाल ॥ या नांव ह्मणावें सती ।
जीत जगती माहीं त्या गती ।
केली जडना साधून राती ।
नामें विठ्ठल वर दे मती ।
वावी गांव सर्व जाणती ।
परशराम करी कवन जगीं इच्छून साधुसंगति ।
तारी तारी करी कृपा ।
येसू ह्मणे श्रीराम सीतापति ।
दशमुख०
॥ ६ ॥

## लावणी ३६ वी.

कसी सोन्याची लंका झाली आयका ।
देवाची मूळ वार्ता ।
जुनाट कथनें पाहून केली वाल्मीकानें कविता ॥ ध्रु० ॥
पुण्यशीळ एक राजा त्याचें नांव इंद्रद्युम्न ।
स्नान संध्या करीत होता नेत्र लावून ।
आला अगस्ती सहज नाहीं केला सन्मान ।
हजार वर्षे गजेंद्र होशी दिला श्राप त्यानें ।
दुसरी कथनी पुढें लागली ऐका सज्ञान ।
गंधर्वाशी शाप दिधला त्याच अगस्तीनें ।
नक्र होऊन भांडशी गजेंद्रा आशी उद्धरून ।
नक्र गजेंद्र देवें उद्धारिले एक पुण्य वाहता ।
गजेंद्र मोक्ष या परी झाला साक्ष शास्त्र गीता ॥ क० ॥ १ ॥
क्षुधेनें पिडला गरुड विनंती विष्णूशीं करी ।
आहारासी या कांहीं मागतां दया आली अंतरीं ।
नक्र गजेंद्राचीं प्रेतें होतीं सरोवरातिरीं ।
भूमीपासून चार योजनें शरीराची थोरी ।
आज्ञा होतां घेऊन उडाला मेरूच्या शिखरीं ।
भार साहेसा वृक्ष पाहिला शाखा त्याला चौफेरी ।
एक एक शाखा शंभर योजनें लांब बरोबरी ।

साठ हजार ब्रह्मयाचे सुत होते एके शाखेवरी ।
जांबूळ वृक्ष नांव तयाचें शोध करून ध्या अर्थी ।
हातीं एयढें जांबूळ फळ तें सुवर्ण होय्र आलां ॥ क०॥ २ ॥
कडाडली ती फांदी बैसतां चोंचीमध्यें धरली ।
संकटीं पडला गरूड तयाची बळ शक्ती सरली ।
पिता कश्यपा वर छाया धरली मनीं बुद्ध संचरली ।
कळवळा करूस ऋषी उतरविले खालीं मग चिंता हरली ।
बसून पर्वती आहार केला उदर कोठी भरली ।
पदभारें झाला त्रिकुटाचळ तो चीर नखें खिरली ।
तीथ राहिली शाखामनसुफी थोडक्यांत आटली ।
त्यावर वसविली लंका विधिनें अजिंक कशी ठरली ।
माल्य सुमाल्य सुमाळी तिसरा पराक्रमी होता ।
त्याणें घेतली लंका खंदक दर्यासभोंवता ॥ क०॥ ३ ॥
माल्यसुमाल्य येऊनी विष्णूनें वधिले स्वहस्तें ।
सुमाळी राक्षस तिसरा जगला होउनीया गुप्त ।
ब्रह्मसुत पौलस्ती त्याचा इषुश्रवासुत ।
इषुश्रवाचा कुबेर आवडता होता शिव भक्त ।
तयाशीं दिधली लंका ठेविली नवनिधी संपत ।
वेश ऋषींचा धरून सुमाळी करावया घात ।
त्याची कन्या कैकया इषुश्रवास नवती सुत ।

बळें आणून पदरीं बांधली करून दिली दुहिता ।
भोग तयातें मागूं लागली अग्निहोम देतां । क० । ४ ॥
राक्षसकन्या म्हणून तयाला दिलें शापदान ।
राक्षस तुजला पुत्र होतील रावण कुंभकर्ण ।
धांवून लागली चरणीं एक तरी द्या भक्तजन ।
तिसरा पुत्र साधु जन्मला भक्त बिभीषण ।
कुबेराचे ते सापत्न बंधु सखे तिघेजण ।
मागून घेतली लंका तयांनीं पित्यापासून ।
त्रिकोण लंका शहर वसविलें तिनशें योजन ।
लंका निकुंभळा सुवेळा हाच एक त्रिकूटाचळ जाण ।
एकवीस द्वारें आहेत तयाला ऐक कविसुता ।
चार हजार शाणव आधळे द्रव्याची गणता । क० ॥ ५ ॥
तिन हिसे लंका जाळली वीर हनुमंतानें ।
तळीं शाखा होती म्हणून झालें बावनकस सोनें ।
मढका द्वारका लंका तिही देवानें केल्या तीन ।
चौथी हेमपुरी निर्माण केली ईश्वरमायेनें ।
केल्यावांचून घरें कशीं होतील बारीक करा ध्यान ।
बावी गांव धनवटांत अज्ञा परशराम येसू करी कवन ।
रामकृष्ण गुणी रामा गाती कां पडली भ्रांता ।
शेषाला नाहीं अंत लागला सोडून द्या अहंता । क० ॥ ६ ॥

आत्मलिंग आणि देऊनी पार्वती भक्तीस्तव गौरव ।
दहा शिरें वीस भुजा दिल्या त्या भोळ्या कृपानव ।
अमर कुपी पोटांत घालुनी अमर केला जीव ।
चार कल्प जाऊन एक युग हा चतुराला अनुभव ।
चहु युगांची एक चौकडी प्रमाण करी लाघव ।
अशा चौदा चौकड्या राज्य दिलें आणि लंकेचें वैभव ।
रीस वानरा हातीं मृत्यु तुज वधतील वीर मानवी ।
असा दिला वर सदाशिवानें थरथर कांपे मही । ज० ॥१॥
अणुरेणु लहान जो कां ब्रह्मांडाहून थोर ।
तयास कळली वार्ता दिला रावणाला वर ।
आत्मलिंग पार्वती सोडली पृथक् सांगतों सार ।
मग कन्या मंदोदरी घेऊन गेला लंकेश्वर ।
याच्या वधास्तव आज सुत दशरथ सूर्यवंशी नृपवर ।
शृंगऋषी हातीं त्रिपींड केलें तिघी भार्या प्रियकर ।
आधीं पिंड न दिला म्हणून कैकया लाविना कर ।
ब्रह्मशापी देवांगनाही होऊन फिरतसे घार ।

चक्राचा अवतार भरत [illegible]
शेष तो सौमित्र शेषशाई तो रघुनंदन ।
रविसुत सुग्रीव अमरपती गुरुबृहस्पती सुषेण ।
तेहतीस कोटी देव अवतरले होऊन वानरगण ।
रयांचीं नांवें सांग शाहिरा कशास मिरवितोस पण ।
विनअपराधी गाळी मारला होता पूर्वीचा कोण ।
प्रल्हादाचा अंगद ऐशी निवड करून दावशी ।
हिराजिम्यावर घालून पसारा घरोघर झाले कवी । ज० ॥२॥
देहे चिन्ह मारुतीचें पुसलें प्रश्न सांगतों असा ।
पिता केशरी अंजनी माता पतिव्रतेचा ठसा ।
वासरवेदीं शिवरेत द्रवला विष्णु मुख्य धरी रसा ।
अंजनी श्रवणीं बीज फुंकलें वायुनंदन तसा ।
उपजत सूर्या गेला गिळाया मुखीं आली काळसा ।
इंद्रवज्र हनुवटीला हाणिलें हनुमंत ह्मणे असा ।
ह्मणून पुच्छ वज्राचें केलें कहसूत रामदासा ।
अंजनी पयें धार छेदिली कर्णकथिला पुसा ।





भरतबाणी पायवाडा द्रोणागिरी समयीं ।
पार्थाचा शरसेतु मोडिला धनुष्य उत्कट होई ।। ४ ।।

लावणी २८ वी.

रमारंगे श्री रंगे अभंगे तारि तारी मज दिना ।। ध्रु० ।।
रघुवीरसम वीर समग्र वानर थोर थोर महाप्रतापी ।
सभेस बसले श्रीरामचंद्र अठरा पद्म येऊनी कपी ।
नळनीळ सुग्रीव सबळ बळी पहा मारुती वानर रुद्ररुपी ।
प्रेमसुगळ कोपी चतुर शहाणा आणा एखादा वीर पाहुनी कपी ।
चाल ।। लीनपणें कपी सुकील म्हणे होती कार्यें ज्याणें ।
कळा सर्व जाणे ।
दशमुखांतूनी ज्याचे शब्द जाणे ।
तो अंगद वाळीसुत
त्याचे पराक्रम अद्भुत ।
तो स्वामी आपला दूत ।
ध्या पाचारूनी त्वरित ।
चाल ।। लवूनी मेहुनी क्षणशब्द राहून रामस्वरूप पाहून करी
वंदन लागे चरणा ।
जा लंकेप्रती म्हणे रघुपती बरे रीतीनें सांगा लंकापती रावणा ।। १
सार सार केलें फार निरुपण सुज्ञ अंगदा जाय त्वरें ।
श्री रामाची आज्ञा वंदुनी कंदूक जैसा गगनीं फिरे ।

आकाशपंथें लक्षिती लंका ऐका पक्का कोट शिरे ।
चार लक्ष आणि शाण्णव हजार हुडे पाहतांना नजर पुरे ।
चाल ॥ लंके आंत कपी त्वरेनें जात ।
लंकेची मात ।
दृष्टीनें पहात ।
रघुपतीशी ध्यात ।
देखिले देव बंधांत ।
अति क्रोध आला चित्तांत ।
पहावयासी लंकानाथ ।
पातला सभेच्या आंत ।
असुर चित्तीं ह्मणती मारुती आला मागुती भये आंती ।
असे सकळ जनां ।
रावणापरी उंच बैसला घालुनी पुच्छासना ।
जा लंकेप्रती० ॥ २ ॥
क्रोध अंगदा ह्मणे दशकंधा ये मतिमंदा कुतर्क ना विचारी ।
नांव गांव ना पुसाल कोणी मूर्ख सभा उन्मत्त सारी ।
ह्मणे रावण तूं वनचर वानर धीट मर्कटा फालहारी ।
तुज ऐसा एक पूर्वी आला गेला जाळूनी लंका सारी ।
चाल ॥ आलास तूं कां नसे ठाऊका ।
बोल मशका ।

अंगद ऐकून बहू बोलका लंका नायका ।
उत्तर करी प्रमाण ।
जेणें कक्षेमधीं तुझी मान धरून केलें ।
समुद्रीं स्नान ।
पालखा बांधिली जाण ।
तंव घडलें मूत्रपान ।
वाळीसुत मी दूत रामाचा अंकित त्याचा न जाणसी जरी खुणा ।
शूर्पनखा तुझी बहिण विटंबिली पंचवटीच्या वना ।। २ ।।
सीता सती पतिव्रता पतिला सोड सोड तूं दशशिरा ।
स्वजपें राज्य हें करी का आपलें नाहीं तरी जाशील यमपुरा
नेम करून श्री राम आले मज काम सोंपिलें सीतेचे
संग्राम करा ।
उत्तर सत्वर करी दशकंदा बहुत बोले पामरा ।
चाल ।। ऐक वानरा वाळीकुमरा यें व्यभिचारा ।
सुग्रीव द्वारा ।
आजेणी दारा ।
तू असतां कुठीं ।
मारिलें ज्यानें वाळिसी ।
पटीमार त्याचा वानसी ।
[illegible] ।

पितृ शत्रु दास तें काम तूं करशील कपी मतिहीना ।
साद्य नसल्या आमची पाठ निघ ।
रघुपती आणूं आज रणा ॥ ४ ॥
रसातळामधीं जाईल वाहील एक वेळ उलटी गंगा ।
पूर्वेचा पश्चिमेस उगवेल परी सीता न मिळे सांगा ।
वटवट करशी वृथा किमर्थां ।
राम समर्था त्याची आहे मज अनेगा ।
आज्ञा नाहीं नाहीं तर तुझी दहा शिरें नेतों भंगा ।
चाल ॥ क्रोध हा अस्पराधरा जीवेंची मारा अंगद वीरा केली त्वरा ।
हृदयीं मारली लात मंडपाशी देऊन हात ।
उडाला अकस्मात् शिष्टाई जाली समस्त विठ्ठलपदी कवी
नवी नित धरणी ।
हरिपदीं चरणीं रामकृष्ण गुणीजना ।
वांधी गांव तेथें परशराम थेसू वर्णी हरीच्या गुणा ॥ ५ ॥

## लावणी २९ वी

पुत्र असावा सुपुत्र ज्याचे जन कांही अवघे गुण घेती ।
काय कामाचे दहावीस असले अभिमानामधीं धूळ माती ॥ ध्रु० ॥
सूर्यवंशीं राम जन्मले गेले लंकेवर फक्त सडे ।
कुंभकर्ण रावण अभिमानें पहा दृष्टीनें केले झगडे ।
गांधारीस अंगद जाले वानर असतां वय केवढें ।

सभामंडप घेऊनी उडाले कौरव नासे होते थोडे ।
धन्य भाग्य कुंतीचे उदरीं धर्म भीम अर्जुन गडे ।
कैकामाचे गांधारीचे एकोत्तरशांचे केले रगडे ॥ १ ॥
पतिव्रता अंजनीस झाले हनुमंत महा सायासी ।
लक्ष्मणाला शक्ति लागल्या आणिलें द्रोणागिरीशी ।
भगीरथानें गंगा वळली उद्धारिलें पूर्वजांशी ।
साठ हजार होते संग्रामीं असून नसून काय अपेशी ।
पांडव अंगानें भक्ति केली केली देवें आपलीशी ।
एकोत्तरशें कौरव मारिले छप्पन कोटी यादव आपसासधी मेले कटून।
विनतेचा पुत्र गरुड तरी चरणी सामलीन ।
पांच पुत्र होते भीमकाला रुक्म्यानें केला अभिमान ॥ २ ॥
पुत्र असावा शुकस्वामी सारखा हरीला भजती अहोरात्रीं ।
निस्तुक नसतां वंश बुडला तसा नसावा कुपात्री ।
विठ्ठल नामीं छंद गातो तोंड लावूनी कांहीं शास्त्रीं ।
परशरामाचे अजय भिराके अशा फुकण्या मोजाव्या किती ।
पुत्र अ० ॥ ३ ॥

लावणी ४० वी.

सौमित्र चाप चढवून । शर ओढून ।
भुज तोडून । जरजर केला ।

दशकंधर सुत भार्या हें कळलें तिजला ।
खचळला मुगुट गिरीकडा ।
भंगला चुडा । कुरळ्या लडा । पदर तळीं आला ।
अशुभ चिन्ह विचित्र लागला भाला ।
कीं अजय झाले रणीं । सखे साजणी । आहेवमणी ।
तुटून पडला । चिंतातुर झाले राजे होईन या चपल ।
कडकडलें नभी मंडळ । तेज अढळ ।
हस्त कोमळ । रक्त भरियेला ।
पडतांच आंगणीं श्रवणीं नाद ऐकिला ।
चाल ॥ तेव्हां घाबरली सुंदरी ।
शोक अति करी । भुजेशीं पाहतां ।
ओळखिल्या मुद्रिका करीं । तेव्हां क्षितीवरी पडे वीरकांता ।
अगे अगे सखे तू भुजे । तुला मी दुजें कसें धरूं आतां ।
सप्तदश वेळां इंद्र तुम्ही राजेंद्र जिंकला होता ।
लाविले बाण सौमित्रा । आणिक इतरा । नवती गणिता ।
दुर्बळा द्रव्य सांपडे । साध्यना घडे पूर्व फळ वाहतां
चाल ॥ त्यारिती हो मजशीं । लाधिले तुम्ही स्वामी ।
जडलें मी पदीं या ।
अहो कर्म निष्कामी । तुम्ही अजिंक्य होता ।
कसे निजला संग्रामीं ।

चाल ॥ इंद्रारे इंद्रा प्रत्यक्ष चंद्रा भार्या मी तुमची विराजिता ।
शुभ साधना पूर्व साधना प्रियकर सी तुमची वनिता ।
चाल ॥ वर्तलें नवल हें खरें । भुंगीनें सिंधु शोषिला ।
मर्कटें वीर वानरें घेनूनें व्याघ्र मारिला ।
अंतरीं शोधितां बरें । निश्चय तिनें धरिला ।
दिलें दऊन कलम भुजेपाशीं । मारिलें तुशी लिहून दाव मशी ।
सांग करार । पतिव्रता असेल तर लिहून दावी अक्षरें ।
इंद्रजीत समरंगणांत । देहे संगणांत । भुज आंगणांत ।
पडे महिवर । महाधैर्यवंत पतिव्रता सुलोचना चतुर ॥ १ ॥
भुज कलमें धरी तेवेळीं । लिहून दावी वळ । सर्व समुळ ।
लिहिला वृत्तांत । क्षीरसागरींचे निधान राम साक्षात ।
जरी पुसशील लक्ष्मण मारिलें ज्यानें । विजयी होऊन ।
दैव भगवंत । नटले दैव विचित्र पुरला अंत ।
म्यां उदंड तप साधान । केलें हवन विवर पाहून ।
स्थळ एकांत । तेथें बसलों न कळों दिलें कोणा किंचित ।
हवनांतून विजय रथ वारू सहित सर्व साहित्य ।
दिलें उमाकांतें । रथ अर्धा निघता केला दुष्टांनीं घात ।
चाल ॥ हनुमंत आणिक वानरें टाकिती वर शिळा आणूनि ।
हवना परी विध्वंसिलें निष्फळ गेलें झाली हानी ।
परी न टळला युद्धाशीं । नागफांशीं । तया लागुनि ।

निरउपाय झाली गोष्टी । पावलों कष्टी समरांगणी ।
भुजेनें ऐसें लिहून । कलम ठेऊन पडे निर्जिव होऊनी ।
मग मूर्च्छागत झाली तेव्हां सखया सावरती ।
सरिता नेत्रीं वळली हरपलें बाई मोती ।
नाहीं करुणा आली कैसी तुजला बा श्रीपती ।
चाल ॥ चक्रचाळका भक्तरक्षका परात्परा परमेश्वरा ।
बिन अपराधी धेनू नाडली चुडाभंग केला ईश्वरा ।
भुजकर पल्लवीं धरिली म्हणे हो राजेश्वरी ।
पाडसा हरण चुकली । ती मजला झाली परी ।
दश दिशा पालटल्या । दिसे भयाण लंका सारी ।
दशमुख सभामंडपीं । महावीर तपी देऊनी शिवरूपीं तव आधार ।
तेथें गेली सुलोचना जसा दिसे भास्कर ।
इंद्रजीत समरांगणांत देह भंगणास भुज [illegible] ॥ २ ॥
ज्या सभेमधीं रावण तेथें जाऊन वर्तमान । सति कांताचा ।
मुद्रिका कर दाविला इंद्रजिताचा । मुद्रिका कर ओळखिला
तेव्हां कळवळला । देहे पाजळला अग्न स मतेचा ।
भद्रासन तळ पडीयला भूप लंकेचा ।
ऐकूनि मंदोदरी आली बाहेरी । दुःख अंतरीं खेद पुत्राचा ।
काष्ठानें अग्नी गिळिला न्याय हो कैचा ।
वय लहान तूं युद्धाशी । कां गेलाशी । हरपलाशी हिरा कुळींचा ।

शिव हरा कसा विघाड धेनुवत्साचा ।
धेनुसम आक्रंदती शोक करिती । मंदोदरी ।
मग बोध करी रावणा मनीं कांहीं आणा । पहा दुःखरी ।
वर्जितां आणली सीता सोडून द्या आतां । गोष्ट नाहीं बरी ।
आखयासारखा सुत । इंद्रजित वधिले वीर भारी ।
निर्वंश तुह्मी कराल । राज्य हराल लंका सारी ।
ज्याचे नामेंकरून । गेल्या तरून । शिळा सागरीं ।
तो म्हणवा कसा । शरण राजसा । जाहो लवकरी ।
रघुवीर प्रतापी । ना जिणवे तुह्माशी तूं अगाध रूपी ।
करा सख्यत्व त्याशीं । ज्याची शयना कपी ।
आणिवलें द्रोणागिरीशीं ।
चाल ॥ सोडा सीता पतिव्रता अनंता ध्याती सार्थक जन्माचें ।
राज्य करा तुह्मी धुरंधरा आतां चरण धरा श्रीरामाचें ॥
हा पाराशर बोधिला । ज्याचे मदोन्मत्त इभ्रता ।
जरी कुत्री का न्हाणिला । परी न होय शुभ्रता ।
जरी गर्दभ शृंगारिला । न शोभे अश्व आश्रिता । मी
झालें दोहींचें बोलणें । सुलोचना ह्मणे । पतिसंगें जाणें हाच निर्धार ।
सम्याख्यान करणें मला आणून द्या शिर ।
इंद्रजीत समरंगणांत देहे भंग० ॥ २ ॥

काय बढाई । एके क्षणी राम जिंकीन होऊन विजयी ।
कशात काय मर्कटें । धरूनि शेपटें । करूनि एकवटे बहु भंडाई ।
सागरीं नेऊन बुडवीन एके घाई ।
तेंव्हा अबला ह्मणे तुह्मी तराल । युद्ध कराल ।
रघुवीर हराल कोणे समई ।
नाहीं तर मी जातें मजला आज्ञा द्यावी ।
चाल॥दशवक्त्र उत्तर करी । ऐक सुंदरी । सांगतों तुजशीं ।
नको शरण जाऊं रामाशी । तया दुष्टाशी । उणें वंशाशी ।
निर्वाणीं युद्ध करीन । शिर मी आणीन । स्थिर जरी होशी ।
गर्वाचा शब्द ऐकून । मंदोदरी ह्मणे लंकेशासी ।
पुरे आतां क्षय आणला । जाऊंद्या इला । रामापाशीं ।
यावरी बोले रावण । दिसे दुश्चिन्ह । सत्य मानसीं ।
आणली सीता आपण । धरून ती खूण । हेत अभिलाशी ।
ाल ॥ हें कळो वर्म । कसें निष्ठुर बोलतां । एकपत्नी राम ।
सीतेवीण जगपीता । हा माझा नेम जातें मी बसा आतां ।
निष्कपट बहु मनीं । निकट आवडी भेटी द्यावी श्रीरंगाची ।

सभा बसली निरवीर झाली चिंतातुर दशवदनाची ।
चाल॥ सुलोचना तेव्हां त्या वेळीं । चालली सभा सोडुनी ।
लंकेची प्रजा तरमळी । शोक करी अति पाहुनी ।
शशी कपी असतां चळी । तशी गेली लंकेंतूनी मी ।
पावली रामाचें दळ । प्रताप सबळ । कपीमंडळ । थोरथोर।
पुढें वाट करी सुग्रीव पाहती वानर । इंद्रजित समरंगणांत ॥ ४॥

## लावणी ४१ वी.

रावणाप्रती विनविती सती पतिव्रता ।
निर्दोष यश घ्या पदरीं सेवोनी द्या सीता ॥ ध्रु० ॥
पूर्वांपार राजे अपार झाले क्षिती ।
परि तुह्मासारखी कोणासी वरीं संपत्ती ।
स्वर्गींचे अमर पुढें सुरवर नर राबती ।
गड अजिलंका सुवर्णमय शोभती ।
ऐशी हजार ललना देवांगना प्रती ।
पतिव्रता सीता हाकनाक आणिली सती ।
चाल ॥ पूर्वी शिव केला प्रसन्न तुम्ही तप करून ।
ज्याकाळीं दिल्हा जो वर अथवा जिवीं धरून ।
ज्यानामीं तरल्या शिळा समुद्रावरून ।
वानरसेना झाली मरण गेलों विसरून ।
हे शेषशाई अवतार अवतरूनी आतां ।

राक्षसी आहार मानसी यासी काय वेहून ।

चाल ॥ कोण अमरपदा येऊनी आला सखे ।
गेले मरुनी भृशुंडी बगदालभ्यासारखे ।
नाहीं आकार पावती विकार आपती दुःखें ।
जयविजय अथवा हानि होऊंदे सुखें ।
हे दुपारची सावली शरीरसंपतां ।
राक्षसी धर्म न सोडूं सर्वथा ॥ २ ॥
श्री रामचंद्र तुम्ही मानवी म्हणतां कसे ।
भ्रांतीनें भुललात देही विषयाचें पिसें ।
एक वानर येऊनी सीताशुद्धीचे मिसें ।
त्यानें लंका जाळिली क्षणामधीं तिन हिसे ।
चौभवतें दरिया रिघ मुंगीला नसे ।
आलें दळ उतरुनिया पायवाटेनें जसें ।
चाल ॥ हें समजुनिया अशांत व्हाल जरी ।
घ्या सीता नेऊनी गौरवुनी आपुले करीं ।
आले सुळाहुनी पहा चालुनी आपले घरीं ।

साक्षात विष्णु हा भाव धरुनि अंतरीं ।
द्या सीता नेऊनी अपेश कशाला घेतां ।
मग नाहीं भय वंशपरंपरा नांदतां ॥ ३ ॥
मी प्रतापी रावण धाशत देवादिकां ।
वेदाचीं खंडें करूनी उघड केली टीका ।
देऊं सीता नेउनी घेऊं अपकीर्तीचा थुंका ।
वंशाशी बोल लागेल पाहे केवढी चुका ।
चाल ॥ रघुवीर नंदन मी युद्ध करून हरीन ।
राक्षसी कुळ हें समूळ रामरूप करीन ।
तूं जन्मोजन्मी पट्टराणी तुला मी वरीन ।
विठू परशराम येसू लाघव करि कविता ।
रामकृष्ण रामा ह्मणे भावें ध्यावें स्वहिता ।
रावणाप्रति० ॥ ४ ॥

## लावणी ४२ वी.

दुर्योधन दुर्बुद्धी पुसे नित्य करून भिमाची रळी ।
द्रौपदीचे मंदिरीं खरें सांग आज कोणाची पाळी ॥ ध्रु० ॥
अठोकाट एकात्तरशें कौरव करूनी बसले सभा ।
सभेशी येता भीम दुर्योधन उठूनी राहे उभा ।
सन्मानें शेजारीं बसवून ह्मणे माझ्या दुर्लभा ।
खरेंच सांग आज द्रौपदी आहे कोणाची वल्लभा ।

शब्दशस्त्र शत्रुचे लागती जशा अहीच्या जिभा ।
क्रोध आवरून भीम ना बोले न चाले मनसुभा ।
सूक्ष्म झालें शरीर असूनिया प्रताप अंगीं बळी ।
द्रौप० ॥ १ ॥
निजदासाचा सखा हरी तो गुज भिमाला पुसे ।
सूक्ष्म झालें शरीर उतरला चंद्र तुझा कां दिसे ।
वृकोदर ह्मणे तूं कैवारी असतां न्यूना नसे ।
कै काळा शिक्षा लावीन इतर काय माणसें ।
बस्त मस्त हे कौरव उतले एक एक मनीं येतसे ।
रक्तपान वाटतें करावें तुझीच आण वाहातसें ।
सभेशीं येतां दुष्ट दुरात्मा हृदयीं बाण लावितसे ।
द्रौपदी सेनी पाळी कोणाची नित्य दुर्योधन पुसे ।
असें वर्म सांगतां श्रीहरी ।
तप्त होऊनी बोले वनमाळी ।
तुझे हातानें अवघे संहारीन करीन रणरांगोळी ॥ २ ॥
पतिव्रता सती भानुमती आहे दुर्योधनाची राणी ।
प्रीत पतीची बसावी कुडें कपट धरी मनीं ।
दुर्वासापून तेल भारिलें ठेवियेलें निज भुवनीं ।
लाव मस्तकीं वश होईल हरुशली बहु मनीं ।
तेल लावितां महिवर पडतां अपाय होईल हानी ।

आह्मीं केलें तें न मोडी ब्रह्मा संकट पडशी ह्मणी ।
तेल लाविता भूमीवर पडलें गेलें पाताळभुवनीं ।
शेषाचें मस्तकीं लागतां भुलला तत्क्षणीं ।
नित्य ठेऊनी दुर्योधनाला बांधून पलंगा स्थळीं ।
भानुमतीला भोगून जातो दुष्ट मनीं तरमळी ॥ ३ ॥
असें वर्म सांगून श्री हरीनें उगविलें सांकडें ।
आज कोणाची पाळी ह्मणतां करी उत्तर रोकडें ।
आज शेषाची पाळी ह्मणतां लवण जळामधीं पडलें ।
जसें अभाळ गगनीं विरालें गंधर्वाचें हुडें ।
शेष जातो भानुमतीस हें श्रुत झालें चहुंकडे ।
पृथ्वी कशावर ठेवीत होता सांगून बोला पुढें ।
नामीं विठ्ठल परशराम ह्मणे मूळ शास्त्राचे धडे ।
रामकृष्ण गुणी रामा गातो सर्वांचें गणित झडे ।
शिकून सीकोरे गाती नाचती चुली भाणोशीवळी ।
शाहिरामधीं एक सरेना नाच्याची मंडळी ॥ ४ ॥

## लावणी ४२ वी.

श्री चरित्र थोर समुद्र त्यांतूनी कोण पार पडियेला ।
विरळा क्वचित्त त्यांत राहिला ।
चव युगांमध्यें कितीक बुडाले ऐका त्याचा दाखला ।
तपश्चर्येचा मेरू भंगला ।

विश्वामित्रानें तप सोडून उर्वशी मार्गे लागला ।
मारतंड दुतवर्ण जहाला ।
मोहनी रूप शंकरें पाहून लिंग पतन पावला ।
कीं ब्रह्म आणू जणे जगीं ठरविला ।
चाल ॥ अमरेंद्र इंद्रभुवन ।
सोडूनिया फिरती वन ।
गौतम शाप दारुण ।
सीता सीता ह्मणूनी प्राणा मुकले लंकापती । ॥ १ ॥
खंडीमधी०
परपुरुषाचे पायीं स्त्रीयेनें सोडून आपला घर ।
केली अपकीर्ति पृथ्वीवर ।
मही रावणाची स्त्री कवळली राम पाहिला वर ।
वधिला आपला प्राणेश्वर ।
पार्थ रतीशीं रत ना होतां शाप दिला दुर्धर ।
नपुंसक होय एक संवत्सर ।
चाल ॥ परपुरुष स्वप्नीं पाहूनी ।
चित्रेशीं उखा प्रार्थुनी ।
आणियला द्वारकेहूनी ।
तारा बृहस्पतीस लुब्धली कलंक चंद्राप्रती । ॥ २ ॥
खंडीम०

प्राणपती अहो स्त्री संगतीनें कितीक गेले मरून ।
नाहीं ते उदयास आले फिरून ।
पार्वतीनें त्या भस्मासुराशी भस्म टाकिलें करून ।
रंभेनें आणिलें श्रीरंगा धरून ।
नारदाची नारदी झाली स्त्री मागितल्यावरून ।
कीचक मेला द्रौपदीकरून ।
चाल ॥ पहा पाराशर हे ऋषी ।
दिवसाची केली निशी ।
भोगूनिया जाला खुशी ।
पांचाळीकारितां रणीं पडला दुर्योधन दुर्मती ।
खंडी म०
॥ ३ ॥
स्त्रियापासूनी जे दूर राहिले कीर्ति त्यांची वाणिती ।
पराक्रम केला तीन जाजती ।
ती गती लक्ष्मणाप्रती जाली रणीं पडला दुर्मती ।
बंदीचे सोडविले सुरपती ।
ब्रह्मचारीचें व्रत चालविलें भीष्म वीर भारती ।
धरविलें शस्त्र श्रीहरी हातीं ।
चाल ॥ एकपत्नी रघुनंदन ।
म्हणून दशशिरा मर्दून ।
शुकमाहात्म्य त्या कारण ।

अपविला दुष्टिणी ।
पती असतां व्यभिचारिणी ।
तारेनें सुग्रीवापासून वाळी मारिला रणीं ।
कचाविरहलीप्त यामिनी ।
शुक्रें हेतुलागीं मंत्र दिधला संजीवनी ।
स्त्रियांची जात कुळघातिनी ।
चाल ॥ होनाजीबाळ ह्मणे ।
त्या इष्कातें चुकविणें ।
हें पूर्वींचें प्राक्तनें ।
पांडू ह्मणे भक्त वचनें भोळेभाव्रारती ।
संडी ॥ या विषयाचे पायीं बुडाले कितीक लक्षावती ॥ ५ ॥

## लावणी ४३ वी.

साक्षात देव पंढरी दिगांबर मूर्ती ।
जडमूढां तारितो रोकड तुर्तातुर्ती ॥ ध्रु० ॥
जेव्हां नवती चराचर पंढरी होती ।
भूवैकुंठ हें अविनाश निवडली संतीं ।
ब्रह्मांड जळून होती रक्षा प्रळयाअंतीं ।

तेव्हां सुदर्शनावर आभंग अक्षयी रहती ।
चौविसा मूर्तिवेगळी साधूजन म्हणती ।
झालीं कितीक युगें न कळे कोणाला गणती ।
ठायीं पुंडलीकानें जगीं वाढविली कीर्ति ।
जे पंच महापातकी दर्शनें तरती साक्षांत ॥ १ ॥
हिरण्याक्ष हिरण्यकश्यप दैत्या पोटीं ।
ते वधले वराह नृसिंह होऊन त्यासाठीं ।
त्यासी वैर धरून अवतरले लंका पेटीं ।
देव बंदीं घातले आणन तेहतीस कोटी ।
म्हणून रामचंद्र अवतार दशरथा पोटीं ।
शेष वानरदळ मिळूनिया उठाउठी ।
केलें रावणाचें निर्मूळ शर्ताशर्ती ।
पुढें रामकृष्ण अवतार गोकुळापती । साक्षांत० ॥ २
लंकेवर मारिले असुर तेच द्वापारीं ।
रावण कुंभकर्णाची मंडळीसारी ।
भूभार झाला पृथ्वीला गांजली भारी ।
म्हणून गोकुळीं अवतरले पूतनारी ।
जे वानर दळ ते गोपाळ झाले निर्धारीं ।
निवडिले असुर पांडवा होऊन साहाकारी ।
गवळणी त्याच प्रत्यक्ष वेदाच्या श्रुती ।

पहावया सगुण सावळा सदा चित्तवृत्ति ॥ साक्षांत० ॥ ३ ॥
द्वापारीं तेच मर्दिले होऊन कलयुगीं ।
हीन मलींच्छ राजे होती जागोजागीं ।
धर्माचा केला अधर्म कराया लागीं ।
जेवितील अठरा पगडे एका जागीं ।
जडमूढा दीनास्तव उभा दिगांबर योगी ।
कलीमधीं रूपें धरियेलीं दोन योगायोगीं ।
जाले वारकरी जे गोपाळ कीर्तन करिती ।
इतरांशीं तारून आपण उभयतां तरती ॥ साक्षांत० ४ ॥
जो ज्ञानेश्वर तो विठ्ठल मूर्तिमंत ।
बोलविले वेद रेड्यामुखीं चालविली भिंत ।
बारा वर्षें वाहिलें पाणी नाथा घरीं तंत ।
स्वर्गीचे आणिले पितर करून जिवंत ।
उठविली गाय नामयाची थोडांत ।
देऊळ फिरविलें अझून आहे साक्षांत ।
तुक्याच्या तारिल्या वह्या करूनियां प्रीति ।
वैकुंठीं लाविल्या ध्वजा अजून जन झुरती । साक्षांत० ॥ ५ ॥
बोधल्याचें पिकविलें धनधाटाचें शेत ।
दामाजी भरली रसीद पटाविलें पोतें ।
गोऱ्याचें उठविलें बाळ फुटले हात ।

विष मिराबाईशी देतां केलें अमृत ।
ज्यानें जैसें ध्यावें तैसी प्रचित ।
खळकुटाळाशीं सहसा नसे स्वप्नांत ।
गाती विठ्ठल नामें परशराम येसू ध्याती ।
रामकृष्णराम अज्ञान भावें गति गाती । साक्षांत० ॥ ६ ॥

## लावणी ४४ वी.

रंगरागिणी गायन कीर्तन ज्या स्थळीं नसे नारदा ।
असून वस्ती स्मशान स्थळीं त्या न राहे लक्ष्मी कदा॥ध्रु०॥
गायनाचें घर कोठुन निघालें मुळीं वार्ता मुळीपासून ।
पंचमुखी जो ब्रह्मा होता ऐका क्षणभर बसून ।
दर्दुरमुखीं ऋग्वेद निघाला पंडिताशीं घ्या पुसून ।
यजुर्वेद हा अश्वमुखांतून अर्थ काढिला निसून ।
स्वानमुखीं सामवेद तिसरा झालें गायन त्यापासून ।
जंबुकमुखीं अथर्वण चवथा चतुर्वेद पढे कसून ।
गांधर्वमुख पांचवें हांसलें पार्वतीस एकदां ।
म्हणूनी शिवानें क्रोधें छेदिलें होणार न कदां ॥ १ ॥
गांधर्वमुखीं बिहाराग निघाले आणि छत्तीस रागिणी ।
तेंचि गायन करिती अप्सरा इंद्रसभा मोहनी ।
गणगांधर्व नारद तुंबर ते ध्याती निशिदिनीं ।
तेंचि हरीला प्रिय प्राणाहुन गमन त्रिभुवनीं ।

गायन ऐकून जागृत झाला कुंभकर्ण आला रणीं ।
शृंगऋषी गायन मोहिला लिहिलें रामायणीं ।
रंगराग बंजि फाला वेणू गीत वृंदावनीं करी सदा ।
यमुना स्थिर जाली गोपी मोहिल्या गायन ऐकून ।फिदा ।
रंगरागि० ॥ २ ॥
शिरा काढून तारा केल्या रावण गायन करी ।
आत्मालिंग आणि देऊन पार्वती हात ठेविला शिरीं ।
भस्मासुर गायनीं मोहिला मोहिनी वेष हरी धरी ।
नागस्वरानें सर्प भुलूनी येती अंगावरी ।
अष्टपद्या गाउनी उठविली जे श्रीधरीं ।
मम कीर्ति जेथें गाती नारदा उभा मी त्याच्या द्वारीं ।
वेद पांचवा गायन ह्मणती शास्त्रपुराणीं सुद्दा ।
निंदाद्वेषी कसेंही गाऊन रात्रंदिवस धरीं हुदा ।। २ ।।
दिपकल्याणी दीप लागता मल्हाराची कळा ।
गायन ऐकूनी विणा ऋतुविण मेघ वर्षती जळा ।
ऋषीमुखींचें गायन ऐकून पाणी झाल्या शिळा ।
तेच टीका जन वरकड गाती रोकडे येती फळा ।
कथालावणी गोंधळ भराड गीत गाती अबळा ।
आधार पाहूनी आह्मी गातों वर्णू हरीची लिळा ।
नामीं विठ्ठल परशराम ह्मणे येसू गेला निजपदा ।

रामकृष्ण गुणीं रामा गातो कविचें गावर त्रिदा ।
रंगरागिणी गायन कीर्तन ज्या स्थळीं नसे नारदा ।
असून वस्ती स्मशान जैसें न राहे लक्ष्मीं कदां ॥ ४ ॥

## लावणी ४५ वी.

कर्णास ह्मणे शाबास देव श्रीहरी ।
ऐकून अचंबा मनांत अर्जुन करी ॥ ध्रुवपद ॥
शत्रुशीं वाणीशी कृपाळुवा श्रीपती ।
मजपुढें काय कर्णाचें युद्ध किती ।
जेव्हां बाण लावितों तेव्हां थरारी क्षिती ।
सात पांड कर्णाचा रथ सरे मागवती ।
हें दृष्टी पाहून न बोलसी कंसारी ।
औट पांड सारिला काय त्याची थोरी ।
कर्णास ह्मणे० ॥ १ ॥
तेव्हां उत्तर करी श्रीहरी ऐक अर्जुना ।
तुझ्या ध्वजस्तंभीं मारुती अचळ वीर जुना ।
यावर मी सारथी त्रैलोक्याचा राणा ।
जें न घडे तें मी घडवीन गुंतुन भक्ती ऋणा ।
मूर्तिमंत हे वेद अश्व रथाला चारी ।
त्रिकाळीं मग दिव्य दिव्य करी । कर्णास० ॥ २ ॥
क्षत्रियांत पहा कर्ण एक महा बळी ।

युद्धासमयीं रथ चक्र मही गिळी ।
इतकें सावरून करी रणामधीं रणफळी ।
मी नसतां तुज बुडवितां समुद्र जळीं ।
शैल्य सारथी चळ एक क्षीणक्षीण करी ।
दानशूर रणशूर कधीं टळेना परी । कर्णास ह्म० ॥ ३ ॥
अर्जुन उमजला धरी श्री हरीचे चरण ।
तारिशी मारिशी तूं जिंकविशी करण ।
तुझी धन्य धन्य देवा तुझ्या नामें तरन ।
कवी विठ्ठल नामीं संत जनांला शरण ।
वावी ग्राम तिथें परशराम करी कवीश्वरी ।
येसूच्या जडना जशा मोत्याच्या हारी ।
कर्णास ह्मणे शाबास देव श्रीहरी ॥ ४ ॥

## लावणी ४६ वी.

क्षण संगूर बाजार घडीचा कायापुर वस्ती ।
नाम किराणा अमोल्य वस्तु भरा महाग सस्ती ॥ ध्रु० ॥
वर्म चुकल्या पडेल फेरा किती भटकत फिरशी ।
वृक्षामधीं वीस लक्ष यौवनी उन वारा झोके खाशी ।
पक्षामधीं दहालक्ष यौवनी गिरी कंदरी चारा चरशी ।
अका लक्ष योनी किटकामधीं नवलक्ष जळचरें रहाशी
तीस लक्ष पशु मातींत संख्या चार लक्ष मानवी अस्ती ।
नाम० ॥ १ ॥

लक्ष चवऱ्याशी योनीं हिंडतां पाप साचलं सईम चिरा ।
त्याशीं तुळाया घडी लावशी पुण्याचाचतरा चतुरा ।
पाप पुण्य समसमान न होतां दरयोनी कोटी फेरा ।
अवाचित झटका कसा पडे न देहींचा मग वारा ।
त्यांत ही उत्तम मध्यम कनिष्ठ यमाजीची वरगस्ती ।
नाम कि० ॥ २ ॥
शेवटील हा जन्म सायासीं आला सेलवाटा ।
सर्वांभूतीं भगवान् भाऊनी नरा होय नको धरूं ताठा ।
दिस आहे तो कर झटपट सवदा सहसा नरा तुज नये तोटा ।
पारवती कमजास्ती न साहे जसा धारवाडी कांटा ।
मधींच दीस मावळला ह्मणजे कठीण पुढें याहून तस्ती ।
नाम कि० ॥ ३ ॥
एक नाम वर लिहितां तरले अद्यापी वत पाषाण जळीं ।
हे खुण ऐकून बेहरा होशी तशांत चवघी उगकळी ।
अभेद भावें नाम वदावें हातें वाजवून या टाळी ।
अनंता जन्मांचीं पापें अर्धनिमिषामध्यें होळी ।
विठ्ठल नामें परशराम ह्मणे कली काळाशीं घ्या कुस्ती ।
नाम किराणा अमोल्य वस्तु० ॥ ४ ॥

प्रकरण २ रें.

# ऐतिहासिक पोवाडे.

## मल्हारराव होळकर यांचा पोवाडा.

चाल ॥ रतिवंत महाराज पेशवे अमोलिक सुर्तिमोति ।
सवाईमाधवराव स्वारी निघाली नबाबावरती ।
वाहवाहो राव मल्हार कन्हया तीन पिढ्या एक नांव साजे ।
कीर्तीचे चवघडे वाजती चौमुलखीं धवशा गाजे ॥ ध्रु० ॥
नाहीं कोणाचें देणें ज्याला मार्तंडाचे वरदानें ।
पहिल्यापासून अपमुखत्यारी सुभेदार जहामर्दीनें ।
घोडे झेंडे जाऊन लाविले भागिरथीच्या सर्दीनें ।
जिकडे तिकडे दाप दरारा खंडण्या घेती वर्दीनें ।
महाल मुलुख कुल पाहाडी किल्ले सहज तोफांचे गर्दीनें ।
येऊन भेटले तमाम कोळी चौभागीं कोणी आधीनें ।
कुंभेरीवर झाली लढाई रात्रंदिस लाही भाजे ।
खंडेराव रणीं कामीं आले ढिगाचीं भरलीं जहाजें ॥
वाहवाहो राव मल्हार कन्हया तीन पिढ्या एक नांव साजे ।
कीर्तीचे चवघडे वाजती चौमुलखीं धवशा गाजे ॥ १ ॥

पुण्यपरायण बाई आहिल्या प्रत्यक्ष धर्माची मूर्ति ।
घाट शिवालय सदावर्त पाहा अन्नछत्र तिर्थोतिर्थी ।
रस्तोरस्तीं वापी कुपांसीं तडाग बांधून केल्या कीर्ति ।
तुकोजीबोवा गादीवरती तलवारी तलवारी हाकशनशरथीं ।
लाख्या बारगीर पाहून आला फिरलासे नवसरीवरती ।
सवाई मल्हारीनें ठेविला हौस नाहीं पुरली पुरती ।
पुणें मुकामीं देह ठेविला रणीं वाजऊन रणवाजे ।
कीर्तिवास केले कीर्ति ठेऊन पुत सपुताहिण वाजे
वाहवाहो राव मल्हार कन्हया० ॥ कीर्तीचे० ॥ २ ॥
यशवंतराव महाराज त्यांनीं खूपच समशेर गाजिवली ।
आटक करनाटकीं चौखुंटांत साहेब नौबद वाजविली ।
एक लाख सडी स्वारी कर्डी सेना फौजा माजविली ।
फिरंग्याचीं उभीं पलटणें आणि भाल्याचीं लाजविलीं ।
सुभेदाराच्या पुण्यप्रतापें चौपट दौलत सांजविली ।
वंशामधें एकाहून एक कोणीच नाहीं बुजाविली ।
अहोरात्री चौघडे वाजती काल कणीं नित वाजे ।
राजे रजवाडे जरबेंत अगदीं देती ताजिम तवाजे ॥
वाहवाहो राव मल्हार कन्हया० ॥ कीर्तीचे० ॥ ३ ॥
जाग चढून वर शहर इंदूर जुनी छावणी चहोंदा ।
राव मल्हार गादीवर शोभले सरल त्याजमधें बीजेठा ।

साहेब जादे लोक मानकरी सरसजाम लढवूस थाट्टा ।
एकसारखा नक्षा अद्भूत चौराज्यांमधीं बोभाटा ।
दानधर्म पहिल्याप्रमाणेंच धर्माचा चालू वांटा ।
देणें घेणें धोताल धंदा मोहर आला बरी बिनबाठा ।
अटोकाट दरबार भरे गच मधें चंद्रमा विराजे ।
स्वारी शिकारी महा कडासन आंत उंबरा राई विलबाजे ।
वाहवाहो राव मल्हारकन्हया तीन पिढ्या एक नांव साजे ।
कीर्तीचे चवघडे वाजती चौमुलखीं धवशा गाजे ॥ ४ ॥

गादीशीं बसणार मुत्सद्दी नामी मोहरे दरबारी ।
आपाराव कुलकला बिनापा कामें काजे एकतारी ।
दिघे जोडीला नाजुक हुजरे रात्रंदिस सेवाधारी ।
भाऊ पारधी सुभरा त्यावर खाशांची मर्जी भारी ।
सत्कीर्तीचा करून पवाडा नामीं विठ्ठल अर्ज करी ।
हीच विनंती घ्या सांभाळून चळचूक पडला असल जरी ।
परशराम म्हणे आलों नांवावर गरीब, महाराज नावाजे ।
कल्पतरूचें दर्शन झालें दरिद्र हरलें अनुसहजे ॥
वाहवाहो राव मल्हार कन्हया तीन पिढ्या एक नांव साजे ।
कीर्तीचे चवघडे वाजती चौमुलखीं धवशा गाजे ॥ ५ ॥

## फत्तेसिंग महाराज गाईकवाडांचा पोवाडा.

चाल ॥ रतिंवंत महाराज पेशवे अमोलिक सुर्तिमोति ।
सवाईमाधवराव स्वारी निघाली नबाबावरती ।

फत्तेसिंग महाराज—सवाई पुण्यप्रतापी ज्ञानाहिरे ।
अजब शहर गुलजार बडोदें चौमुलखांमध्यें नांव शिरे ॥
गुजर देशाचे राजे बाजे—चौमुलखीं धवशा गाजे ।
अपार सेना धार मारिती—शत्रूचें काळीज न धजे ।
सेनाखास शाहुराजापासून—बलाद सुराद अभिजे ।
श्रीमंताचे बाजूस गाईकवाड हें नांव साजे ।
धर्मराज चवघडे वाजती सत्कीर्तीचे नगारे ।
जेष्ठ आनंदराव खासे भद्रेंत पूर्ण सांब अवतार खरे ॥ १ ॥
सयाजी महाराज कन्हया । चाणक्षाचा नक्षशिरा ।
एक रथीं उभयतां शोभती कडीकोट स्वारी चतुरा ।
मुलखी बंदोबस्त अबादी तसदी कोणाला नाहीं जरा ।
काठेवाडा कुल धरून द्वारका प्रांतीं पहा तो दरारा ।
दातृत्वाला उदार केवळ कलयुगी कर्णच दुसरे ।
सदावर्त चालती सदोदित शिवाय संतर्पण त्यारें ॥ २ ॥
गादीशीं बसणार मुच्छदी मोठमोठे मानकरी ।
वाचस्पतीसारखे बोलके चतुर मोठे दरबारी ।
चवराज्यामध्यें मौक्तिक बाहवा हा कुरा शिरा पूर्वीचपरी ।

राज्यभार एकदोरींत अवघे श्रीहरीची कृपा धरी ।
दयावंत महाराज राजे हे काय वाणूं नमती पुरे ।
दिवाण भाऊसाहेब आवल जोहा झाला भक्कमदोर ॥ ३ ॥
शहरपणा गुलजार अकाशीं उपइंद्राची इंद्रपुरी ।
मधीं चौक साधिला मांडवी दरवाजे दिसती चारी ।
हाट थाट लखलखाट अमोल वस्तूंची विकरी ।
सरंजाम खुप करडा कट्टा जरबेमधीं वाघ बकरी ।
देशोदेशींचे अमल भरले सह भोताले लगट पुरे ।
ठाईं ठाईं बांधिले शिवालय सुंदर विष्णुमंदिरें ॥ ४ ॥
पुणें किंवा एक शहर बडोदें दक्षिण प्रांतीं जन बोले ।
त्याऊंन कीर्ति ऐकली विशेष अपूर्व स्थळ दृष्टी आले ।
देशोदेशींचे गुणीजन पात्रे कवि ऐक येथें येऊन गेले ।
त्यांजमध्यें एक मतीमूढ मी, यथामति वर्णन केलें ।
विठ्ठल नामें छंद अहर्निशी परशराम येसू महादू स्मरे ।
कल्पतरूचें दर्शन झालें दरिद्र तेथें कोठें उरे ॥ ५ ॥

## खंडेराव महाराजांचा पोवाडा.

चाल ॥ नारीनें करून श्रृंगार आली रा पाण्याशी ।
बारवेतीरीं एक मूर्त पाहिली खाशी ॥
व्हावें दर्शन अशी आशा करून आलों मोठी ।
खंडेराव महाराज पहावे दृष्टी । व्हावें दर्शन० । ध्रु० ॥

कडेकोट शहर लखलखाट द्वारका जैशी ।
मधें मुख्य महाल प्रभूचा उंच आकाशी ।
एकछत्री राजमहाराज ईश्वरें जैशी ।
पदरीं पुण्याचे पर्वत राजविलासी ।
हरी देऊन विसरला संततसंपत उपेंद्राचे परी ।
शूर समशेरबहादर किताब साजे निशाणपटका जरी ।
कलीमधें दीना उदार होतो दानधर्म परोपरी ।
कीर्तीचे चवघडे जरब चहूंकडे शत्रूच्या पोटीं ।
व्हावें दर्शन अशी आशा करून आलों मोठी ।
खंडेराव महाराज पहावे दृष्टी । व्हावें दर्शन० ॥ १ ॥
चकचकाट महाल रस्तोरस्तीं ।
मधीं चौक मांडवी अचुक आणली वस्ती ।
हवेल्याशीं हवेल्या अबाद करूनी वस्ती ।
नंदाचें गोकुळ नाहीं कोणाला तास्ती ।
ठाईं ठाईं विष्णुमंदिरें बहुत सुंदरें उंच गेलीं गगनीं ।
झळकती कळस सोन्याचे दाट नक्षत्र भोंवती सजणी ।
दिवसादिवस शहराची वस्ती वढती होतसे द्विगुणी ।
काय अंतपार श्री वर्णू होतसे दाटी ।
व्हावें दर्शन अशी आशा करून आलों मोठी ।
खंडेराव महाराज पहावे दृष्टी । व्हावें० ॥ २ ॥

समशेर बहाद्दर नित्य यशाचा सेगा ।
चहूंकडचे आलम रोजगारी लष्कर पागा ।
द्वारकेचा झापा धरून जागोजागा ।
रखवालीस ठेविल्या फौजा जागोजागा ।
चहूंकडे हुडच्याशीं हुडे बहुत मजबूत बांधिले दाट ।
वर जिलबी पसरल्या तोफा धन्य बुद्धीचा केवढा काट ।
करडी रखवाली दरवाजावर नाहीं मुंगीला वाट ।
चहू राज्यांमधें बोभाट होतसे थाट सुखरूप वाटी ।
व्हावें दर्शन अशी आशा करून आलों मोठी ।
खंडेराव महाराज पहावे दृष्टी । व्हावें० ॥ ३ ॥

बुद्धीचे सागर सेमा पदरी आले ।
प्रीतीमधें ठेविले इंग्रजाला रोशोकूल ।
प्रीतीचा प्रकाश पृथ्वी प्रकाशे जैशी ।
चक्रचकाढे कल्पतरू नांव आलें ऐकून ।
येथें देशोदेशींचे गुणीजन पात्र लोक गेले येऊन ।
त्यांपुढें मती काय ? वर्णावी बरीशी जाऊन ।
नामीं विठ्ठल परशराम येसू कवन करी लीन होऊन ।
वावी गांव नांव महशूर आहे गोदेच्या काठीं ।
व्हावें दर्शन अशी आशा करून आलों मोठी ।
खंडेराव महाराज पहावे दृष्टी । व्हावें० ॥ ४ ॥

## नगरदेवळेकर पवार यांचा पोवाडा.

चाल ॥ श्रीमंताच्या बावन पागा त्यामधें बावन सरदार ।
रघुजी भोसले दौलतराव शिंदे तुकोजी होळकर ॥

आधीं अमल सरदार सुभे शूर पवार जाहीर जनलोकां ।
नगर देवळें गांव हवाशीर मधें किल्ला गडपती बाका । ध्रु. ॥
दुनादाव उमराव धारकरी विश्वासुक शाहू राजाला ।
चहू मुलुखीं चौथाई बांटणी आश्वासून दिली प्रजेला ।
महाल मुलुख मोकासा जागीर मशाल उजव्या बाजूला ।
द्वितीयेचा चंद्रमा लपेना तळहातामें उजाला ।
चौराज्यांमधें महाशूर लौकिक नांवाचा मोर्तबशिक्का ।
जागोजागीं चौघडा वाजत्तो रात्रंदिस अक्षई ठोका ।
आधीं अमल सरदार सुभे शूर पवार जाहिर जनलोकां ।
नगर देवळें गांव हवाशीर मधें किल्ला गडपती बाका ॥ १ ॥
बागबगीचे गच्च आमराया थाट करुनया मधें वस्ती ।
पंचवटी नाशिकची तऱ्हा काहीं थोडी बहुत आणिली दिसती ।
हत्ती नाले मधुन वाहती पुल बांधून केली कस्ती ।
एकछत्री साहेबी राज्याला कोणा एक नाहीं तस्ती ।
दरवाज्यावर नगरखाना वाजतसे श्रवणीं ऐका ।
बैठकीस रंगमहाल बांधिला खर्चूनया महासुर पैका ।
आधीं अमल सरदार सुभेशूर पवार जाहीर जनलोकां ।

नगर देवळें गांव हवाशीर मधें किल्ला गडपती बाका ।। २ ।।
गादीशीं बसणार मत्सदी दरबारीं मोहरे नामी ।
चतुर कुशल बोलके बृहस्पती वचनाचे खंबीर नेमी ।
शिरा कुरा द्रव्याचा राखून बंदोबस्त ठेऊन कामीं ।
अभिमान पण सिद्धिस न्यावा तर्की ज्याचा धनी स्वामी ।
रामचंद्र शिवरामबाबा परत गेले शीव लोका ।
पूर्वं पुण्य आचरलें यथाविधी ध्या संभाळून आधीं ऐका ।
आधीं अमल सरदार सुभेशूर पवार जाहीर जनलोकां ।
नगर देवळें गांव हवाशीर मधें किल्ला० ।। ३ ।।

## दिल्लीचा पोवाडा.

चाल ।। सांडा नाद बटकीचा केली लिला माया ।
कोठें सांगा मान्य जमीं व्यभिचाराचा पाया ।

चाल ।। हा फंदी फाकडा मज सांपडला गुंडा ।
चालूदे प्रीत शेवटा देवा मार्तंडा । कुशाबा.

या काय घालतोशी संसृतीचा पिंगा ।
या मानवदेहीं भजरे श्रीरंगा । रामजोशी.

बाछाई तक्त दिल्ली अजबुनात जागा ।
सखा जबर शिकंदर समशेर बांधून त्यागा ।
चार खुट मुलुख रोजगार लष्कर पागा ।

बावन उमराव रखवालीस जागोजागा ।
दिली पाहून लोक आले दक्षणचे लक्षावधी ।
कोण छलबटाव कोण कोणाचा कोणी ऐकिला कधीं ।
धनवान रूप देखणा तोचि काय होता मानवांमधीं ।
चवदा विद्या चवसष्टी कळा विक्रम तयाचे आधीं ।
त्याची कीर्ति गाती ऐकती सकळ जन करून अवधी ।
एक असदाबादेची मोहनी म्हणता होती गुजराथेमधीं ।
खिदळकी करून गेली सती जसें का मीठ मिळविलें दुधीं ।
काय कीर्ति केली चांगली ? करून अपकीर्ति जनामधीं बदी ।
बिन पाया वांचून मिथ्या गोष्टी केच्या ।
दुरकर मोहनाराणी बटाव लुच्या ।
कोणे शास्त्रीं वर्णिल्या कीर्ति जारजारणीच्या ।
दूर कर मोहनाराणी बटाव लुच्या ॥ १ ॥

## मुंबईचा पोवाडा.

चाल ॥ दुपार मजला झाली जाऊं द्या घरीं सासु घालील वादु ।
दुष्ट माझे दिर भावे हे काढितील माझा शोधु ।
पहा बेटावर वस्ती वसविली दर्याचेतिरी चौभोंती ।
जशी लंका रावणाची दुसरी कोणी कोणाला न चाहती ।
राज्य राक्षसी प्रत्यक्ष जेथें पापाचे पर्वत होती ।

चौयुगांचे दोषी प्राणी अवतरून तेथें राहती ।
त्यांत पार्सी किरिस्ताव बाटून होती ।
लक्षावधि जीव जंतु पशुपक्षी खाती ।
ताडीमाडी सुरापानें रतीब नरनारी ।
रावरंक समसमाज उंचनीच एककारी ।
पायापिठी डोईचा गाडा तर मुमईची वस्ती बरी ।
हेलपाटी जर करून रहाशलि चौघांमधीं मातबरी ।
पायपि ० ॥ १ ॥
कळा कुशल हिकमती जाणती मातीचें करतील सोनें ।
शास्त्रन्याय दंड करावा आधींच कळे होणें जाणें ।
मोठमोठे रंगमहाल उंच उंच साजिरवाणे ।
रंगी बेरंगी लाजत गालीसें चकचकीत भोंती आयने ।
त्यामधीं मनुष्य न मिळवू एक खासा बंचरा परी ॥ पाय ० ॥ २ ॥

## इंग्रजांचा पोवाडा.

चाल ॥ कुंकु कपाळीं शोभत नाहीं रत्नागिरीच्या जोतिबा ।
माझें रूपस्वरूप पारखें झाला हे तोबा तोबा ।
शककर्ता अवतार कलीमधें हीच आसली नवी मुद्रा ।
जन भय निरभय नाहीं कोणाशी उघड्या ताटीं करी निद्रा ॥ ध्रु ०
तप तेजाचा सूर्य उदयला जशा चांदण्या गेल्या हारपून ।

तसे पृथ्वींतील निर्वीर्य राजे शूरत्व आंगीं गेलें करपून ।
मोंगल भोंसलें आणिक पेशवे कोण उभे सन्मुख निर्पून ।
जाट यशवंतराव करून वेगळे वाया बरे, गेले झिरपून ।
सरकार कुंपनी इंग्रेज बहादुर नांवाला जातों दरपून ।
महाल मुलुख कुल पहाडी किल्ले ना लढतां बसले अर्पून ।
तेज हीन अवघ्यानें झालें मा आले जननी उदरां ।
शूरत्वाशी डाग लागला वास्तव दैवीं आल्या भद्रा ।
शक कर्ता अवतार कलीमधें हीच भासली नवी मुद्रा ।
जन भय निर्भय नाहीं कोणाशी उघड्या ताडीं करी निद्रा ॥१॥
नाहीं विलायत कोणी पाहिली या मुलखावर जरब कशी ?
एक चपराशी चकती पाहून रयत थरथरी बकरी जशी ।
कला कुशलताही कमती जाणतो ईश्वर कळना कळ ऐशीं ।
बहा हस्तींशीं काम ढळेना एक माणूस हलवी त्याशीं ।
न्यायनीति बालाहून बारीक मुसळाहून ठोसर लईशीं ।
शास्त्र नाहीं देहदंड करावा खून केल्या ना चुके फाशी ।
अतिरति एक दोरीत ओविलें फळझाडें आंबागद्रा ।
जाणू जोशी भाकून गेले तें शेकड पडलें पद्रा
शककर्ता अवतार कलीमधें हीच भासली नवी मुद्रा ।
जन भय निर्भय नाहीं कोणाशी उघड्या ताडीं करी निद्रा॥२॥
सुवर्ण चांदी तांबें पितळ पाच हिरे मोती पारा ।

आणिक वस्तु तऱ्हेतऱ्हेच्या इतऱ्यांवर अमल सारा ।
शीख पंजाब इवलशीदरी बसता जिथवर वस्तीचा थारा ।
जितका समुद्र तितका व्यापून चौभोवतीं घालून घेरा ।
कोठें अम्मल कोठें शह नुसता पदर खाऊन लाऊन थारा ।
चिर चोरटे भुमिये गिराशी पगार त्यांशी रुपये मोहरा ।
पूर्वी आराधून रावणानें प्रसन्न केले शिवरुद्रा ।
तसा सीतेचा वर पावला अहर्निशीं त्या पदमुद्रा ।
शककर्ता अवतार कलीमधें हीच भासली नवी मुद्रा ।
जन भय निर्भय नाहीं कोणाशी उघडच्या ताटीं करी निद्रा ॥३॥
काशी रामेश्वर थेट द्वारका जगन्नाथ वर बंगाला ।
कायलात हिकमतीनें केलें ब्रिद लाऊन चंगाला ।
दिल्ली तक्त आबिमेरू जेबपुर न भिखतां रंगा रंगाला ।
क्षेत्री असून गौ समान झाले वायु न लागे आंगाला ।
पुणें नागपूर श्रीरंगपट्टण नेल्या हैदरा बंगाला ।
शिंदे होळकर फक्त शिपाई जसे बाहुलें भिंगाला ।
अवध्यांवर एक हुकूम कलकत्ता पैशून्य पाहून छिद्रा ।
मोठे मोठाले किल्ले ढासळे इमारती मोडून सदरा ।
शककर्ता अवतार कलीमधें हीच भासली नवी मुद्रा ।
जन भय निर्भय नाहीं कोणाशी उघडच्या ताटीं करी निद्रा ॥४॥
कृतायुगीं जें कुपिण त्यानें तप आचरण केल्या तस्तीं ।

तेजहीन अवध्याचें झालें शूर शिपाई कांहीं नसतां ।
छत्तीस कारखानें घरींच करितो इतराची ना धरी अस्ता ।
तराजूंत तोलून काढिल्या पृथ्वींतील अमोल वस्ता ।
लक्ष्मीला मूळ आलें वाटतें समुद्रांत जाईल दिसतां ।
नामीं विठ्ठल परशराम ह्मणे उघड दिसे धोपट रस्ता ।
चतुर सभा तुम्ही गुणीजन सज्जन हरिभजनीं तरी दिस गुदरा ।
हीच विनंती ब्राह्मण क्षेत्रीं वंश करून त्या अतिशूद्रा ॥ ५
शककर्ता अवतार कलीमधें हीच भासली नवी मुद्रा ॥
जन भय नि० ॥ ५ ॥

## देशस्थितीचा पोवाडा

॥ चाल कटाव ॥

संकट मोठें । युगांत आलासा वाटे ।
आचरण खोटें । संकट मोठें ॥ ध्रु० ॥
बुडाला धर्म । हारपलें त्राणें ।
विसरलें सत्कर्माचें भाणें । लोप दैवताचे पुरले पेणें ।
नगरी दिसती उदासवाणें । तेजहीन राजे निरअभिमानें ।
शूर सरदार होऊन दिनवाणें । हत्ती उंट किलवाणे ।
त्यावर वाहती भूसार गोणें । सुंगी भेरू एकत्र मानें ।
फिरावें काठीस बांधून सोनें । पुसेना कोणी थोर सानें ।
नवी मुद्रा यांत काय उणें । अखंड कहर पजन्यानें ।

अकाळ मृत्यु जुंपले घाणे । संकट मोठें ।
युगांत आलासा वाटे । आचरण खोटें । संकट मोठें ॥ १
चार लक्ष बत्तीस हजार कली । त्यांत कमी संख्या गत झाली ।
पुढील होय की आतांच आली । ब्राह्मण अवघ्याची गुरुकिल्ली ।
जे कां वरिष्ठ वेदवल्ली । त्यांचें दासीवर मन वाहली ।
तिच्यापुढें काय लक्ष्मीची आली । वेदवंशीं लेंकरें झालीं ।
त्यांचा आचार याहुनि डौली । जसें काय आभाळीं गगनीं खवली ।
बुडाल्या कुलांगनांच्या भेली । पतीला करून ठेविली बिली ।
संकट मोठें । युगांत आलासा वाटे । आचरण खोटें । संकट मोठें ॥ २ ॥
पुत्र पित्याला क्रोधें ताडी । रुसून बसावें सासुरवाडीं ।
आपल्या मेहुणीशीं रथगाडी । आणून दावी वैभव माडी ।
कथा कीर्तनाची लागेना गोडी । ऐके डफगाण्याची झोडी ।
द्यावी बहुरुप्याला शालजोडी । नीच हीन जातीचा जोडी ।
सून सासूवर कपाळ झोडी । करीना इकडील तिकडे काडी ।
बायकोस मूल हाल जोडी । नको छळूं इची आयुरदा थोडी ।
मेल्यावर दाढी मिशी बोडी । कानोले खीर दिवसाला वाढी ।
उलटें खोटें संकट मोठें । युगांत आलासा वाटे । आचरण खोटें । सं० । ३ ।
जपी तपी संन्याशाचे भार । गोसावी बैरागी अपार ।
जे कां तपतीर्थ करणार । घराश्रमावर बांधती घरदार ।
संत झाले चोखेमेळे फार । टिळाटोपी माळांचे भार ।
करूं पाहती एककार । जार जारणी जारणी जार ।

निराशा अंतरीं निर्धार । त्याशीं एक नाम सार ।
नामीं विठ्ठल पाईं घालून भार । परशराम येसू ह्मणे तार ।
येऊनिया नेटें संकट मोठें । युगांत आलासा वाटे ।
आचरण खोटें ॥ संकट मोठें ॥ ४ ॥

## देशस्थितीचा पोवाडा.

॥ चाल धुमाळी ॥

शिपाई चाकरी गेले नागपुराला ।
तेली वाणी उदमी दाली बांधू लागला ॥

दूरवर पाहारे । गुजराण करून घरीं राहारे ॥ ध्रु० ॥
शाल दुशाले भार दवलतीच्या धुंदींत ।
मोठे मोठाले उंच पोषाक विनविले कंदींत ।
॥ गेले दिवस आनंदाचे जिलिब्या बुंदींत ।
विन मोहोजबा रोजगार होता बेबंदींत ।
धावलें फावलें असेल कांहीं त्या संधींत ।
तें धनरत्न ठेवा बांधुन जुडक्या चिंधींत ।
नाहीं कांहीं भयरे । मग जन्मजुगावर खायरे ।
दूरवर पहारे । गुजराण करून घरीं राहारे ॥ १ ॥
जे पंचहत्यारी होते आपल्या लावणीत ।
ढाल तलवारा ठेविल्या घरच्या गोणीस ।

विश्वास गेला नाहीं कोणी कोणाला मानीत ।
व्यवहार हरपला अगदींच टक्यागोणीत ।
कोणी छेलछबील्या आतांच आल्या बाणीत ।
विरळा अबरूच्या तुरळक राहती छानीत ।
हा मूर्तिमंत केली पाहारे । चुरमुरीस झाले भयरे ।
दूरवर पहारे । गुजराण करून घरीं राहारे ॥ २ ॥
हिंदवणीं राजे होते अवघ्या गोष्टी सोईच्या ।
वडिलांनीं मिळविलीं जाहगीर बसल्या ठाईच्या ।
जमविला पैका जसा वाळुवा नदीच्या ।
हार गजरे सुवासिक कळ्या गुंफिल्या जाईच्या ।
जिलबींत पुढें धांवती शिवबंद्या पाईच्या ।
उंट सुतरनाल बाणाच्या भरून कैच्या ।
झरझरी बेदर जरीपेच वा नैच्या ।
तें सुख आठऊं कायरे । खायाला सावध होयरे ।
दूरवर पहारे । गुजराण करून घरीं राहारे ॥ ३ ॥
तप्त ज्याचा हा सूर्य झाला उदीत ।
शक जबरा केवढा चळ पडला अवघ्याच्या बुद्धीत ।
शाहाण्याचें शहाणपण न चाले या संधींत ।
ज्या नामी नामी वस्ता गंजिल्या रद्दींत ।
चाल सरल्या पाय फुंकून मार्ग नीट शोधीत ।

## देशस्थितीचा पोवाडा.

चाल ॥ साधी—

कुंकु कपाळीं शोभत नाहीं रत्नागिरीच्या जोतिबा ।
माझें रुप सुरूप पारखें झालें हें तोबातोबा ॥

जुने कायदे अगदीं मोडले जधीपुन झाली इंग्रेजी ।
कांदा भाजी एक्या मोलें तुप साकर मैदा सोजी ॥ ध्रु० ॥

मोठे मोठे उमराव धारकरी जरब चहूंकडे दरारा ।
राघ्यापरी पिंजऱ्यांत कोंडिले मायेणीचा चंदीचारा ।
देशमुख देशपांडे कदीम जुमेदारीचा आसकारा ।
रसुम मिळतें घ्यावे पोत्यांतून हुकूम कोणावर नाहीं जोरा ।
पाटील कुळकर्णी नांव उगीच घालून दमले येरझारा ।
सत्ता साहेबी अगदीं बुडाली महाराचा त्याहून तोरा ।
शाहाणे पुरखे अकलवंत हेवढ म्हातारे बित्तकाजी ।
कवळे कोंस वय तरणें कारसारी त्यावर बहाल खुष मर्जी ।
जुने कायदे अगदीं मोडले जधीपून झाली इंग्रेजी ॥ १ ॥
रथगाड्या अंबाऱ्या पालख्या टांगून ठेविल्या आढ्याला ।

ठुसके ठाणे शिपाई पाहून एकसारखी एक मर्जी ।
टोपी डगलें तंग विजारी खडी चवकी हुजुरजी ।
जुने कायदे अगदी मोडले जधीपुन झाली इंग्रेजी ॥ २ ॥
रणबाजे चवघडे वाजती काल्लु कर्णा शिंगबारी ।
जिलिब मशाली अवघी हरपली सडी रुजू रणी स्वारी ।
तुरुकस्वार पलटणें पायदळ रव चाले मुंग्याच्या परी ।
जिकडे बदली तिकडे जावें घेऊन कुटुंब कबिला बरोबरी ।
राजधान्या अगदींच बुडाल्या राजाचे झाले फर्जी ।
चवरी अबदागिरी टाकून ठेविल्या छत्री आपुण आपली धरी शिरीं
जुने कायदे अगदी मोडले जधीपुन झाली इंग्रेजी ॥ ३ ॥
आठ आणे चार आणे एकोत्रा असा सावकारी शिरस्ता ।
आता सावकारी मारवाड्याची घर बुडवील दिवसा दिसतां ।
ती टोल्याचा कागद त्यावर हजारोच भरी दस्ता ।
घराद्वाराचा लिलाव करून तुरुंगात खाली तस्ता ।
एक साल सुकळ एक साल दुकळ हरजिन्नस व्हावा स्वस्ता ।
जिकडे तिकडे मरी पांगली पाऊस घाला घाली शिस्ता ।
नांवाचे पहा दाम चालती ज्याचा तो मुल्ला काजी ।

उत्तम मध्यम चहू वर्णाची अवघ्यांनी केली एकच घादल ।
आठरापगड मांग महार एक्या पोहऱ्यानें पाणी सेंदल ।
रामकृष्ण गुणी रामा गातो साधुपायाची होऊन रजी ।
गुण दुर्गुण ज्याचा त्याला असल तशी भाकर भाजी ।
जुने कायदे अगदीं मोडले जधींपुन झाली इंग्रेजी ।
कांदा भाजी एक्या मोलें तुप साखर मैदा सोजी ॥ ५ ॥

## पोवाडा.

॥ चाल भूपाळी ॥

आंधार नगरी बेबंद राजा न्यायनीति कैची ।
ठाके ठोक ठेगाई करून पाहिल पत त्याची ॥ ध्रु० ॥
आंधार नगरी बाजार भरला चहू चहूट्याचा ।
आला माल चहूंकडून किराणा उदमी चाटयाचा ।
हेला भरून भोपळे गेला विकाया माळी कवठ्याचा ।
बसला दुकान मांडून ह्मणे मी चाकर पोटाचा ।
सेव बकळाया झुंडी निघाल्या प्रथम राजाच्या ।
एक भोपळा उचलून नेला न चाले अर्जी कोणाची ।

सहाजणानीं सहा नेले लूट केली सारी ।
चवकीदारानें वळी मुठ नेली उचलून हकाची ।
हेला नेला कोतवालानें तक्षीर अन्यायाची ।
आंधार नगरी बेबंद राजा न्याय नीति कैची । ठाके ठोक० २

राजापाशीं फिर्याद गेला न्याय त्यानीं केला ।
हकदाराचा हक्क चुकऊन ने सोडून हेला ।
अर्जी करितां झाला इतराजी माळी पिटून लाविला ।
माळी होता शाहाणा म्हणे मी हात दावीन याला ।
अशी मसलुबी करून राहिला बारा वर्षांची ।
पुढें अकलेचा कोट बांधिला धन्य त्या पुरुषाची ।
आंधार नगरी बेबंद राजा न्याय नीति कैची । ठाके ठोक० ३

भसक चोथवा करून त्यावर शिक्का सरकारी ।
हर जिन्नस भर भरून नेतां कोणीच न वारी ।
बारा वर्षें शहर लुटलें धूम केली सारी ।
मग राजाची भेट घेतली करून सडी स्वारी ।
विठल नामीं परशराम म्हणे ओळख भोपळ्याची ।

प्रकरण तिसरें.

# स्फुट लावण्या

[ समाजस्थिति ]

चाल ॥ भरजरी पैठणचें पातळ घे लफा ढांचांची खबर ।
आधींच जोबन निब्बर त्यावर पितांबराची चोळी जबर ।
सोनार शिक्का नवा निघाला पंधरा आणे जरी बट्टा ध्रु० ॥
वडाची साल पिंपळाला लावितां कशी लागेल पहा शोधून ॥
हेल्यावर जरी दिली अंबारी मटकन बसेल भारानें ।
पखाल आपण वाहूं विसरला घरोघरच असेल गाणं ।
हिजडे जर तरवार मारते शिपायाशीं पुसतें कोण ।
उदंड झाला ताजा गधडा याला शोभेल काय वर जीणं ॥
कोल्हे कुत्रे भुंकूं लागले हत्ती पळेल काय भिऊन ।
भीक मागून पिंड घालशी तर स्वर्गीं कैसा वाजेल घंटा ॥
सोनार शिक्का नवा निघाला पंधरा आणे जरी बट्टा ॥ १ ॥
कसे मुंगीला पर फुटले घेऊं म्हणती गगन
गरुडाची सर याला टिटवी गेली गर्वानें ।
हनुमंत पुढें उडी माराया पण केला कोल्ह्यानें ॥
उडी मारितां धरणीशीं पडला झालं बावन गेलें अन्नसात ।

श्रावणमासा शिदड मातले शेषाघरीं नेऊं लग्न
चैत्र वैशाखांत या म्हणून म्हटलें तिकडेच गेले मरून ।
ताड म्हणतो मी मेरूहून उंच कैलासाशीं लावीन फाटा ॥
सोनार शिक्का नवा निघाला पंधरा आणे जरी बट्टा ॥ २ ॥
राजहंसाच्या पंक्ती बसाया गर्वे गेला कावळा ।
जाला खेप्र टोचून पाहे जड लागे माणीक गोळा ।
बेडुक म्हणे मी वेद पढतों डबकामधीं खरडीगाळा ।
मैना साळुंख्या रडूं लागल्या नित्य रडती वटवाघुळा ।
कोणी कोणाचा गुरुनाचेला घरोघरचे झाले गोळा ॥
शिलंगणाचें सोनें आणूं आठ रुपयांचा म्हणे तोळा ।
जसे शिमग्याचे वीर घुमती फौजाचा करिती सपाटा ।
सोनार शिक्का नवा निघाला पंधरा आणे जरी बट्टा ॥ ३ ॥
तळ हातानें चंद्र झांकेना उजेड त्याचा बहुजागा ।
मोत्याच्या लडींत सरजा दमडीचा तो माल फुगा ।
गुरु गुरकावी चेला टरकावी मात्रागमनी असेल बगा ॥
परस्परें जग देत ग्वाही अपकीर्ति माहित जगा ।
कथा भागवत शास्त्र पुराण हरीचें गुण कोणी गागा ।
नामें विठ्ठलचे असे धडाके ऐकून मूर्खा होय जागा ।
येसू परशराम म्हणे अशिलाचा पोकळ ताठा ।

चाल ॥ शिव शिव काय विषय हा देवपूजा करितां करितां।
पितांबर तरी सोडून ठेवा छी छी कां कवळून धरितां ॥
सगुण निर्गुण शोधुन पाहतां कमजास्ती नाहीं भिन्न भेद ।
कलगी तुऱ्याशीं निंदून गाईल तो मांगाची अवलाद । ध्रु०।
निर्गुण ज्योति सगुणमाया दोहींपासून जीव वाचा ।
विश्वाचि माया विश्वचि व्याली तूं काय वेगळा दुसरीचा ।
नर नारी तिथें नांवच नाहीं तुरा नांव म्हणशील लुच्चा ।
परा नामें ही कलगी पराची ऐक लेका शिंदळीच्या ।
शेषाला नाहीं अंत लागला मुके झाले चारी वेद ।
आड दिला तर उंबर म्हणशील तुला तरीं काय कळला भेद।
कलगी तुऱ्याशीं निंदून गाईल तो मांगाची अवलाद ।
सगुण निर्गुण शोधुन पाहतां कमजास्ती नाहीं भिन्न भेद ।
कलगी तुऱ्यांशीं निंदून गाईल तो० ॥ १ ॥
जसें झाडाला बीज बिजापुन झाडाला होणें जाणें ।
लहान मोठा नग गाठिला आदी अंतीं एकच सोनें ।
सगुणनिर्गुण एकच वस्तु भागळी अक्षरानें ।
अभेदाशीं भेद लावशील जाणत असे गाशील गाणें ।

पंचमुख षण्मुख चतुर्मुख [illegible]
याहून आगळा कोण असेल तर सभेमधें निवडून बोला ।
जपी तपी संन्याशी या युगामधीं मायबापाविण कोण झाला।
घरबारी होऊन निंदिती डाग लावला वंशाला ।
भेद कळेना जाणतो साला निर्गुण गाऊन करती वाद ।
सगुणावांचून निर्गुण न लागे दास पितऱ्या मतीमंद ।
सगुण निर्गुण शोधून पाहतां कमजास्त नाही भिन्नभेद ।
कलगी तुऱ्याशी—॥ ३ ॥
लोहार सुतार कुंभार परीट बाराकारू आडकले ।
यांना आडून कज्जा जिंकून बिन संधीनें कोण आलें ।
नवशिक्याला काय पुसावें हजारो टाळेटोले ।
नामी विठ्ठल लीन सद्भावें परशराम वावीवाले ।
छंद शिरे सवाई वळ नामावर बुनाद ।
मूर्खाला ही छक्कड भासे शाहाण्यास केवळ बोध ।
कलगी तुऱ्याशी निंदून गाईल तो मांगाची अवलाद ।
सगुण निर्गुण शोधुन पाहतां कमजास्ती नाहीं भिन्नभेद ।
कलगी०—॥ ४ ॥

## सवतीसवतीचा झगडा लावणी ३ री.

चाल ॥ श्रीमंताच्या बावन्न पागा त्यामधें बावन्न सरदार ॥
रघुजी भोंसले दौलतराव शिंदे होळकर ।
हारीस आणिला पती दोघींनीं केला सळो कां पळो ।
सवतीचा प्रतिवाद नित्य विवाद लागला कळों ॥हारी०॥ध्रु०
म्हणे थोरली मी लग्नाची देवींधर्मी रुजु ।
✓ कोरा नवरा आधीं त्यां वरला येती मला जन पुजूं ।
जेठी सून मी वडील घरामधीं जशी ढगामधीं विजू ।
✓ भय कोणाचें समया लाऊन आम्ही उभयतां निजूं ।
मी थोराची लेक नको सवती मज पाहून खिजूं ।
सासु सासऱ्यानें मज आणिलें इला कशाला भजूं ।
चाल ॥ माझें संयवर झालें जेव्हां । फार गजर ।
रथ गाडे घोडे तेव्हां । दिली नजर ।
मजपुढें तुझा काय केवा । कर गुजर ।
असमिजांमधें जरा न राहशी पुढेंच येईल कळो ।
हारीस आणिला पती दोघींनी केला सळो कां पळो ॥स०१॥
म्हणे धाकटी वडीलपणाचा नको लावूं तोरा ।
खुष मर्जी पतीची असली तुझा काय जोरा ।
कानींकवाडीं येऊन लागशील अवघा वेळ सारा ।
दिड तांदुळ शिजऊन सांगशी गोष्टी तीन तेरा ।

ही चुनी हृदीवर कशी । पहा खरी ।
पोट पिकेना म्हणून मज केलें धिक् जिणें तुझें जळो ।
हारीस आणिला पती दोघींनीं केला सळो कां पळो ॥ २ ॥
सरसाऊन मग म्हणे थोरली उपमा देशील बरी ।
पार्वतीच्या धाकानें लपविली शिवानें गंगा शिरीं ।
मखमाली पैजार चांगली उदंड झाली जरी ।
पायाची पायामधीं शोभेल, कोणी बांधली शिरीं ।
अर्धांगीं निजअंकीं बसत मी, माझी करशील सरी ।
आजपासून चार पाउलें तुला मी ठेवीन दुरी ।
चाल ॥ येऊं दे पतीला घरीं । उभी आड्न ।
कां केली मजवरी । गळा पडून ।
✓लोण्याची सवत नाहीं बरी । कडकडून ।
असेंच सांगेन निक्षून पतीला तुझी क्रिया तुज फळो ।
हारीस आणिला पती दोघींनीं केला सळो कां पळो ॥ ३ ॥
रंगरस त्वां आधीं घेतला तपीं बसलीस करकरून ।
खोटेपणा मोठाई लावशील मजभोंती फिरफिरून ।

चाल ॥ समतोल दोहींला ठेऊन । करी मजा ।
सर्जींत वागती बहुत । हितगुजा ।
नामी विठ्ठल करी छंद पाहून । करी हुजा ।
परशराम येसू म्हणे ऐसा ज्याचा तो न ढळो ।
हारीस आणिला पती दोहींनें केला सळो का पळो ॥ ४ ॥

## लावणी ४ थी.

चाल ॥ लाडे लाडे येतें।येतें मनरंजना । उचलुनि कडेवर कांघ्याना॥

कोणी आणा सजन धुंडुनि टाकिलें वनीं ।
मी झुरतें आपले मनीं । राजआंगणीं ॥ ध्रु० ॥
पलंगावर शेज केली । बाई पलंगावर ।
पलंगावर शेज केली । सदस कैफाची ।
कैफाची लहर मशीं आली । मार्गी त्याहाळिलें ।
त्याहाळिलें याच पावली । स्वपनामधें मूर्त पाहिली ।
त्यानें कशी निष्ठुर सांड केली । येई धाऊनी ।
कोणी आणा सजन धुंडुनी । टाकलें वनींग ।
मी झुरतें आपलें मनीं । राजआंगणी ॥ १ ॥

नवतीचा बहार चालला । बाई नवतीचा ।
नवतीचा बहार चालला । वेड लाऊनियां ।
लाऊनियां मजला गेला । मज हरणीला ।
हरणीचा कंठ शोकला । कीं लवकर पत्र पाठवा त्याला ।
माझा प्राण व्याकुळ झाला । येई धाऊनी ।
कोणी आणा सजन धुंडूनी । टाकिलें वनीं ।
मी झुरतें आपले मनीं । राजआंगणीं ॥ २ ॥
जोशाला प्रश्न पुसा बाई । जोशाला लवकर पुसा ।
द्यागे जीवदान । जीवदान मलाग भरवसा ।
करा उपकार । उपकार समजेल कसा ।
कीं जाळ्यामधीं गुंतला मासा । कैसें केलें जगाशिवासा ।
येई धाऊनि कोणी आणा सजन धुंडुनि । टाकिलें वनीं ।
मी झुरतें आपल्या मनीं । राजआंगणी ॥ ३ ॥
नारीचा आला साजन । बाई नारीचा ।
नारीचा आला साजन । नेऊन रंगमहालीं ।
महालामधीं नेऊनी । भोगिला पंची ।
पंची आनंदानें । भोगिला पंची ।
पंचिला विडा देऊनि । कीं रामा म्हणे वेळ साधुनि ।
येई धाऊनि । कोणी आणा सजन धुंडुनि ।
टाकिलें वनीं । मी झुरतें आपले मनीं । राजआंगणीं ॥ ४ ॥

## लावणी ५ वी.

चाल ॥ रतीवंत महाराज पेशवे अमोलिक सुरती मोती ॥
सवाई माधवराव स्वारी निघाली नबाबा वरती ॥

सवतीग सवती नित्य भांडती नाहीं कोणाचा कमजोरा ।
पती पांगळा करून बसविला अभंड नारी शिरजोरा । ध्रु० ।
वडीलपणाचा मान मजकडे निस्तुक झाला पती बैल ।
आधींच बसविलें डोईवर याणें मग ती मजला कशी भिईल ।
जर का म्हणते हाणीन मारीन याच्या डोळ्या असूं येईल ।
बोलाबोलीनें विचार करितां ही काय याला स्वर्गी नेईल ।
चाल । तुम्ही ऐका देऊन चित्त । ही वडीलपणाची रीत ।
मजपाशीं असावा नित । चोरी छपीनें इजपाशीं जावा
इचा नसावा लई तोरा । माझ्या हातून त्यां करून आणली
गोष्टी करील काय तीनतेरा ।
सवतीग सवती नित्य भांडती नाहीं कोणाचा कमजोरा ।
पती पांगळा करून बसविला अभंड नारी शिरजोरा ॥ १ ॥
म्हणे धाकटी कद्धी ज्वानी नको आंगावर येऊं चढून ।
आधींच मेंढा करून बशीवला किती बोलशील पती आडून ।
निजाय बसायचे दिवस माझे त्वां पायतीं रहावें पडून ।
जर का माझा हेवा करशील चवघांमधीं नेईन वेढून ।

चाल । कां मजला आणिलें करून । पहिल्या उमतीचें तारुण्य ।
भर रसा आलें रस भरून । रात्र दिवसा करीन मौजा ।
मायबापानें दिलें बिजवरा । पोट पिकावें हेंचि इच्छितें—
पुढें होईल म्हातारा । सवतीग सवती नित्य भांडती० ॥२॥
घरच्या घरामधीं दोघी समजल्या हकिकत ऐका पुढें सारी ।
शरीर घेतलें पतीचें वांटून दोघी निजल्या शेजारीं ।
झोंपेमध्यें दिली कलथी पतीनें इचा पाय गेला तिच्यावरी ।
रागें रागें उठली थोरली घेऊन वरंटा काय करी ॥
चाल । ऊठ सवती जागी राहाय । तुझ्या वांटणीचा पाय ।
मजकडे आला हा पाहाय । पायावरती हणला वरंटा
पती कांपतो थरथरा ।
रागें रागें उठली धाकटी तिनें मोडला तो दुसरा ॥
सवतीग सवती नित्य भांडती नाहीं कोणाचा कमजोरा ।
पती पांगळा करून बसविला अभंड नारी शिरजोरा ॥ ३ ॥
आपल्या हातानें घर बुडविलें दोघी बसल्या दोहींकडे ।
केला चहूकुन चवरंग पतीचा घरामधीं पडले खोडे ।
जोंवर वांचला तोंवर चावली घरांतील अवघी जोड ।
स्त्रिया अघोचर अवघे म्हणती देवादिकांमधीं गोष्ट घडे ॥
चाल ॥ कवि नामीं विठ्ठलचे तोंड । बिसणीची मोडली खोड ।
लोक कैक वेळां मोडी । परशरामाचे छंद सवाई आकडबाज येसू म्हुरा

मार्गी चालतां निंदा करशील कशी गोष्ट जाईल थरा ।
सवतीग सवती नित्य भांडती नाहीं कोणाचा कमजोरा ।
पती पांगळा करून बस० ॥ ४ ॥

## लावणी ६ वी.

चाल ॥ दुपार मजला झाली जाऊंच्या घरीं सासु घालील वादु ॥
दुष्ट माझे दीरभावे काढितील माझा शोधु ॥

पतीने मजवर वरचढ केला नित्य जळे सगडी ।
करून आणली दुसरी खर्चून सोन्याच्या लगडी । ध्रु० ॥
मी काय होतें कुरूप रुपानें विचार मनीं पुर्ती ।
अर्धी दास पाटाची बायको ह्मणे चतुर सुर्ती ।
न्हाण आल्याला आडीच वर्षे तंत आले भरती ।
घरीं दारीं शेजेवर तांबिक मनच्या मनीं झुरती ।
बाहेर खसड्या सदां चित्त तुझें परनारीवरती ।
असिलाचें लेकरूं बळेंच जीव मुठीमधें धरती ।
मी वनीं एकली हरण । फिरफिरून ।
आतां सहा चव महिन्या मरन । झुरझुरून ।
पाहा जळतां माझें सरण । डोळे भरून ।
दुःख सवतीचें मला साहिना पडयावर मुगाडी ।
करून आणली दुसरी खर्चून सोन्याची लगडी ।

पतीनें मजवर वरचढ केला नित्य जळे सगडी ।
करून आणली दुसरी खर्चून सोन्याची लगडी ॥ १ ॥
ह्मणे धाकटी उभयट माझी नवी तरणी मांती ।
सडा साट मीं पाहून केला दवलतीचा हत्ती ।
अशी रांड दौंडाळ गळ्यांतुनी लग्नाची होती ।
कशास केल्या दोघी रडाया उशान पायती ।
तुझी तुला लाडकी वेगळी ठेव नेऊन सवती ।
तिची माझी एक नजर नसावी जीव गेल्या कल्पांतीं ।
चाल ॥ हळदीचा डाग एक मशीं । लाविला ।
इतक्यानें दासी झाली कशी । पुस तिला ।
जन पेकून बाहेर होशी । सांग मला ।
जिची तिजला गोष्ट सांगावी स्पष्ट करऊनका घडी ।
पतीनें मजवर वरचढ केला नित्य जळे सगडी ।
करून आणली दुसरी खर्चून सोन्याची लगडी ॥ २ ॥
दोघी सवतीचा झगडा त्यामधें आणीक राख तिसरी ।
माझी करावी वाट तुह्मामधें अजात मी दुसरी ।
धाकुटपणाचा खेळ शिकविला मींच कळाकुसरी ।
हशी खुशीनें विद्या सागतें पुढें पदर पसरी ।
एक झाला गलका भरली घर आंगण ओसरी ।
रोग नये हा भोग लागला देह वाळून उसरी ।

चाल ॥ अन्याई कोणी तरी लावा । चार जणे ।
तिघी जागीं तिघीजणी ठेवा । आर्तीनें ।
ही किरकिर विलगेस लावा । मर्जीनें ।
चवघे ह्मणती कुठे तरी भवाल गर्जीनें ।
नित्य घरामधें कळी माजला करूं पाहती फुगडी ।
पतीनें मजवर वरचढ केला नित्य जळे सगडी ।
करून आणली दुसरी खर्चून सोन्याची लगडी ॥ ३ ॥
आडच्या सवतीचा झगडाग निवडून सुगडाई केली ।
जिची तिची वेगळी नेसणूक जुदी जुदी खोली ।
एक एकीला चवदा दिवस महिन्यांतून बोली ।
दोन दिवस राहिले राखीचे आवस पुणव खाली ।
पांचांनीं पंचाईत केली लढऊन या किली ।
सरळ चालला प्रपंच गेल्या आपापल्या महालीं ।
चाल ॥ नासी विठ्ठल छंद असे । रंगरेशी ।
जडणीमधें अंतर नसे । जन खुशी ।
जो आडमार्गीमधीं धसे । त्याची हशी ।
परशराम गुण येसू गातो लाखामधें सुगडी ।
करून आणली दुसरी खर्चून सोन्याची लगडी ॥ ४ ॥

खर्चून पैका दोघी बायका केल्या सुखासाठी ।
सुख नाहीं परदुःख लागलें नित्य आमच्या पाठीं ॥ ध्रु० ॥

मूळ लग्नाची आमची बायको जन्माची वंडा ।
बारा वर्षें न्हाती होईना अजून कारकोडा ।
इणेंच करविली बळेंच दुसरी घालुनया गंडा ।
केलें पदरानें खोरें आह्माला सुकऊनया भेंडा ।
सूळ खांद्यावर घेऊन घरोघर नाचवशील झेंडा ।
केली तशी कडे लाव उरावर ठेव बालीव धोंडा । चाल ।
केली तुझी त्यांनि खटपट । एकचित्तीं वागा नीट ।
भलतुसें पिकेंदे पोट । कां करून घेशील विट ।
डोळे असून आडांत पडशील हातीं घेऊन दिवटी ।
होती एकटी खाऊ पडकली तुप साखर रोटी । खर्चून पैका० ॥ १

ह्मणे पाटाची होतें सुखाची रांडपण घालस ।
गाडी बैल जुंपून आली घरीं माझ्या चालून ।
कसा घातला फासा सवती गोड गोड बोलून ।
अर्धा गांव केला पुढाईत हात पाय जोडून ।

घरदार संसार तुझाच नवरा जिवांत जीव घालून ।
आऊत सोडून राऊत झाला पाहतो सर्शी तोलून । चाल ।
शरिरानें बनली घऊस । तुला निजाया बसायाची हौस ।
किती सवती लावशील धऊस । रक्ताचा पाडीन पाऊस ।
करीन यावडी नेईन चावडी मग पडशील खोटी ।
हौती एकटी खाऊ पडकली तुप साखर रोटी ॥ खर्चून पैका० ॥२
सांज सकाळीं नित्य धुमाळी दोघी समतोली ।
बेजार केला नवरा ठेविला करूनया बिली ।
घरच्या घरामधी चवघाजणांनी मन समजुत केली ।
वडील ठेवली खाली धाकटी माडीवर ठेवली ।
पाटाशी पती चोरून जातां पाळत लावली ।
आधीं शिडी चढतां धावली पायांस कव घाली । चाल ।
धाकटी जपून वर होती । तिच्या शेंडी लागली हातीं ।
तिनें ताणून धरला पती । दोघीजणी पडल्या जीति ।
जसा दोडका लोंबू लागला झाला हिरमुष्टी ।
दिवस उगवल्या सोडून दिल्हा जीव उरला कंठीं ।
खर्चून पैका दोघी बायका केल्या सुखासाठीं ॥ ३ ॥
सुजून भोपळा झाला भवला दोहींचा झगडा ।
मेक सगळ्या करूं लागल्या चंचळ नारी उघडा ।
ओंगी वायु भरला घातला वैद्यानें पगडा ।

धन दवलत सारी वाटे लावली मग झाला उघडा ।
दोघी बायका मूळ पापाच्या असून चतुर सुगडा ।
नामीं विठ्ठल परशराम म्हणे शेंदुर दर्गडा ॥ चाल ॥
एक जाया असावी सती । मूळ दुर्योधन दुर्मति ।
नेला अहंभाव अधोगती । काय असून नसून संपत्ति ।
रामकृष्ण गुणी रामा कपुत बुडविल कुळ पोटीं ।
मायबाप कोणी घेऊन गेले सांगा वैकुंठीं ।
खर्चून पैका दोघी बायका केल्या सुखासाठीं ॥
सुख नाहीं पर दुःख लागलें नित आमच्या पाठीं ॥ ४ ॥

## लावणी ८ वी.

चाल ॥ दुपार मजला झाली जाऊंद्या घरीं सासु घालील वादु ॥
॥ ॥ दुष्ट माझे दिरभावे काढतील माझा शोधु ॥

जीव गेला तो जाऊंदे नारी केला नेम ना कधीं डगन ।
बायकोस आवडवी दादल्या तूं मरशील मी सता निघन । ध्रु०
चाहील ती घरीं दया हरीची लागेल तें पुरवीन बसल्या ।
चट्टी पट्टी कर धुंद फुंद राव कर मौजा आवडेल तसल्या ।
तूं क्षणभर ना दृष्टी पडशील मी आंधळा डोळा असल्या ।
उन वारा जरी तुजला लागेल तूं आमचा गडे अर्धे महान ।
जीव गला तो जाऊंदे नारी केला नेम ना कधीं डगन ॥ १ ॥

रंगीत चौपट तुशीं खेळाया पट देई छान गडे ।
तुज भवतालीं सरून कचेरी मला ठेंगणें दिसलें गगन ।
जीव गेला तो जाऊंदे नारी केला नेम ना कधीं डगन ॥२॥

तऱ्हेवाज ती आधींच खिलाडू नवऱ्याच्या गोष्टी ऐकून ।
मिष दुखण्याचें करून निजली पडदे लावले मग चहूकून ।
अर्धे रात्रीं लटकेंच मेली पांची प्राण धरले रोहोकुन ।
वरपंगी आल्हाद दाटे मग शरीर सुटे धरलें चहूकून ।
अशी वस्तुका आज भोगून घ्यावी दिवस उगवल्या लाऊं अगन।
जीव गेला तो०
॥ ३ ॥

खरेंच निघल काय सता पाहाला थेट घेतली प्रेतकळा ।
तेव्हां तो निजला शेंवू लागला नार उघडून पाहे डोळा ।
बरा फिरे वचनाचा खंबीर भोगून घेशील सुखसोहळा ।
नामें विठ्ठल परशराम म्हणे शिपा सारी सदर नित्य काळा ।
रामकृष्ण गुणी रामा कसारे शाहिरकीमधीं सदा मगन ।
जीव गेला तो जाऊंदे नारी केला नेम ना कधीं दगन ।
नायकोस आवडची०
॥ ४ ॥

लष्करचें काय सुख सांगूं गे तुज नारी ।
तुझे प्रीतिस्तव तें सोडून राहिलों घरीं ॥ ध्रु० ॥

आम्ही बाळ सराईत आधींच घोडेस्वार ।
जातांच लागला लष्करांत रोजगार ।
दिला बसाया सभल घोडा धन्याचा प्यार ।
पंगतीचें ताट दिलें मशाल खिजमद्दार ।
उमतीचा तवर केली झड घालून तलवार ॥
बक्षिसा मिळविल्या बहरीन अमदारीर ।
दौलत मिळविली भर उंट दोन चार ।
मग आली तुझी सय जीव करतो हुरहुर ।
धन्याची रजा चौसहिन्यांचा करार ।
कुच मुक्काम दर मुक्काम आलों कसार बारी ।
केली गर्दी भिलानें दौलत नेली सारी ॥
लष्करचें काय सुख सांगूं गे तुज नारी ।
तुझे प्रीतिस्तव तें सोडून राहिलों घरीं ॥ २ ॥

दोन चार पांघरुणें आला आंगावर लेऊन ।

नारीचे दिपले डोळे लिबास पाहून ।
करी गोड गोड जेवाया समया लाऊन ।
करी खुशामत अर्जीनें पुढें उभी राहून ।
आज लाख मिळविले हरी विसरला देऊन ।
बरे आले हेतशीर घरीं आपले जीव घेऊन ।
वडिलांची अर्धी भाकर खाऊं धुऊन ।
आहेवपण भोगील कपाळीं कुंकू लाऊन ।
गेली महालामधें दिला पलंग बिछाऊन ।
शेजारीं निजले दोघे लई प्रीत लाऊन ।
भोगिला विलास समया लाऊन नारी ।
मज रुपासारखा जोडा असा बेवहारी ।
लष्करचें काय सुख सांगू गे तुज नारी ।
तुझे प्रीतिस्तव तें सोडून राहिलों घरीं ॥ २ ॥

गेली रात्र उगवला दिनमान दुसऱ्या दिवशीं ।
आवगून उठली होती चतुर नार हावशी ।
वांटिती साकरा जन नारीला पुसी ।
चुडेदान दिलें अंबिका पावली नवशी ।
आंघोळीस पाणी ठेवून ऊन ऊन सरशी ।
कावी उटणें चौरंगावर होऊन सरशी ।
माथ्याला टाळू कशाचें हो गुणराशी ।

दोन्ही खांद्यांला दोन्ही घट्टे, बांधल्या गारशी ।
वाकडा हात खुळा, देह झाली झांजरशी ।
टांचांच्या गेल्या भेगा असून सुखवासी ।
रात्रंदिस होती घोड्यावरती स्वारी ।
रांगडा मुलुख तिथें लढाई केली भारी ॥ लष्करचें० ॥ ३ ॥
पाठीशीं ढाल खांद्यावर बंदुक आमच्या ।
कंबरेला साज परदाळे सुऱ्या निमच्या ।
आम्हीं केली लढाई पाछायाशीं रुमच्या ।
करकरा निरपल्या जेव्हां चमाचम चमच्या ।
गोळ्यांचा वरसतो पाऊस अती झुमझुमच्या ।
रक्ताचे वाहती पूर नद्या रुमधुमच्या ।
लढणार असाम्या निवडक जाण आमच्या ।
तिथें पाणी मिळेना रुप्याचा एक चमचा ।
निसंग केली लढाई पेटलों भरी ।
सोन्याचे मंदिल तुरे दिले जरतारी । लष्करचें० ॥ ४ ॥
इतकें ऐकुन नार हर्षली चित्ता ।
लष्करचा गडी एक याला जामीन होता ।
त्यानें मुळापासून सांगितली अवघी वार्ता ।
माथ्याला टक्कल पडलें मोळी वाहतां ।
खांद्यांला पडले घट्टे बादलें वहातां ।

बादल्याची मोडली काठी याचे हातां ।
याला सकाळींच उठून मारती लाता ।
जेव्हां झाली लढाई बुणग्यांमधीं हा होता ।
पोषाक पळाला घेऊन येतां येतां ।
हेलपाटा पडला इथवर याच्याकरतां ।
नारीचें झिजलें कपाळ पायां पडतां ।
बाण्याची उचापत देऊं कशानें मी आतां ।
विरू परशरामाचे छंद असेग बेबहारी ।
मगलीच्या उडाल्या भराल भणभण सारी । लष्करचें० ॥५॥

## लावणी १० वी.

चाल—हा फंदी फाकडा मज सांपडला गुंडा ।
चालूं दे प्रीत शेवटा देवा मार्तंडा ॥ कुशाबा.

घरीं कळा खाऊ अबळा नसावी अशी ।
अवघा वेळ रागामधीं नागीण धुसधुशी ॥ ध्रु० ॥

घरीं खाया पियाला दया हरीची असून ।
फिलवाणें हिंडावें जगांत चिंध्या नेसून ।
नवा केस मोकळे वेणी घालिना बसून ।
नवाचा नवरा कांहीं बोले वसवसून ।
माहेरीं पळावें दोन चार महिन्यांनीं रुसून ।

ही वेडी कां शहाणी म्हणवा तिशीं ।
अवघा वेळ रागामधीं नागीण धुसधुशी ।। १ ।।
देखण्यांत विद्री काळे दांत प्रतिमा ।
खांद्यावर टाकून पदर बोले बेतमा ।
दोघी चवघी सारख्या बसून करी नित जमा ।
आंगणांत चावडी घर केलें तीन शिमा ।
लग्नाचा नवरा त्याशीं बोले बेतमा ।
धाव दवडी वाहती पाणी वेडी धुमधुमा ।
गवळ्यास्तव नंदा घरीं दुधाळ्या म्हशी ।
अवघा वेळ रागामधीं नागीण धुसधुशी ।। २ ।।
सोयरे स्नेही येतांच मनीं तरफडी ।
मायबापभावास्तव करिती कुळवाडी ।
घर स्वयंपाक म्हणतां मारी कपाळीं आढी ।
जेवाया पुरेना तिशीं ताटभर काढी ।
मिष केलें हिवाचें घेऊन निजे गोदडी ।
कर काम म्हणे मी लेकुरवाळी नाहीं सडी ।
अवघा वेळ रागामधीं नागीण धुसधुशी ।। ३ ।।
मूळ वर्ण शंभर अष्टल्या वरी ।
दिवस पालटल्यावर माग अनंत अर्ज करी ।
जारिणी जारसीं सहित पुरुष मिळाले घरोघरीं ।

याकारितां योगी बसले गिरिकंदरीं ।
नामें विठ्ठलाचें कवि सुख पाहे शाहिरी ।
म्हणे परशराम होय सावध पडशील फशी ।
बेसूचे छंद कशी उचलपुच्याला टुशी ।
अवघा वेळ रागामधें नागिण धुसधुशी ॥ ४ ॥

## लावणी ११ वी.

चाल ॥ शिव शिव काय विषय हा देवपूजा करितां करितां ।
पीतांबर तरी सोडून ठेवा छी छी कां कवळून धरितां ॥
मी लग्नाची बाईल याची हा तरी नवरा कसा ।
पांच तुम्ही परमेश्वर पारीं बसून याला पुसा ॥ ध्रु० ॥
फक्त हाळदीचा डाग लाविला केल्या दिवसापासून ।
चोळी लुगडें काय घेऊन शिणला खरें खोटें घ्या पुसून ।
सांड गांवामधीं फिरतो भांड रिकामटा असून ।
इकडील काडी इकडे करीना घर कसें चालेल बसून ।
हातांत माला म्हणे जेऊं घाला उलटाच मजवर रुसून ।
तीन तुकड्यांचें एक मुंडासें तिनदां बांधी करून ।
डावे कानावर ठेऊन पागोटें वर तीन पानं खोसून ।
चाल ॥ राहिना घरीं कधीं गोर गोविली मज गाईसी ।
पाहिना बरें मला, काय चोरी केली याची ।

धड माहेरच्यानीं अन्न राखिली मेल्याची ।
तिनदां ग तिनदां जाईन ह्मणतो जीव झाला वेडापिसा ।
राहायाचा किती धडमाटा पदरीं असा ।
मी लग्नाची बाईल याची हा तरी नवरा कसा ।
पांच तुम्ही परमेश्वर पारीं बसून याला पुसा ॥ १ ॥
ही काय ह्मणती भडवे पाटील हिचें कांहीं ऐकूं नका ।
खाया पियाला घरीं काय तोटा महामुर पैसा टका ।
तीन समले काय नित बांधुनि उडे दिल्लीचा शिका ।
जन्मा जुगाला जाईल आमच्या द्या आधुलीला धक्का ।
दिनें देवडे चोळी लुगडें तिळभर नाहीं चुका ।
घर नंदाचें गोकुळ नांदे जणुं दुसरी द्वारका ।
खरें खोटें आधीं येऊन पहा मग तोंडावर थुका ।
दिल चाहिल त्या करूं आह्मी मौजा पाहून जळतील हिका ।
चाल ॥ लागलें वेड हिला चळ भरला माहेरचा ।
लाविला वाहात झरा खेळ मांडिला संसाराचा ।
धड इचें येथें, तेथें जीव अन्नधा अंतरचा ।
काय बापाचें भूषण सांगती तिथें खडबडती पिसा ।
तोंड धुतां धड येईना चिपडें दोगातांतून एक वासा ।
मी लग्नाची बाईल याची हा तरी नवरा कसा ।
पांच तुम्ही परमेश्वर पारीं बसून याला पुसा ॥ २ ॥

अग हा सटक्या पटक्या लटक्याच गोष्टी करी ।
भात भुजाया धड खापर मिळेना पहा तयाच्या घरी ।
याची माय माझी सखी मावळण मायबापाच्या घरी ।
तिच्या पोटीं हा हिरा जन्मला काय आठवावें सरी ।
गाडे घोडे गाई म्हैशी बैल आंदण चुरी ।
करमुकीचा कांदा तिनदां येतो आंगावरी ।
चाल ॥ साहिना दुःख म्हणून मी आलें पारावरी ।
लेक मी तुमची धर्माची काय अन्याय घाला पदरीं ।
चुलीपाशीं हा बहादर होऊनी मजवरी बसवी ठसा ।
एक तिथें दहा का करिना, माझी दुर्दशा ।
मी लग्नाची बाईल याची हा तरी नवरा कसा ।
पांच तुम्ही परमेश्वर पारीं बसून याला पुसा ॥ ३ ॥
अगे चौपिढ्याची दौलत आमची आहे एकुणएक ।
इचा बाप तो आमचा मामा मागत होता भीक ।
बळेंच आणून यानें पदरीं घातली लेक ।
जन्मवांझुटी होईना पोटीं इच्या एक बाळक ।
आम्हावर भरत घर पोरानें अवघें बुडविलें पीक ।
इजवर करितों दुसरी तिसरी स्पष्ट सांगतों ठीक ।
चाल ॥ कसा तर जोडा लग्नाचा, शेवटीं जाणून ही कदर ।
नाकेमाटी उतली रसा रसा ।

विठ्ठल नामें परशराम म्हण लावली कसा ।
मी लग्नाची बाईल याची हा तरी नवरा कसा ।
पांच तुम्ही परमेश्वर पारीं बसून याला पुसा ॥ ४ ॥

## लावणी १२ वी.

चाल मी पाटिंतलें मास काय मन सायाशीं लाविलें ।
कुणीकडे चुकला वाट आज माझ्या भेटीस फावलें ॥
धट्टा कट्टा तरणा ताठा कांहीं करीना चाकरी ।
कुटुंबघातकी तीन शेरांच्या नित उडवी भाकरी ॥ ध्रु० ॥
गांवाबाहेर आंत कोसावर गोसाव्याची मढी ।
जन्म आखाडा आक्षई केला नित ओढितो गुरगुडी ।
लाल डोळे करी हिरवे पिंवळे घरीं येऊन भडवडी ।
खायापुरता गोड बोलतो मजभवतीं लुडबुडी ।
पोटीं सोन्याचें नाणें झालें तें उघडी पाघडी ।
नाहीं देव्हारीं देव राहिले कर्माच्या परवडी ।
नग डागिने मोडून चारिले मानेमणी बुगडी ।
अवघे माहेराकडून, दिवस आबळीचे किती घालूं ।
आहाळण्या किती सोसूं याच्यारी ।
सुकून देह झाली माझी भालू ।
मी आबरूची म्हणून गम खातें आपल्या घरच्या घरीं ।
दुसरी एखादी असती ओढून नेली पारावरी ।

घट्टा कट्टा तरणा ताठा कांहीं करीना चाकरी ।
कुटुंबघातकी तीन शेरांच्या नित उडवी भाकरी ॥ १ ॥
ऐका पाटील सालस सबलस होऊन बोलती कशी ।
तिन दिवसाहून केली बायको रतिबलाविला इशीं ।
खाया पिया काय घरीं तोटा ठेविली फुला जशी ।
नग डागिने असून लेईना फुन नागीण धुसधुसी ।
दूध दुभतें घरीं खिल्लारें कळप गाई म्हशी ।
चार पिढ्यांचा रोजगार आहे आमचा मोंगालापशी ।
काय घरीं संपत्तीला तोटारी । आम्हाला पैसा जणू कवडी ।
घडविले नग दुहिरी इजलारी । आटविल्या सोन्याच्या लगडी ।
उठली दैनीवर आमच्यारी । रांड बेढंगी फार दुघडी ।
दुणे देवडी लेणें लुगडीं भरगच्चीचें जरी ।
घालून चिंध्या दुगणीं लावून घागर घेते शिरीं ।
घट्टा कट्टा तरणा ताठा कांहीं करनि चाकरी ।
कुटुंबघातकी तीन शेरांच्या नित उडवी भाकरी ॥ २ ॥
घर सोडून नाहीं बाहेर गेला भगली विसनी जरा ।
शिराळशेटी गोष्टी सांगतो सरी पंचाईत करा ।
एक आंगावर झांजर शेला तो जालो चुरचुरा ।
चापून चोपून पगडी बांधितो जतन केली जरा ।
त्यावर फुल्की होऊन बसला शिपाई म्हणे मी शुरा ।

सांगशील दौलत वडिलांची । दाव मज पुरून कुठें ठेविली ।
असून तरी कां मजला अबदारी । गाय कशी गाळामधें गोविली ।
आटोप घरदार तुझेंरी । भलाई माझी मज भोवली ।
सतीला नाहीं बती हत्ती आहे शिंदळीच्या घरीं ।
लबाड जेबी तिनदां वाजवी तीन तीन फाके मारी ।
धट्टा कट्टा तरणा ताठा कांहीं करीना चाकरी ।
कुटुंबघातकी तीन०—॥ ३ ॥

रांड भांड ही संवरी झाली गावशी धुपे सदा ।
नित्य पारावर कुरकुर ऐकून जन हासती गदगदा ।
ऊठून चावडी धावून येते अवघा वेळ हा हुद्दा ।
नांव गांव वडिलांचा लौकिक उंच अबरूच्या पदा ।
बळें चौथांनीं पदरीं बांधली नेऊन महा एकदां ।
कोणीं पाहिला परी ओळखावा अकलेनें हा खुदा ।
करून राहूं दुसरी, इचें नांव घेऊं न कदा ।
दर महिना देऊं चंदी मोजून इचा आमचा हा मुद्दा ।
चुकेना लग्नाचा जोडा पाईं खोडा जज्य बोले ।
असा स्त्री पुरुषाचा झगडारी । वर्तणुक पाहून कवन केलें

समजले ते दोघे उभयतारी । धरून सणगटी घरी नेलें ।
नामी विठ्ठलचे तोड सवाई धौशा ठेऊन शिरीं ।
परशराम ह्मणे ट्रम उतरली बालेघाटावरी ।
धट्टा कट्टा तरणा ताठा कांहीं करीना चाकरी ।
कुटुंबघा ॥ ४ ॥

## लावणी १३ वी.

चाल भरजरी पैठणाचें पातळ लफाघे टांचा ची खबर ।
आधीच जोबन तिब्बर त्यावर पितांबराची चोळी जबर । फंदी
चाल दुसरी । हरहर हरहर काय विषय हा देवपूजा करितां करितां
पितांबर तरी सोडून ठेवा छी छी कां कवळून धरला ।
धष्टपुष्ट हा लठ्ठ सुभाना घर सोडून कोठें जाईना ।
दिवसा रात्रीं कुरबुर करितो बऱ्या दृष्टीनें पाहिना ॥ ध्रु० ॥
आजवर होतें लहान मजला कळूं लागलें आतां ।
कोठवर सोसूं वस्ती सी याशीं न ऐके, वर्जितां ।
खाया पियाचे दिवस माझे आले कमळन मी रता ।
अवघा वेळ हा संसार न राहे घडीभर रीता ।
भसूर खुणी निखुर बसलो कांहीं काळजी ठेविना ।
एक हातामध्यें आंगठी घालुनी तिजवर कोठें साईना ।
धष्टपुष्ट हा लठ्ठ सुभाना घर सोडून कोठें जाईना ।
दिवसा रात्रीं कुरबुर करितो बऱ्या दृष्टीनें पाहिना ॥ १ ॥

संसाराची राळ मांडली फिरे नित भराळा भवता ।
गोड घासावर नजर याची न पाही पुढल्या हिता ।
ही काय सांगे लुतरी कुत्री वसवस करती सदा ।
बहुता परी सांगतां परंतु आमचें ऐकेना कदां ।
महिन्यांतून जाती पळून तिनदां दुसरा न सुचे हुद्दा ।
साहेरचा इला ओढा लागला पुरता पुसून घ्या मुद्दा ।
इज़वर करूं आम्ही दुसरी बायको मोजून शेर देऊं जुदा ।
पडून राहावें उगीच इणें करूं नये अमर्यादा ।
रांड भांड ही सवरी झाली कांहीं अक्कल घेईना ।
धन दवलत घरीं महामूर असतां लेणें लुगडें लेईना ।
धष्ट पुष्ट० ॥ २ ॥
हा काय सांगे तुटका लटका दवलत कोठें तरी आहे ? ।
पाणी पियाला तांब्या न मिळे लोटा बसून राहे ।
नग डागिने अगदीं मोडले अझून धरीना सोय ।
एक कानावर पगडी ठेऊन दर्पणीं मुखडा पाहे ।
जन्मापासून आइतखाऊ कवडी जोडतां नये ।
मज भोवतीं जें रत्न जन्मलें झालें निहाय माय ।
हा पूर्वीचा वैरी बाहेरीं पळभर सुख देईना ।
जीव घेईल तरी घे एकदाचें दुःख मला साहीना ।
धष्ट पुष्ट० ॥ ३ ॥

स्त्री पुरुषांचें भांडण होतां आपले आपले घरीं ।
दृढ निश्चय पतीचे चरणीं ठेऊन राहे दुरी ।
कल्पना मनांतून निघून गेल्या बहु झाली हावभरी ।
आधींच देखणी त्यावर गहिना घालून नानापरी ।
एकचित्त उभयतां होऊनी नांदूं लागले घरीं ।
नामी विठ्ठल परशराम गातो कवन कुसरी ।
सखारामाचे तोंड ऐकतां आल्यामति होईना ।
बिलकुल बसले जिकडील तिकडे सन्मुख एकही येईना ।
भाइ पुढ० ॥ ४ ॥

## लावणी १४ वी.

चाल ॥ श्रीमंताच्या बावन पागा त्यांमधें बावन सरदार ।
रघुजी भोंसले दौलतराव शिंदे तुकोजी होळकर ॥
कुबड नार नवऱ्याला शिकवी ह्मणे वेगळे निघा ।
बहामर्दी संसार दावितें करून तुह्माला बघा । ध्रु० ॥
जसा भाड्याचा बैल राबतो देह अगदीं झिजली ।
तुमच्या जिवावर एवढी द्वारका केलें घरदार दोमजली ।
पावस पहाट नित्य उठूनया शेजभाज त्यजिली ।
त्याधारला जोडा तुझ्या मी आहें नाजुक बिजली ।
इतके करून नाहीं सत्ता कां अकल थिजली ।
तुम्ही चाकर मी नटीक फुकाची दैवदशा निजली ।

चाल ॥ कारभारी तुमचा भाऊ । कुलकुला घरांत जाऊ ।
तिजपुढें काय मी माऊ । अशी तस्ता कुठवर साहूं ।
केली खुलवर शेवटीं मुक्रर देतील दगा ।
कर्जाचे डोंगर दावितील करून वर त्या बगा ।
दुघड नार नवऱ्याला शिकवी ह्मणे वेगळे निघा ।
जामर्दी संसार दावितें करून तुह्माला बघा । १ ॥
पहिल्यापासून केली कमाई कवडी कवडी पुसा ।
तोडा सुतळीचा वांटून घ्या तुह्मी बरोबरीचा हिस्सा ।
नग डागिने घडवा मजला रोकड हुंडी दुसा ।
माझ्या माहेरीं जाऊन राहूं बिन घोरानें असा ।
परगणें पाटिल तुमचा सासरा जिकडे तिकडे ठसा ।
राबणार राबतील शेतीं, स्वस्थ चावडी बसा ।
चाल ॥ बायकोची अक्कल खोटी । जिवीं धरून बांधल्या गांठीं ।
पहा केवढी कळीची काठी । भावाभावांत पडल्या तुटी ।
वेगळेपणाची हौस मनामधें आगीन करी धुगधुगा ।
निमित्ताशीं केली पुढें बायको, आपण राहिला उगा ।
दुघड नार नवऱ्याला शिकवी ह्मणे वेगळे निघा ।
जाहामर्दी संसार दावितें करून तुह्माला बघा ॥ २ ॥
अशी मनसुभी वाटून घाटून आडला आवत्या गाडी ।
लटकीच कुरबुर बायको झोडली घालून बसला आढी ।

रागें भरून गोठ्यामधें निजला हातीं पाईं धोंगडी ।
आला बाहेरून भावा म्हणतो कुठें गेल्या धांगडी ।
नका भाऊजी लाऊं कुरकुर करीन तलाव बावडी ।
घ्या अक्कल न्हीं शाहाणे माझे काय भिजतील तीन खडी ।
मला होईना तुमचा धंदा कुठवर मार खाऊं कितीदा ।
चाल ॥ कोणी आड येईना या धंदा । अशी घळमळ पडली मदा ।
सारी रात असा विचार केला धरिला दोहिंनी फुगा ।
बांधल्या घराला विभो लावला पिळ पाडून केला भुगा ।
दुबळ मार नवऱ्याला शिकवी म्हणे वेगळे निघा ।
आहामदीं संसार दाविते करून तुम्हाला बघा ॥ २ ॥
चवघांनीं वांटणी करून बरोबर वांटा करून दिला ।
अर्ध्या आडामधें भरून आंबाडी सासुरवाडीं गेला ।
येन सालीं खरपड पडलें शेतामधीं तोटा आला ।
पडीवारी बिलकुल पैसा अवघा वाटे लाविला ।
सावकाराचून बैल दमले कर्जबंदी झाला ।
पळतीमे सोयरेधायरे कोणी पुसेना याला ।
चाल ॥ झाली दशा आली अवकळा । डोई चिंध्यांचा झिळमिळा ।
गेला विसरून टाकमटिळा । देह वाळून झाली पिळा ।
मिळा मेकन मग करी मजुरी दोहींकडून तुटला लगा ।
दाणे खाऊन करी गुजराण दांतांच्या बसल्या शिरा ।

दुघड नार नवऱ्याला शिकवी म्हणे वेगळे निघा ।
जाहामर्दी संसार दावितें करून तुम्हाला बघा ॥ ४ ॥
बायकोच्या अकलेनें झाली थोराथोरांची दशा ।
ढोर वेगळे सोडून निघती मायबापाची आशा ।
गेला शरण भावासी आपली पुरती फिटली निशा ।
केली पाहिल्याहून चढी उतरला डोळ्यांवरला नशा ।
एक जोडी पर देव दहांचें हाजा उडवी परखुशा ।
जिकडे तिकडे मान मानती लौकिकाच्या उशा ।
चाल ॥ नामीं विठ्ठलाचे छंद गीति । धर ऐकून मूर्खा चित्तीं ।
नवशिकाची किंमत किती । श्वानास भिईना हत्ती ।
परशराम येसू निवडून दावी हा मोती हा फुगा ।
तीळ नाहीं म्हणून कोळ साठविले घरात घालून ओघा ।
दुघड नार नवऱ्याला शिकवी म्हणे वेगळे निघा ।
जाहामर्दी संसार दावितें करून तुम्हाला बघा ॥ ५ ॥

## लावणी १५ वी.

चाल ॥ जयशिवलिंगा मस्तकीं गंगा पार्वतीला चोरून ठेविलें ।
ज्या गंगेनें जग उद्धरलें त्रैलोक्यामध्यें नाणवलें ॥
पतिव्रता खुण करून पतीला गुंफून दिधला तुरा ।
पर पुरुषीं जर रत मीं होईन तरी सुकेल चातुरा ॥ ध्रु० ॥

पर मुलखीं तुम्ही जाऊन राहिलां बारा वर्षें जरी ।
नाहीं सुकणार तुरा जराभर हीच प्रतिज्ञा खरी ।
ऐसें ऐकून नारीचे शिपाई हर्षले अंतरीं ।
आम्ही जातों लष्करीं, कामिनी खुशाल रहावें घरीं ।
चार कामें तुज सांगून जातों निक्षुन हृदयीं धरी ।
बिन पैशाविण महाल बांधून बाग लाव रसभरी ।
पुरुषाविण स्त्री पर्णून आण एक आम्हास रूपगुणपरी ।
पुत्र पतीविण पैदा करून ठेव आपले मंदिरीं ।
असें सांकडें घालून गेला फंदी फाकडा शुरा ।
रात्रंदिवस काळजी नारीला चैन पडेना जरा ।
पतिव्रता खूण करून पतीला गुंफून दिधला तुरा ।
पर पुरुषीं जर रत मी होईन तरी सुकेल चातुरा ॥ १ ॥
नवगेंदाचा तुरा मस्तकीं फुलाशीं फूल दाटलें ।
हुजूर चाकरी राजापाशीं कांहीं दिवस कांटले ।
ताजादार निशाणवा सुके न अग्नी लोळ तुटले ।
कुठून लाविती नकळे शोधितां सहा महिने लोटले ।
कांहीं तरी किमया असेल पराक्रम आश्चर्य वाटलें ।
मर्म पुसाया त्यासी एकांतीं राजानें गांठलें ।
तो म्हणे आमची नार सती घरीं सुवर्ण मुशीं आटलें ।
तिनें शीर हें लावून आम्ही चार मुलख खेटलें ।

ऐकून राजा चकित झाला बाण जिव्हारीं पुरा ।
तुरा सुकेल तरी नक्षा राहील यावर आपला कुरा ।
पतिव्रता खूण करून पतीला गुंफून दिधला तुरा ।
पर पुरुषीं जर रत मी होईन तरी सुकेल चातुरा ।। २ ।।
पलंगाची चाकरी शिपाई जवळ हुजूर ठेविला ।
पतिव्रतेचें व्रत भंगाया प्रधान पाठविला ।
शहरा बाहेर मुक्काम करुनि कागद भेटविला ।
गोष्ट लावितां तिशीं पतीचा हुकूम आठविला ।
बाग महाल जर बांधून देशील तरी जीव बाटविला ।
दाशी हातीं संदेसा मनसुभा थोडक्यांत आटविला ।
बाग महाल त्यानें सहा महिन्यांमध्यें तयार करून ठेविला ।
आपल्या सारखी सजऊन दासी तिशीं रंग लुटविला ।
पतिआज्ञेस्तव असत्य भाषण कधीं बाधेना जरा ।
पतीव्रता व्रत राखून आपलें अभंग अक्षई हिरा ।
पतिव्रता खून करून पतीला गुंफून दिधला तुरा ।
पर पुरुषीं जर रत मी होईन तरी सुकेल चातुरा ।। ३ ।।
कुच करून मग प्रधान आपले नगराशीं जातां ।
सवें निघाली गवळण होऊन कोणा ना कळतां ।
पत लाऊन तिनें पती भोगिला पाहून दिस चौथा ।
पोषाक खंजिर खूण मागितली लाऊन मोहे ममता ।

करून साज पुरुषाचा निघाली परसून घरीं येतां ।
खंजिराशीं लग्न लाऊन आणिली दुसरी दुहिता ।
नवमहिन्या घरीं पुत्र प्रसवली आनंद बहु चित्ता ।
वर्तमान लिहून पाठविलें झाली मूल वार्ता ।
पत्र वाचितां हरुष झाला मग वांटी साकरा ।
आज्ञा मागे बहु युक्तीनें जातों आपुल्या घरां ।
पतिव्रता खूण करून पतीला गुंफुन दिधला तुरा ।
परपुरुषीं जर रत मी होईन तरी सुकेल चातुरा ॥ ४ ॥
दासी भोगून प्रधान थकला विनोद राजा करी ।
नाहीं सुकला तुरा जराभर नार सती ते खरी ।
तलफ चुकऊन पोषाक दिधला खुप उमदा भरजरी ।
यशाचा शिरीं तुरा लाऊन जय घेऊन आला घरीं ।
नार कामें हीं करून ठेविलीं वाईट अथवा बरीं ।
पोषाक खंजिर खूण दाखविली याला साक्ष हरी ।
दोघी बायका आणि पुत्र प्रीतीनें बसून अंकावरी ।
लाखांमध्यें कोणी विरळा, असली नाहीं घरोघरीं ।
नासीं विठ्ठल परशराम गुण येसू गातो शिरा ।
रामकृष्ण रामाचे तोंड हे ऐकून नवशीक झुरोरे ।
पतिव्रता खूण करून पतीला गुंफून दिधला तुरा ।
पर पुरुषी जर रत मी होईन तरी सुकेल चातुरा ॥ ५ ॥

## लावणी. १६ वी.

चाल ॥ चल दूर कर मोहनाराणी बटाव लुच्या ॥
कोण्या शास्त्रीं वर्णिल्या कीर्ति जार जारिणीच्या ॥

कोणी विरळा एकादा राहील संभाळून अबरू ।
इषकाचे पायीं सजण मारिला गबरू ॥ ध्रु० ॥
एक शिपायाची रूपसुंदर नाजुक आबळा ।
परी कर्मनिष्ठ घरीं प्रपंच अगदीं दुब्बळा ।
चहुकून उणा संसार दुःखाचा उभळा ।
हे तसे परी दोहीनें धरून धीर सबळा ।
एक पुण्यपरायण साधु, शेजारीं होता तयाचें ऐका ।
तो भजनशील रागिणी राग गायनांत केवळ पक्का ।
सत्काळ घालत अहोरात्री लाऊन हरिभजनाचा ठोका ।
त्यासी निरऊनया स्त्रीला गेला रोजगारा निघून परमुलखा ।
बारा वर्षें राहिला नाहीं पाठविली खबरू ॥
कोणी विरळा एकादा राहील संभाळून अबरू ।
इषकाचे पायीं सजण मारिला गबरू ॥ १ ॥
त्या साधुपायीं निश्चय दिसेंदिस आगळी ।
शिकवितां कविता गायनकळा आली आगळी ।
पती यावा सुखाला म्हणून देह उगळी ।
अंतरीं ध्यान लावी जशी बगळी ।

तुळशीवृंदावनीं बसून अर्धे रात्रीं गायन करी ।
रागिणी राग मधुर सुर कंठ कोकिळापरी ।
एक सिंगळ देशींचा मृग अति सकुमार अंश ईश्वरी ।
तिचें गायनास्तव नित्य भुलून ऐकाया येतसे घरीं ।
दररोज मुखांतून लाल लागला उभरू ॥
कोणी विरळा एकादा राहील संभाळून अबरू ।
इष्काचे पायीं सजण मारिला गबरू ॥ २ ॥
एक लाल पृथ्वीचें मोल असे जन म्हणती ।
दोन विकले त्यांतुन नाहीं पैक्याला गणती ।
पति यावा सुखाचा म्हणून करितसे खन्ती ।
वाट पाहतां पंचीप्राण लागले तणती ।
बारा वर्षांची मोहिम शिपाई आले खजिना भरून ।
तिथें नाहीं झोपडी महाल पाहतां नेत्र गेले फिरून ।
इनें कुठून मिळविला पैका वाटतें बदकर्मी दे शिरून ।
चला पाहूं चरित्र कसें, राहिला आधीं मनामधें धरून ।
ही निर्मळ मनची केवळ सुखाचा आगरू ॥
कोणी विरळा एकादा राहील संभाळून अबरू ।
इष्काचे पायीं सजण मारिला गबरू ॥ ३ ॥
पति आले हर्ष अंतरीं पाहून जीव रिझला ।
उपचार सकळ साहित्य प्रीतीनें पुजिला ।

माझी विनंती ऐका नित्यनेम आहे मजला ।
घ्या क्षणभर निद्रा ह्मणतां लटकच निजला ।
तिरकमान घेऊन उशा पाहतसे डोळा ।
नारीनें विणा घेऊन गातसे चरित्र वर्णून हरीच्या लीला ।
तो मृग आला ऐकाया नित्याची धरून आपली वेळा ।
पायांचे साज लव्हाळले वाजल्या फरसबंदीच्या शिळा ।
किचकिल्यांतून सोडिला जसा वाघरू ॥
कोणी विरळा एकादा राहिल संभाळून अबरू ।
इषकाचे पायीं सजण मारिला गबरू ॥ ४ ॥

हृदयांत भेदला बाण जिव्हारीं लइसा ।
मूर्च्छागत पडला, लाल मुखामधीं फेसा ।
नारी गायन पुरतें कर बोलिला ऐसा ।
मग सुखी मी जाइन निजधामा कैलासा ।
गायन ऐकून प्राण सोडिला इच्छा धरून ।
धड मृगावर टाकितां नार उभयतां गेलें मरून ।
विठू परशराम येसूचें तोड अति गोड रसिक रंग भरून ।
रामकृष्ण रामाचे छंद ऐकती चतुर जिवीं धरून ।
वावी नांव गांव धनवटांत आडा जबरू ।
कोणी विरळा एकादा राहील संभाळून अबरू ।
इषकाचे पायीं सजण मारिला गबरू ॥ ५ ॥

## लावणी १७ वी.

मला लेकरूं झालें मी बाळांतीण दो महिन्यांची ।
कांहो स्वामी जलदी करतां सजपाशीं निजण्याची । शिवापूरकर
मोत्याच्या झालरा कळस तुझ्या न्हाणाच्या मखरा ।
उभी राहून लाजून बोलसी, किती करशील नखरा ॥ ध्रु० ॥
वय नाहीं पण न्हाण आलें तुज रंग गोरा भुरका ।
अटकर बांधा लहान खुजी भुई वर शालुचा बुरखा ।
पाई पैंजण वाजती चालशी हंसगती झरका ।
अलंकार नग मंडित भवतीं सख्यांचा गरका ।
चाल ॥ शिरीं बांधुन मुडुल्या फुलांचे झोक ।
हिरवें पातळ भरजरी पदरी जरी झोक ।
तबकीं पानें गंगेरी विड्यांवर शोक ।
रंग रूप अनुकुळ सखे तूं पूजिलें शिव शंकरा ।
मोत्याच्या झालरा कळस तुझ्या न्हाणाच्या मखरा ।
उभी राहून लाजून बोलसी, किती करशील नखरा ॥ १ ॥
भर ज्वानीमधें धुंद धुंद दोन्ही जोबन वर चढले ।
कुरळ केस मोकळे सडक तुझे पाठीवर पडले ।
बाजुबंद बाहुल्या चुडे हातीं गुजराथी घडले ।
लेऊन चंदन उटी आंतून गोरेपण निवडलें ।
झुलझुळीनें उठलें नाकीं नथ जडाव ।

दिवसनदिवस तुझ्या भरजानीचा चढाव ।
स्वर ऐकुनया कोकिळा घेती वनीं थडाव ।
जवळ कस्तुरी असून भटकती मृग सोडून अखरा ।
मोत्याच्या झालरा कळस तुझ्या न्हाणाच्या मखरा ।
उभी राहून लाजून बोलसी, किती करशील नखरा ॥ २ ॥
पडदणीस पितांबर आणवा अबरूच्या गतीं ।
उर झांकून न्हायाला बससी चौरंगा वर्ती ।
चौभोताली थाट सख्यांचा नादिससी पुर्ती ।
सौभाग्याचें मंडण मळवट कुंकानें भरती ।
वर अक्षता टाकिती येऊन चढोवढी ।
कटी बारीक अति नाजुक फुलांची छडी ।
घे अशीर्वाद होय पुत्रवंती तातडी ।
ओटी भरणाचा गजर पुढें आहे, द्रव्याचा विखरा ।
मोत्याच्या झालरा कळस तुझ्या न्हाणाच्या मखरा ।
उभी राहून लाजून बोलसी, किती करशील नखरा ॥ ३ ॥
चार दिवस सुख सोहोळे भोगून थाटानें सजली ।
भर नवतीची हवा सख्या घ्या आज तिसरे मजली ।
चौभोतालीं लाऊन समया मधें चमके बिजली ।
विषय सुखाची आवड उभयतां रत होऊन निजलीं ।
नामीं विठ्ठलचे छंद तऱ्हेतऱ्हेची भरण ।

उभी राहून लाजून बोलसी, किती करशील नखरा ॥ ४ ॥

### लावणी १८ वी.

चाल ॥ भूपाळी ॥ घनःशाम सुंदरा श्रीधरा अरुणोदय झाला ॥

आश्विन आला पालव मजला किती जीवा झुरशी ।
दिवस पांचवा ऋतु संपवून मग जा गुणराशी ॥ ध्रु० ॥
कवळी कांत सकुमार कळी फुल नाजुक साळींदी ।
वयासारखा जोडा तुह्माला बे बहार फंदी ।
पत्र आलें त्यावरून तयारी केली जीनबंदी ।
येईन बरोबर ह्मणलें राहूं घरीं कशी सरसुंदी ।
आश्विन आला पालव मजला मधीं आडवा दंदी ।
सर महिन्याची पाळी ठावकी माझीच मज संधी ।
॥ चाल ॥ अडचणीचा ऐसा प्रसंग । कसं करूं ।
वर्जितां होईल मनीं भंग । कसं करूं ।
हा विचार करी मशीं दंग । कसं करूं ॥
॥ चाल ॥ रत्न पोटींच्या पोटीं जिरतील दोषांच्या राशी ।
घेऊन मस्तकीं भोकून जातां विषयासी बरशी ।

शिवतां नये म्हणून [illegible]
बाहेर कशी येऊं लज्जित होऊन मनच्या मनीं फसलें ।
चौघांमधें नये सांगतां म्हणाल कीं रुसलें ।
ऋतुवंती कशी टाकून जातां काय तुम्हां दिसलें ।
व्हा शहाणे आज कंबर सोडा चार दिवस फसले ।
चाल ॥ मजपासून वेगळे निजाल । कसं करूं ।
रागांत येऊन मनीं खिजाल । कसं करूं
कीं परनारीवर रिझाल । कसं करूं ।
॥ चाल ॥ तीन दिवस कसे जातील येवढे निघून झुरझुरशी ।
कळवळे माझा प्राण तुम्हांस्तव लागली झुरझुरशी ॥
आजच आला पालव मजला किती जीवा झुरशी ।
दिवस पांचवा ऋतु संपादून मग जा गुणराशी ॥ २ ॥
प्राणसख्या मजविणा तुम्हाला कशी येईल निद्रा ।
विषयसुखाच्या आलमाऱ्या माझ्या तीवर तपे रुद्रा ।
कसा वैर साधिला विटाळें आज दैवीं भद्रा ।
सेवा करितें हृदयीं लाऊन तुमच्या पदीं मुद्रा ।
करीन भुमीवर शयन घालून खालीवर पदरा ।

॥ चाल ॥ पतीसंगमधें अंतर पडलें किती जीवा झुरशी ।
भिऊं नको वल्लभें स्वस्थ राहा वृथा खेद करशी ।
आजच आला पालव मजला किती जीवा झुरशी ।
दिवस पांचवा ऋतु संपावून मग जा गुणराशी ॥ ३ ॥
टवटवलें मुखवदन नारीचें दिन चवथ्या दिवशीं ।
उष्ण पाणी स्नानास आणविलें लावी अत्तर केशीं ।
चौरंगावर न्हाया बसली भोंताल्या दासी ।
तेल फुलेल गंध सुगंधी आधींच पती हौशी ।
न्हाऊन उठली साज करी पुढें ठेऊनया आरशी ।
अस्ताचळीं पावला गभस्ती मग झाली सरशी ।
॥ चाल ॥ तबकीं पानाचे पुडे । राजसा ।
खाली करून मुखामधें विडे । राजसा ।
ऋतु बहार नवती रंग चढे । राजसा ।
आंगसंग करी निसंग होऊन किती कवळून धरशी ।
नासी विठ्ठल परशरामाचे छंद ऐकुन झुरशी ।
आजच आला पालव मजला किती जिवा झुरशी ।
दिवस पांचवा ऋतु संपावून मग जा गुणराशी ॥ ४ ॥

चार दिवस अंतरलें सख्या तुमच्या सुखसंगा ॥ ध्रु० ॥
सरंजाम खुप कडी कट्टा सरपांगा घरची ।
काय तुम्हाला कमी खजिना सर्व महामूर खर्ची ।
सुतारनाल बाणाच्या कैच्या निशाण लगी जरीची ।
जरीपचेवा नैच्या झर झर अस्सल बेदरची ।
गंगे पार दिल्हे डेरे परस्थान मोहिम आहे दुरची ।
येईन बरोबर कृतनिश्चय इच्छा अंतरची
॥ चाल ॥ साधिला विटाळें वैर । कसें करूं ?
गेले उतरून बुणगे पैल । कसें करूं ?
झाली तोफखान्याची फेर । कसें करूं ?
द्यास्तव मन आड ना विहिर । कसें करूं ॥
॥ चाल ॥ शरीर कोमेलें चंद्र उतरला घाम आला आंगा ।
अर्जी करा तुम्ही मर्जी पाहून सख्याला सांगा ।
आजच झालें दुरशी कशी येऊं मधीं आडवी गंगा ।
चार दिवस अंतरलें सख्या तुमच्या सुखसंगा ॥ १ ॥
व्रत उद्यापन श्राद्ध लग्न प्रयाणें शुभ पाहणें ।
ऋतुस्नात स्त्री झाल्यावरती जाणती नर शाहाणे ।

[illegible] करून पाहण

॥ चाल ॥ दीपकाविण मंदिर जसें । कसें करूं ।
घरवाडा भयंकर दिसे । कसें करूं ।
लागलें प्रीतिचें पिसें । कसें करूं ।
झालें चंद्र चकोरा असे । कसें करूं ।
॥ चाल ॥ वियोग याचा न साहे पळभर काळिज दोभंगा ।
एक एक घडी युगा समान जाती ठाऊक श्रीरंगा ।
आजच झालें दुरशी कशी। येऊं मधी आडवी गंगा ।
चार दिवस अंतरलें सख्या तुमच्या सुखसंगा ॥ २ ॥
शाल दुशाल पलंगीं बिछाने तुम्ही आवरून ठेवा ।
अस्पर्शाचा स्पर्श होईल पुढें समया लावा ।
स्नानाविण नाहीं भोजन करितां उपहारी मेवा ।
झारी उदकाची शीतळ भरून दासीहातीं आणवा ।
चार दिवस अंतरलें आतां मी स्वामी पदी सेवा ।
झरझर जातील दिवस निघून तो पाहीन गुणी रावा ।
॥ चाल ॥ मृगाशी चुकली हरण । कसें करूं ।
पहानया पतीचे चरण । कसें करूं ।

आजच झालें दुरशी कशी येऊं मधीं आडवी गंगा ।
चार दिवस अंतरलें सख्या तुमच्या सुखसंगा ॥ ३ ॥

चवथे दिवशीं प्रातःकाळीं लगबगून उठली ।
गौर वर्ण तिची कांचन कांति जशी हवई सुटली ।
उंच मोलाचें तेल उदेलें सर्वांगीं उटली ।
कबरी भार शिरीं करून मोकळे विंचरून एकवटली ।
आणा पाणी स्नानाशीं सख्यांनो एकीपुढें एक झटली ।
सभोंतालीं थाट सख्यांचे खूण मुद्रा पटली
॥ चाल ॥ पडदणीस पितांबर निका । भरजरी ।
चवरंग मांडून नेटका । त्यापरी ।
फार उष्ण पाणी घालूं नका । मजवरी ।
तनु कोमल लागेल ढका । राहा दुरी ।
॥ चाल ॥ नूतन वस्त्र कटी कसून नेसली सरसाऊन भांगा ।
मुक्त लगट कंचुकी दाटली आली कमळन रंगा ।
आजच झालें दुरशी कशी येऊं मधीं आडवी गंगा ।
चार दिवस अंतरले सख्या तुमच्या सुखसंगा ॥ ४ ॥

आनंदमय चित्तवृत्ति होतसे हर्षयुक्त पोटीं ।
नार वाहनीं बसून येतसे सख्याच्या भेटी ।
चाल । केली काया वाचा पसून । पदपुजा ।
उभयता बोलती हासून । हितगुजा ।
निज अंकीं सख्याच्या बसून । करी सजा ।
नामी विठ्ठलचे छंद कसून । खुप हजा ॥
॥ चाल ॥ परशराम ह्मणे असाच असूंद्या आक्षई दिल चंगा ।
रामकृष्ण गुणी रामा कासार लाऊन ब्रिदत्तंगा ।
आजच झालें दुरशी कशी येऊं मधीं आडवी गंगा ॥
चार दिवस अंतरलें सख्या तुमच्या सुखसंगा ॥ ५ ॥

## लावणी २० वी.

॥ चाल ॥ नारिनें करून शृंगार गेली पाण्याशी ॥
बारवेतिरीं एक मूर्ति पाहिली खाशी ॥
होईना पुत्र फळ पोटीं लागली चिंता ।
अंतरीं नवस करी पाव लक्ष्मीकांता ॥ ध्रु० ॥
केलें भाकुळपणी सैवर माय बापांनीं ।

ती घडी आनंदाची हर्षल मनी ।
बांधिलें मखर बसविलें आंत नेऊनि ।
चार दिवस केला गजर वाद्यें लाऊनी ।
शकुनाचा आणिला आहेर माहेरच्यांनीं ।
पांचवे दिवशीं ओटी भरली सवाष्णिनीं ।
गेल्या आपल्या घरोघर, ' पुत्रवंती होय ' म्हणूनि ।
त्या दिवशीं दोष लाविला मला न कळतां ।
घर बंधन केलें ताही पडली भ्रांता ।
होईना पुत्र फळ पोटीं लागली चिंता ।
असरी नवस करी पाव लक्ष्मीकांता ।
होईना० ॥ १ ॥
उभयतां सुख शेजेचें मला रंग महालीं ।
विषयांत मगन अशीं वर्षें पांच सहा झालीं ।
माझ्या बरोबरीच्या पोरी त्यांशीं लेकुरें झालीं ।
म्यां काय तरी देवाची चोरी केली ।
जों पूर्वजन्मीं नवतीं फळें वाहिलीं ।
म्हणूनि वांझ म्हणतां जगाची बोली ।

[illegible]
कोणी वैद्य घुमारा पहा बाई असल पुरता ।
होय कष्टी तिथवर चाल मजकरीतां ।
होईना पुत्र फळ पोटीं लागली चिंता ।
अंतरीं नवस करी पाव लक्ष्मीकांता ॥ २ ॥
गेली सुपहलविच्या घरीं दो चव दिवसां ।
ती ह्मणे उद कापुर घेऊन ये थोडासा ।
जाई बाई तुज खर्च पडूं देणार नाहीं लईसा ।
एक सगळी सुपारी लागेल पाउड पैसा ।
विड्याचीं पानें शंभर लवंगा तीन विसा ।
वीस केळीं जायफळ खारका लईसा ।
कोरी धागर भर राव्हाळें रुपया ठेवा वरता ।
मज आशा नाहीं पुळ तांदुळ निवदा पुरता ।
होईना पुत्र फळ पोटीं लागली चिंता ।
अंतरीं नवस करी पाव लक्ष्मीकांता ॥ २ ॥
सवा हात रुमालावर चऊक भरविला ।
आच्छेर तुपाचा दीप लाविला ।

कडकडून आले घर भरोनी ।
तो घुमूं लागले हातीं आंगारा दिला ।
जाई बाई जाय मनीं भाव धर पुरता ।
चोळी पातळ नेसीव महिना पांचवा सरता ।
होईना पुत्र फळ पोटीं लागली चिंता ॥ ४ ॥

## लावणी २१ वी.

पुरे पुरेरे वारंवार छळना माझी ।
सखे मी भोळी कशी करावी विष्कबाजी ॥ सगनभाऊ
पोट पिकेना ह्मणून बांधिले मोराभर गंडे ।
बाई मी दुःखी फार घोर जीवा वाऱ्यावर हिंडे । ध्रु०॥
आधींच वर बिजवर पतीला हिणवर मी झालें ।
सर्व सुख अनुकूळ न्हाण बिन दिवसाविण आलें ।
आज पावेल हरी उद्यां पावेल अशीं वर्षे सात न्हालें ।
उदास झालें मन माझें मी कर्महीन ठाले
। चाल । पती भोळा शंकर जैसा । मजवरी प्रीत करी लईसा ।
घडोघडी देऊन दिलासा । खर्चुनिया महामुरसा पैसा ।
कोणी दोष लाविला असेलगे । ह्मणून मनांत मी भ्यालें ।

मज बरोबरीच्या पोरी । त्यांशीं कसा पावला हरी ।
पुत्रवंत्या घरोघरीं । उभारती विजयध्वज झेंडे ।
पोट पिकेल म्हणून बांधिले भाराभर गंडे ।
बाई मी दुःखी फार घोर जिवा वाऱ्यावर हिंडे ॥ १ ॥
फळ पुष्पाविण झाड नसे नाहीं सुख संसारीं येऊन ।
असें वाटतें सख्या मरावें पुडी जहराची खाऊन ।
वेरुळांत वैनगंगा उभयतां आलों जोडयानें न्हाऊन ।
करूं नये ते उपाय केले अधिक तस्तिसाहून ।
॥ चाल ॥ सुप हलव्या देव देव्हारे । घुमविले आणून घुमारे ॥
पंचरंगी रेशीम कोरें । ठाईं ठाईं बांधिले दोरे ।
केली कचेश्वरी सेवा । एक संतत सहा महिने ।
तुळजापुर माहुरचें । सांगाती खडतर ठाणें ।
तिशीं म्यां वाहू केलें । जरी चोळी पातळ पंचामृत हें वाणें ।
माळें उलटून माघारी केलें । कोलापुरी देणें ।
॥ चाल ॥ महादेवी वाहिली गुढी । तेथून आलें जेजुरवाडी ।
पुढें कानहोबाची मढी । चळ भरला झालें मी वेडी ।

सर्वांगा डोळे पाहून [illegible]
एक लेकरा वांचून पक्षी निढाळ वृक्षावरी ।
नागबळ नारायणबळी केलीं जाऊन त्रिंबकेश्वरीं ।
हरीहरेश्वर भीमाशंकर पुजिला ब्रह्मगिरी ।
॥ चाल ॥ कोंकणची वजराबाई । महालक्ष्मी आणि नवलाई ।
वाळकेश्वर ममादेवी । स्वकष्टी पाहिली पाई ।
जाहाजांत बैसुनिया । बाई द्वारकेस गेलें ।
घेतल्या तप्त मुद्रा । पुढें गोमतीस आलें ।
डाकुरांत डाकुरजी । पुष्कर तिर्थी मी न्हालें ।
आलें गोकुळ मथुरा क्षेत्री । हरीद्वारीं मन धालें ।
तळीं मुक्तेश्वर तो नीट । रामघाट सोमरघाट ।
ब्रह्मवर्त चित्रकोट । पुढें प्रयाग काशी नीट ।
विश्वनाथ केली गया अयोध्या वैराग्यपण दंडे ।
पोट पिकेना ह्मणून बांधिले भाराभर गंडे ।
बाई मी दुःखी फार० ॥ ३ ॥
बद्रिकेदार बद्रिनारायण केली कपिलगंगा ।
कपिलेश्वर पाहिला कलकत्ता झीज साहून आंगा ।

जगन्नाथीं चढविल्या हंड्या दोष जाती भंगा ।
सोमनाथ सोरट चापुनी कसत लाऊन संगा ।
नागनाथा वैजनाथा । पाइ पुजून ठेविला माथा ।
एक बाळक व्हावें या अर्थी । परदेश घेतला माथा ।
गिरीवरी व्यंकटेशा । मनीं भाव धरून नमिलें ।
लालची धनाचा तो । त्याशीं धन वाहूं केलें ।
नाहीं बायकांशीं दर्शन । स्वामी कार्तिकी जन बोले ।
सेतुरातिळीं राहून मनच्या मनीं नवशिलें ।
येऊन पंपा सरोवरीं । श्रीरंगपट्टण कावेरी ।
मलकार्जुन रामेश्वरीं । पाहून बारा मल्हारी ।
पंचवटीमधें गुंफा पाहिली रामाचीं कुंडें ।
पोट पिकेना। ह्मणून बांधिले भाराभर गंडे ।
बाई मी दुःखी फार० ॥४॥
सप्तशृंग तापी ही नर्मदा उज्जनी क्षिप्रातिरीं ।
महांकाळेश्वर करून परतलें मन माझें हावभरी ।
ओंकार मांधाता अराधून तिर्थें केलीं सारीं ।
राक्षस भुवनीं शनी पुजून मग आलें पंढरपुरीं ।
आधीं चंद्रभागा न्हाऊन । भेट पुंडलिकाची घेऊन ।
उभी गरूड पारीं राहून । सावळा अंतरीं ध्याऊन ।
ठेविला भाळ चरणीं । भेटलें विठ्ठलाशीं ।

फळ प्रसाद घेऊनया । घरीं आले विश्वासी ।
पावला देव मजला । झाले बाळग नवमासीं ।
त्या सुखाशीं काय वाणूं । पती केवळ गुणराशी ।
देवाची अशी मी गंडे । लेंकरू घेऊनया कडे ।
प्रीतीनें उभी पतीपुढें । जन्म जुग नावो चढे ।
विठु परशराम ह्मणे पुसत नाहीं मालाचे हंडे ।
पोट पिकेना ह्मणुन बांधिले भाराभर गंडे ।
बाई०———॥ १ ॥

## लावणी २२ वी.

चाल ॥ शिव शिव शिव शिव काय विषय हा देवपुजा करितां करितां ॥
पितांबर तरी सोडून ठेवा छी छी कवळुन कां धरितां ॥
गर्भ राहिला मला आतां बाई हरला अवघा शीण ।
जन्मीं आल्याचें सार्थक झालें फिटलें वांझपण ॥ ध्रु० ॥
तपीं राज्य बाई कष्टीं फळ असें बोलती अवघेजण ।
प्रचिती आले माझें मजला ग्वाही देतें मन ।
पहिल्यानें मशी गर्भ राहिला नकळे अंतर खुण ।
मळमळ सुटली भवभव करी आंगीं थरथरलें जोबन ।
चाल ॥ गर्भाची छाया पडली । जाणवतीं चिन्हें पुढलीं ।
सर्वांगीं लाली चढली । तंग चोळी आंगांत गढली ।
मी अनाड कांहीं कळेना गे येथें । देह जड पडली भ्रांति ।

लेकुरवाळ्या पुरख्या गे ये । त्यांशीं पुसलें एकांतीं ।
त्यांनीं निज गुज सांगितलें गे ये । मग झाली मन शांति ।
वाटला हर्ष अंतरीं । एक मास लोटल्यावरी ।
पती मला पोटाशीं धरी । गर्भिण झालें मी खरी ।
भाग्योदय झाला मज वाटे कोटी गवसलें धन ।
गर्भ राहिला मला आतां बाई हरला अवघा शीण ।
जन्मीं० ॥ १ ॥

दुसऱ्या तिसऱ्या चवथ्या मासीं आली गर्भिणीची कळा ।
कसळ लागलें फिरूं पोटामधें करी कांति झळझळा ।
घडी मोडून दिली हातीं नेसाया भरजरी सोनसळा ।
चाल ॥ होत डोहोळे पती मज पुरवी हात घालुनिया गळा ।
ओलें नारळ फणस केळें । दाळिंबें द्राक्षें ढवळे ।
घोस खिरण्या खजुरा पिवळे । अंजीर आणि आंबे आंवळे ।
चाल ॥ रामफळें सिताफळें गे ये । जांभुळें जांब बोरें ।
सोळवंड्या ब्राह्मणाशीं गे । दिले हारे भरून कोरे ।
उटी चंदन मैलागिरीचें ग । दिसे आंतून आंग गोरें ।
चाल ॥ असे विलास नानापरी । डोहोळेजेवण घरोघरीं ।
या बाळपणाच्या नारी । मज रमविती मंजुळ स्वरीं ।
हिरवें पातळ खण अंजिरी ओटी भरली प्रीतीनें ।
गर्भ राहिला मला आतां बाई हरला अवघा शिण ।
जन्मीं० ॥ २ ॥

महिना पांचवा साहावा सातवा सरतां सरतां गडे ।
उठतां बसतां संकट मज पडलें सांकडें ।
डब डब घामें होतो उबारा चैन जरा ना पडे ।
ऐन उन्हाळा पडदे चिकाचे झुरक्याला चहूंकडें ।
चाल ॥ आंत बाहेर फिरतां महालीं । शरीराची होते महाली ।
अन्नाची शिसारी आली । काया अगदींच पिंगट झाली ।
चाल ॥ घरधन्यास कळ पडे ना गे । घडोघडी जवळ येऊन
कुरवाळी वदन माझें गे । बाई मुखास मुख लाऊन ।
ठाईं ठाईं चोपाळे गादिले । हलक्यामधीं गोवून ।
आवडेल त्यावरी निजणें । घरीं वाळ्याचें विंझणें ।
दिस नख बोटीं मोजणें । हलवितां मधुर चांदणें ।
मधुर घालिती वारा मजवर दासी चहूंकुन ।
गर्भ राहिला मला आतां बाई हरला अवघा शिण ।
जन्मी० ॥ २ ॥
आठवा सरून नवव्याची अर्धी घडीना घडी लोटली ।
अटकर बांधा लहान गर्भ मुस पोटामधें दाटली ।
पार पडन मी कधीं पतीला अशी चिंता वाटली ।
सर्व आंगीं वेदना गांठ बाई कंचुकीची सुटली ।
चाल ॥ विंचाहून अधिक कळा । कळलें आली प्रसूत वेळा ।
केल्या शाहाण्या चतुरा गोळा । त्या कळा जाणती कुशळा ।

मशीं नका घाबर करूं । जीव जाती कसंग बाई करूं ।
बत्तीस लक्षणी बाळ जन्मले न लागतां एक क्षण ।
गर्भ राहिला मला आतां बाई हरला अवघा शिण ।
जन्मी ॥ ४ ॥
आला प्रेमाचा पान्हा मजला मुख पाहूंद्या आधीं ।
वाजंत्री वाजतील वाजूंया पूर्वापरी ज्याविधी ।
सभोंताल्या उभ्या बायका नमस्कार करी पदीं ।
नारळानें भरी ओटया साकरा घालून मुखामधीं ।
चाल ॥ शेक शेगडया बिछित न्हालें ।
बाराव्ळी सुखाशीं झालें ।
पती पुढें लेकरूं नेलें । आनंद पाहून मन धालें ।
चाल ॥ भरजरी आंगडें कुंचडें गे । लखलखीत प्रभा पडली
जडिताचें बाळलेणें गे नेई । पिंपळपानें घडली ।
रंगीत पाळण्याला गे । रावे मोरें जडलीं ।
चाल । पावला असा हरी । नामीं विठ्ठल हात शिरीं ।
यमाचा पटका जरी । गुण परशराम छंद करी ।

## लावणी २३ वी.

॥ चाल अनुष्टुप ॥

नव नवसाचें बाळ एक दिलें ईश्वरें ।
नाहीं समाधान त्याशीं बाई पाहिलें करून घुमारे ॥ ध्रु० ॥
मी बारावर्षें एक ठोक न्हालें आधीं ।
जीव सुजला माझाबाई नाहीं बाळक झालें कधीं ।
कर दुसरी बायको जन म्हणती दुर्बुद्धि ।
पति भोळा शंकर जैसा नाहीं मनास आणिलें कधीं ।
कडू खातां गोड आलें मी गर्भिण झालें तधीं ।
उंच शेलारी हिरवी दिली नेसाया जधीं ।
होती नानापरीचे डोहोळे काय कमी घरीं नवनिधी ।
एक वाघिणीचें दूध नाहीं मग भरल्या अष्टसिद्धी ।
असे सुकळाशीनें नवमास झाले पुरे ।
आली प्रसूत वेळा बाई जन्मलें मूल गोजरें ।
नव नवशाचें बाळ एक दिलें ईश्वरें ॥ १ ॥
गेले बाराबळी पाळणा तेरावे दिवशीं ।

रंगीत आणवला बाई मग हर्ष माईना मशी ।
वर नक्षीचा चांदवा काढून बांधून नरवशी ।
सोनेरी खेळण्या मोहरे जन बोलती अशी ।
अशी पर केली पाहण्या घरधनी फार हौशी ।
दिल्या काढून साडया चोळ्या हेलकरणी झाल्या खुशी ।
बाळ आंगडें लेणें लुगडें पैक्याची रवीर अशी ।
आला वडील सासरा पोटीं मी जेठी सून मज कुशीं ।
राजरानें त्यां नांव ठेविलें गेलें रुकाथुका दूर देशीं ।
एक्यापोरानें घर भरलें जणूंकीं आंगण सारें ।
दिसें मासें लागलें रांगूं आंगण त्याशी नापुरे ।
नवनवशाचें एक बाळ दिलें ईश्वरें ॥ २ ॥
पाईं पैंजण तोडे घडविले ।

पानसाकळ्या हसळ्या पुतळ्या मधीं वाघनखें मढविलें ।
आणून जरीची टोपी त्यावरी जाळी काढविली ।
पाईं पैंजण तोढे घालून राव्यापरी पढविले ।
होती हौस मनामध्यें बाई कल्पना तितकी उडविली ।
लेकाची माय ह्मणती घडी आनंदाची वाढविली ।
झाली एकाएकी झडप डोळे लाऊन तनु झडपिलें ।
जीव ज्याहलाग माझा बाई सुटलें उभें मन वारें ।
दर्षीनें कलकून उलटी त्या पाषाणाचे चिरे ।
नवसवशाचें बाळ० ॥ ३ ॥

दावलमलकी पाव मला नको करूं छळन ।
नळदुर्गी खंडोबासाठी घालीन भंडाराचें दळण ।
जाखाया जोखाया जाणें जोशा पुसले होरे ।
नवसाचे डोंगर झाले अजून पुरेना धुरे ।
नवा नवशाचें बाळ एक दिलें ईश्वरें ॥ ४ ॥
केले वैद्यवाणी बाई पंचाक्षरी जमविले ।
सुप हलविले देव देव्हारी घुमारे आणून घुमविले ।
त्यांनी घालून अत्याबाई देवाशी नमविलें ।
कांहीं गुणाशी येईना बाई धाव दवडी दवडिले ।
म्यां हिय्या मनाचा केला जाऊं पंढरीस नमिलें ।
कडकडीत घडींत गुण आला त्याचें पाईंच सत्त रमलें ।
नामीं विठ्ठलचे छंद बुंदराचीत चिताचे श्रमविलें ।
नाती परशराम येसू महादू विष्की पुरे ।
काव्याचे ढवळे झाले गायाचे पुरले धुरे ।
नव नवशाचें बाळ एक दिलें ईश्वरें ॥ ५ ॥

## लावणी २४ वी.

॥ चाल ॥ भुपाळी ॥

घर घेण्या बेढंग्या रांडा कलीच्या बेचाली ।
भरेल एखादी गर्मी राजसा नको पडूं या ख्यालीं ॥ ध्रु० ॥
जशी हत्तीची छाया धुंद कैफांत सडक राहाती ।
तशाच नवऱ्या निर्संग होऊन शहरांमध्यें फिरती ।
सहज नटून रस्त्यानें चालतां उर उघडी छाती ।
बटकी दासी कसबिणी बऱ्या त्याहून चळख्या गरती ।
एक सारख्या झुंडी जमवून पाणोथ्या जाती ।
बोल नये तें विचकट बोलुनी संग पाणी भरती ।
घरधन्यास घरीं राखण ठेऊन परद्वारें करिती ।
हीच कमाई रोकडी+डी शह पती वरती ।
तुम्ही छेल छबिले देखण्यांत बुघडा ।
भाळून तुम्हावर गळें घालिती झडा ।
तुम्ही आधींच चंचळ माझे मजला धडा ।
विषय विडा देऊन भुलवितील लढवून हरकिली ।
घर घेण्या बेढंग्या रांडा कलीच्या बेचाली ।
भरेल एखादी गर्मी राजसा नको पडूं या ख्यालीं ॥ १ ॥
आधींच वाडस त्यामध्यें हकीम इंग्रेजी खाशी ।
खुषी किंवा गैरखुषी असा हा कौल नामकाशीं ।

कवळी किरळी नवती तुमची पहिली पंचविशी ।
तेव्हां झोंबल गर्मी राजसा यमाचे फाशीं ।
परनार विषाची पुडी बळेंच तुम्ही घ्याल ।
मग घेऊं नये तें भलतेंच औषध घ्याल ।
मग प्राण अवस्था होतील हालाचे बेहाल ।
काय असून धन महाल तुम्हास्तव दु:खास कोणी वाली ।
घर घेण्या बेढंग्या रांडा कलीच्या बेचाली ।
भरेल पस्तावी गर्मी राजसा नको पडूं या ख्यालीं ॥ २ ॥
भरल आपल्या पदरचा पैसा खर्चून जगांत भंडवाडा ।
हेंच सांगतें बदकर्माला आजपून हात जोडा ।
बेडी वाकडी बरी वाईट घरीं लग्नाचा जोडा ।
जें जें तुमच्या मनांत असेल तशी हौस फेडा ।
करून पांची पोषाख आंगावरल्या कंठी तोडा ।
स्वारीशीं घरीं आक्षई बांधा ठाणबंदी घोडा ।
नांवगांव वडिलांचा लौकिक चिरेबंदी वाडा ।
धन दौलत ही महामूर भरली चार पिढ्या मांडा ।

नाहीं तरी एक नाटकशाळा ठेवा घरीं ।
देखण्यांत जैशी इंद्राघरची परी ।
राव चोपाळ्यावर बसून लावा झरझरी ।
शिरीं पेंच मंदिल तुरा ह्या तुम्ही माझे वाली ।
घरघेण्या बेढंग्या रांडा कलीच्या बेचाली ।
भरेल एखादी गर्मी राजसा नको पडूं या ख्यालीं ॥ ३ ॥
परायाची परनार परी ती पत्रावळ उष्टी ।
काय नफा संग करून मूर्खपण खडकावर सृष्टी ।
हीच विनंती तुम्हा सांगतें पहा कृपादृष्टी ।
तुमच्यामें मी सफळ राजसा मज भरली सृष्टी ।
पाणी घालतां कोंभ निघाले लावावयाचे कष्टी ।
करून सर्व शृंगार नेसली जरी पातळ आष्टी ।
दिलें वचन फांकडे खुषीनें नको होऊं कष्टी ।
एक चित्तीं उभयतां भोगिली मग चंपाषष्ठी ।
नामीं विठ्ठल कवीची पाया शुद्ध हातवटी ।
कवी उत्तम पद्याला त्याजपुढें चावटी ।
नावी नांधगांव जराजाहिर आहे धनवटी ।
परशराम सेसूचे छंद हेगाची सुरताली ।
घरघेण्या बेढंग्या रांडा कलीच्या बेचाली ।
भरेल एखादी गर्मी राजसा नको पडूं या ख्यालीं ॥ ४ ॥

## लावणी २५ वी.

॥ चाल ॥ अमदाबादेमधें एक नार मोहनाराणी ।
प्रीत दोहींची कशी घ्या ऐकुनी ।
अजब शहर गुलजार । बटाव दिलीचे राहणार ।
अमदाबादेमधें एक नार मोहनाराणी ।
प्रीत दोहींची कशी घ्या ऐकुनी । ध्रु० ॥
पुत्र एकुलता एक मायबापाचा ।
बटाव रहिवाशी दिलीचा भोगी सोहळा सुखसंपत्तीचा ।
मोतीवाला ।
स्वरूप दिसतें सीतेचें वर किंवा पौर्णिमेचा चंद्र ।
काय अमीर कीं सरदार शिपाई बनला ।
रुसून मायबापाचे वर झाला घोड्यावरती स्वार चालला ।
मिधून देशावर मुलुख पाह्याला ।
वेळ दोनप्रहरची होतां तृषा लागली अवचिता ।
अमदाबादेचा पानोथा पुढें लक्षिला ।
प्रीत दोहींची कशी घ्या ऐकुनी० ॥ १ ॥
छाया वृक्षाची निर्मळ । अमदाबाद पानोथा स्थळ ।
घोड्यासुद्धां त्यानें जळ प्राशिलें जेव्हां ।
तिथें सावकाराची सून मोहना नांव तिचें मुखरण ।

चाल ॥ बारा वर्षांमधें नूतन जशी देवांगना ।

चांगुलपण वर्णावें किती ? । प्रवाशी गेले तिचे पति ।
घागर घेऊनी गजगती जातसे जीवना ।
वृक्षातळीं राजकुमर । अवचित दृष्टि गेली त्यावर ।
वेधलें नारीचें अंतर । लागलें ध्यानीं ।
प्रीत दोहींची कशी घ्या ऐकुनी० ॥ २ ॥
ही नार ती सख्या संगाती जी तयाशीं बोले मंजुळवाणी ।
तुम्ही जा मी येतें मागुन धुऊनया चोळी ।
किंचित हासे लाजून पदर मुखाशीं लाऊन बोले मंद मंद भाषण ।
तेव्हां वेला लवली । करकरा ओठ जशी करपि तयाशी ।
चिंतातुर मानसीं उभी राहून आड बाजूशीं ।
मुशाफर न्याहाळी ।
प्रीत दोहींची कशी घ्या ऐकुनी० ॥ ३ ॥
प्रवासाहून आले तिचे पति । ढाल फिरंग घेऊन हातीं ।
तुम्ही राव कोणाचे पति ? । पुसा मोहनासीं ।
मोहना म्हणे पुत्र मामाचा पाहुणा आला दो दिवसांचा ।
मारला हात फिरंगाचा बटाबाशी ।
चंदन काष्ठ गोळा करून मोतीबागेमधें जाऊन ।
दिला अग्न लाऊन तया स्थानीं ।
मोहीना बसून मोठ्यावर शृंगार पुरुषाचा करून ।

हा बटाव ह्मणे अंतरीं येऊन बागाशी ।
गाळी प्रदान तत्क्षणीं उडी टाकली जाऊनि ।
विष्कापायीं गेलों मरूनि । किती एक प्राणी ।
विठ्ठल परशराम नित्य जडी । जैशा मोत्याच्या लडी ।
छंद करी अर्थ पाहूनि । प्रीत दोहींची कशी घ्या ऐकुनी ॥ ४॥

लावणी २६ वी.

चाल ॥ आलाहो वनवास पति गेला नवतीचा गंडे चहाणारा ॥
आतां समजलें राजा भर्तृहरी भरतपुरचा राहणारा ॥

सगनभाऊ

पुत्र असावा सुपुत्र ज्याचे जन काहो अवघे गुण घेती ।
काय कामाचे दहा वीस असूनि अभिमानामधें धूळ माती ॥ध्रु०॥
सूर्यवंशी राम जसले गेले लंकेवर फक्त सडे ।
कुंभकर्ण रावण अभिमानें पहा दृष्टीनें केले झगडे ।
गांधारीस आंगद झाले वानर असतां वय केवढें ।
सभामंडप घेऊनि उडाले कैरवनासे होते थोडे ।
धन्य भाग्य कुंतीचें उदरीं धर्म भीम अर्जुन गाढे ।
काय कामाचे गांधारीचे एकोत्तरशाचे केले रगडे ।
पुत्र असावा सुपुत्र ज्याचे० ॥ १ ॥
पतिव्रता अंजनीस झाले हनुमंत महासायासीं ।
लक्ष्मणाला शक्ति लागल्या आणिलें द्रोणागिरीसीं ।

भगिरथानें गंगा वळली उद्धरिले पूर्वजांशी ।
साठ हजार होते संग्रामीं असून नसून काय अपेशी ।
पांडवांनीं आगळी भक्ति वेंचुन केली आपल्याशी ।
एकोत्तरशे किचक मारले वेताऱ्या मोड जशी ॥
पुत्र असावा सु० ॥ २ ॥
वसुदेव देवकीस झाले श्री कृष्ण एक निधान ।
छप्पन्न कोटी यादव होते आपसामधीं मेले कटून ।
वैनतेचा पुत्र गरुड हरी चरणीं झाला लीन ।
पांच पुत्र होते भीमकाला रुक्म्यानें केला अभिमान ।
पुत्र अ० ॥ ३ ॥

* * * * * * *

* * * * * * *

पुत्र असावा शुक स्वामीसारखा हरीला भजती अहो रात्रीं ।
निस्तुक नसता वंश बुडता तसा नसावा कुपात्री ।
विठ्ठल नामीं छंद गातो तोंड लाऊन कांहीं शास्त्रीं ।
परशरामाचे अजब भिराके अशा फुकण्या(ल्या)सोजाव्या किती ।
पुत्र असावा सुपुत्र ज्याचे जस कांहीं अवघे गुण० ॥ ४ ॥

### लावणी २७ वी.

अवघे यामिनी ॥ नगमे सुख शयनीं ॥ ध्रु० ॥
नूतन नवी नवती । शेवती पति टाकून सखी गेले ।

साझे जिवलग पति । दूर दूर जिवा वाटे ।
आलें कमळ रूतीं । तगमग जीव करितो बाई माशावाणी ।
नगमे सुख शयनीं । टाकून एकटे मी वनीं ।
पतीविण कशी कंठू । आवघे यामिनीं । न गमे सुख शयनीं॥१॥
धीर मशी धरवेना । अंत खेदीं फौजा दूर गेल्या घरीं येतील कथं ।
निष्ठुर मन केलें लागून पर बुद्धि । मोरापरी झुरती ।
वाहे नेत्रपाणी । नगमे सुख शयनीं ॥ २ ॥
भयाण घरवाडा दिसे मंदिर सुनें । पोटीं फळ कांहीं न
असतें तान्हें त्यावर जीव रिझतो । ऐसें साजर वाणे असे ।
मी नागवी सर्वस्वीं चहूंकडून । नगमे सुख शयनीं ॥३॥
चिंता नाहीं पडता । पावला तुज हरी तो दिवस सोन्याचा ।
आले प्रियकर घरीं विठ्ठल पदमुद्रा । सग हृदयीं धरी रे जनलोका
जाहिर जनीं लोका । परशराम येसू गुणी । नगमे सुख शयनी॥४॥

## लावणी २८ वी.

जमुनाके नीर तिर धेनु चरावे । नट चाळक गिरधारी ॥१॥
सुनो राधा प्यारी किने बजावी मुरली ।
राधाकिने बजायी मुरली ॥ धृ० ॥
वृंदावनको श्याम कन्हया । धुंडको गोकुल नगरी ॥ २ ॥
किने बजायी मुरली ॥ ३ ॥

विठु परशराम हरी गुण गावे, यशवंत छंद ललकारी ॥ ३ ॥
किने बजायी मुरली ॥ ३ ॥

## लावणी २९ वी.

ओतीव पुतळा सुवर्ण लाटा ॥
दृष्टीपुढें दिसे गोमटा ॥
जणू विषयासधीं भरला फाटा ॥
आला थरारून आंगाशीं कांटा ॥
प्राणसख्याचा महाल व्हाटा ॥
जागे धरा जा चहूकून वाटा ॥
एकांता मधीं जाऊनी गांठा ॥
समजाऊन आणला सदर ताठा ॥
अशा वस्तूचा बोभाटा ॥
करा निरुपण चतुर सुभटा ॥
घोर लागला झाले चिमटा हाणीन खंदील उरी बिजटा ॥ १ ॥
आसपास अधीं घेऊनी अडवा ॥
असला जवळ कोणी इजला धुडवा ॥
रायापरी जिवलगास पढवा ॥
कसाही याचा संग घडवा ॥
नेऊन तयाच्या चरणीं जडवा ॥

मला धीर धरवेना थडवा ॥
दृष्टी गदावा जरी ॥ २ ॥
कसल्या मर्धी केवळ विजवा ॥
अग्न लागली कोणी विझवा ॥
घेऊन या तो कसा रिझवा ॥
उभयता करू यासिग जवा ॥
टाल्यानें सोड दे जरी जवा ॥
रंग महालाचे झरुके बुजवा ॥
शेज फुलाची सुंदर सजवा ॥
केशरकस्तुरी चंदन उगवा ॥
प्राण प्रियकर घेईल उजवा ॥
विडे देईन सरकारी ॥ २ ॥
आसपास सख्याची पाळा ।
घेऊन आल्या पाहोन चतुर पाळा ॥
शृंगारामध्यें नटेच पाळा ॥
जाऊन विनविला त्यांणीं कृपाळा ॥
रंगमहाली बांधून चवपाळा ॥
चंपक वृक्ष जैसा पुष्पाला ॥
जशी राधाइ इच्छिती गोपाळा ॥
पूर्व पूण्य आला भाग्य कपाळा ॥

चंद्रभागे जैशा पुष्पमाळा ॥
आज घेईन सोन्याचा सुपला ॥
चरणीं ठेऊनी आज प्रीती पाळा ॥
कटी बंद विठ्ठलच पळा ॥
परशराम छेदकरी ॥ ४ ॥ ॥ ॥

## लावणी २० वी.

चाल॥चाहील तें घरीं दया हरीची लागेल तें पुरवीन बसल्या ॥
चटी पटी करी धुंद फुंद कर मौजा आवडेल तसल्या ॥
तूं क्षणभर ना दृष्टि पडशी मी डोळा अंधळा असल्या ॥
तुज सारख्या कोणी घरोघर नाहीं लाखा मधीं विरळा असल्या ॥
तुजला गडे उन बारा लागेल तूं आमची कोंडेल वाघीण ॥ ✓
जीव गेला तरी जाऊदे नारी केला नेम न कधीं डगन ॥१॥
बायकोस आवडवी दादया तूं सरशील सी सता निघन ॥
जीव गेला तरी जाऊ दे नारी केला नेमन कधीं डगन ॥ ध्रु० ॥
वेळा लवंगा चिकण सुपारी पान गंगेरी खाय विडे ॥
नागमोडी बांगडचा हातामधीं घाल करकरीत कुलपीचुडे ॥
असल पुण्याची तपकीर आणवीन तुजसाठीं बांधून पुडे ॥
रंगीत चौपट तुला खेळाया पठे पठे जान गडे ॥
तुज सैताली न मिळे कचेरी मला ठेंगणें दिसे गगन ॥ जी० ॥२॥

तव्हे वाजती अर्धीच खिलाडू नवऱ्याची गोष्टी ऐकून ।
मीस दुखण्याचें करून निजली पडदे लाविले मग चहूंकडून।
अर्धे रात्रीं लटकेंच मेली पंचप्राण धरले रोहकून ।
वर पंगू हळूहळू रडे मग शरीर तिचें धरिलें चहूंकडून ।
असी वस्तु जर भोगून द्यावी दिवस उगवल्या देऊ आगन ।
जी० ॥ ३ ॥
खरेच निघल काय सता म्हणूनियां थेट घेतली प्रेतकळा ।
तंव तो निजला झोंबू लागला नार उघडून पाहती डोळा ।
भला कीरे वचनाचा खंबीर भोगून घेशी सुखसोहळा ।
नामें विठ्ठल परशराम म्हणे हा सारिखा रीत मोळा ।
रामकृष्ण गुणी रसा गासो शाहीरकीमधीं सदा मगन ।
जी० ॥ ४ ॥

## लावणी २१ वी.

किती जिवाला खाशी म्हणशी मजसारखी दुसरी नाहीं ।
तुजहून चढी दुनयांत एखादी सहज तुला बांधील पाई ॥ ध्रु०॥
काळी बूस मोठाले थान दांत प्रतिमा फाळाची ।
पिचपिचडोळे त्यामधीं काजळ नकी नथणी पिळाची ।
तुझी झोपडी तिवाशाची दारीं छपरी कोळाची ।
चहूंकुन कुड सणकाड्यांचा आंतमध्यें खाट सुंवाटीमोळाची।

चार माचवे जुने किडखादी जाईन घडी पळाची ।
रहाट नवरा अक्षयी केला पुढें ठोकरी फेळाची ।
एका कणावर चोविस जातीं फिरविशील बसल्या ठायीं ।
तुजहून चढी दुनया० ॥१॥
पाय फेगडे खुळे हातामध्यें वेळा घालशील कुसरीच्या ।
जग भाळवणें पोरचाळवणें निंदा करशील दुसरीच्या ।
दोघी चवघी एकसारख्या गोडसुन्या जणू मिश्रीच्या ।
ठाके नवनीत नवे ठाकशी दाहीं बोटीं पोच्या ।
अशा रुपाला जो कोणी भाळेल कडू वृंदावन उसरीच्या ।
चौऱ्यांशीचा न चुके गरका दाढेंत पडल्या सुसरीच्या ।
नग लगद्याचा खोटा अगदीं खरें करून लोकां दावी ।
तुजहुन चढी दुनया० ॥ २ ॥
ठाकनवेणी तनवे ठाकशी दाहीं बोटीं घालून छल्ले ।
चळखून ठेवलें तुला फाकडे किती करशी हल्ले खिल्ले ।
अतिरथी पाताळीं घातलें असून सोन्याचे गड किल्ले ।
धनुष्यबाण वीरकंकण हातांत रात्रंदिवस चढवून पिल्ले ।
कौरवपांडव सुसंत आटले कैकांचे मनके ढिले ।
सनकसनंदन शुक वैशंपायन हेच निवडले रणाढिले ।
चौदा कल्प तुच्छ मानूती पेटी घेऊन बसले ठायीं ।

तुजहून चढी दुनया० ॥ ३ ॥
निर्गुण तेथें वंशनिवृत्ती प्रकृतीस पुसेल कोण ।
ह्मणून प्रकृती पायीं बांधली भेदावांचून काय गाणें ।
तांबेंपितळ कशास घेतां पुतळीचें टाकून सोनें ।
विठ्ठलनामें कवी धुरंधर दोअक्षरी भरी केणें ।
परशराम गुणी येसू गाती चतुर सुज्ञ जाणती खूण ।
रामकृष्ण गुणी रामा गाती पाहून आले शयना ठाईं ।
तुजहून चढी दुनयांत एखादी सहज तुला बांधील पाईं ॥ ४ ॥

## लावणी २२ वी.

चैत्र मास ऐन उन्हाळा चार कोस न मिळे वस्ती ।
कर्महीन त्या मार्गी निघाला श्रावण महिन्याची लहरी ।
अशा स्थळीं जर बारव पाणी प्यायला असती ।
कल्पिताच हौद पाण्याचे पाहिरा पुढें दिसती ।
इतका अचबा पाहूनशिणी कर्महीन होऊनी हासला ।
कल्पतरूच्या झाडाखालीं कर्महीन तो जाऊन बसला ॥ १ ॥
कल्पू नयेतें भलतेंच कल्पी आपल्या आपण सहजच फसला।
पाणी प्यायला आहे परंतु भोजनास असतें कांहीं ।
अकस्मात अन्नाचें करून पात्र आलें लवलाही ।
इच्छाभोजन केलें परंतु नरम बिछाना येथें नाहीं ।
अकस्मात छपर पलंग गाडे येऊन पडला त्या ठायीं ।

अशा पलंगी स्त्री भोगाया रूप रंभेहून सवाई ।
कवळी कळी मदनाची पुतळी भर ज्वानीमधीं मुसमुसला ।
कल्पतरूच्या० ॥ २ ॥
मनासारखें दिलें हरीनें धारजिणी झाली जागा ।
चौभोंतालीं रक्षपाळका स्वारी शिपायी गज पागा ।
असें म्हणतां पुढें फौज देखिली हुकूम आज्ञाला कांहीं सांगा ।
जिकडे तिकडे रथ अंबाऱ्या सुख संपत आली पागा ।
कुच करूनी जाऊं महालाशीं धन दौलत आली वगा ।
कर्मानें भ्रांतीस पाडिलें आणिक पुढें सुचला सल्ला ॥ क० ३ ॥
इतका आसबा पाहून मनीं भूतचेष्टा दिसती मजला ।
भूतच ह्मणतां भूतची झाली इतके पाहून गजबजला ।
खाऊन ह्मणतां खाऊन घेती यमादारी नवाजला ।
विठू परशरामाचे अर्थी दाखले परशराम पदवी दिली त्याला ॥
रामकृष्ण गुणी गोविंद रामा छंद करून गाती मजला ॥ क० ४ ॥

लावणी २२ वी.

तंग चोळी अंगीं बरवी । निसंग होऊन बेबखी ॥ ध्रु० ॥
भांग तुझें मैना पाही उभी शयना ।
दोही रस्त्यानें थाट भरली जशी कोंदण मुदीवर ।
कोमल कांती फुल सेवंती । रूप वारानें गरवरली ।
भांगामध्यें मती भरली ।

गेंद गुलाबी

बोल तुझ्या हृदीं ठसला । लाखांमध्यें निवडून निसला ।

कर मन वहाली रंगमहालीं । धन दौलत अर्पीन सगळी ।

तंग चोळी आंगीं बरवी । निसंग होऊन बेबरवी ॥ २ ॥

पाईं पोल्हारे चाले गजभार । पदर बेई सरसा करी चहूंकून ।

घोळ निऱ्यांचा धरी जवकून । सायंकाळीं तिसरे ताळीं आ-

रास करी दीप चहूंकून ।

बिसणीस बोले रोहोळून ।

सुखसंगाची इच्छा आमची साठ्यालाखल चर्वा ।

तंग चोळी आंगीं बरवी । निसंग होऊन बेबरवी ॥ ३ ॥

मंजुळ वाणी ऐकुन कानीं । चला म्हणे घरीं सुखसंगा ।

आळशावरी वळूंद्या गंगा । विठ्ठल धाता पिठल धाता ।

अक्षय असूंदे दिल चंगा । मज भोगशील सुखसंगा ।

परशराम गुणी रामा गातो निरगर्वी ।

सगुण सांवळी तनु झळाळी देखण्यांत नाजुक बरवी ।

तंग चोळी आंगीं बरवी । निसंग होऊन बेबरवी ॥ ४ ॥

## लावणी २४ वी.

कळा अचळ करतार धन्यता तार तार हरी ।
कौरवें गांजिलें हें दुःख अंतरीं ॥ ध्रु० ॥
कल्पवरी जे ऋषीजन ध्याती नकळे तुझा पार ।
सगरूपी तूं येऊन मजला तार ।
गदा घेऊन अनंता हो गरुडावरती स्वार ।
घन शत्रु वर्षती हे दुर्जन मार ।
नमस्कार मी करितें मजला तुझा आधार ।
चंचळ केले पांडव न धरती कोणी आधार ।
छपन कोटी यादवबंधु नमिळे तुजवीण थार ।
जगव्यापक तूं जगजीवन साधार ।
झडकरी झावनही सभा हासेल सारी ।
कौरवें गांजिलें हें दुःख अंतरीं ॥ १ ॥
एक विचार करून सुयोधन, आज्ञा करी सुता ।
टपकन द्रौपदी नग्न करा आतां ।
ठक पडकें अवघ्यास म्हणती हें ईश्वरसत्ता ।
डगडगली द्रौपदी धांव अनंता ।
ढळढळ नेत्रीं आश्रु वाहती समेसी विघ्न दिसता ।
न करकरी पावले गरुडा सहिता ।
तत्क्षण द्रौपदीस कळलें नाहीं भयचिंता ।

थरारले पांडव हरीशीं पाहतां ।
दयावंत भगवंत तेथें दुर्जन काय करी ।
कौरवें गांजिलें हें दुःख अंतरीं ॥ २ ॥
धन्य धन्य श्रीरंग अनंता होय श्रीरंगें ।
न नेसवी वस्त्रें हरी अंगें ।
पर्वत वस्त्राचे पडले शत्रु झाले दंग ।
फळ पूर्वी झाकले अंधऋषी ।
ब बळें नाहीं श्रीहरीचे अखंड अभंग ।
भ भक्ति पार केली अपंग ।
ममथुरेची साडी आणली जरी पिवळा रंग ।
ययेल नक्षीची चोळी वरी भिंग ।
रक्षी रक्षी श्रीधरा म्हणे पतिव्रता सुंदरी ।
कौरवें गांजिलें हें दुःख अंतरीं ॥ २ ॥
लक्षाचे लक्षा आणलीं प्रावर्ण ।
वैकुंठनाथ करी भगिनीस्तव प्रयत्न ।
ससपुऱ्यांचीं वस्त्रें आणलीं तयानें पूर्ण ।
खरें भासलें बुडालें गर्वानें ।
शेला नेसविला शंख चक्र वरी गदा पद्म खूण ।
ह हरी देखतां आले क्रोध मन ।
ळळळळीत जिव्हा उग्र सिंह ज्याचा जसा पीतवर्ण ।

क्ष क्षय जाळीन शेवटीं कौरवांशी जाण ।
ज्ञ नामीं विठ्ठल परशराम येसू गातो गाण्यापरी ।
कौरवें गांजिलें हें दुःख अंतरीं ॥ ४ ॥



प्रकरण चौथें.

# साध्या लावण्या.

## लावणी १ ली.

चाल॥ नट नाटक तूं छेलछबेला मतवाला अलबेली तऱ्हा॥
आगजाळ्या ह्या भोवत्या फिरती पहा गांठून नेती घरा॥
काय सुख वाणूं सख्याचें जणूं कलकन छाती फाटेल।
अंतरवेदी केल्या छावण्या आतां कधीं येऊन भेटेल ॥धृ०॥
हत्ती घोडे महालमाड्या रथ गाड्या दवलत भरली।
शिवाय जाहागीर छत्रपतीची जन्म जुगाजाईल पुरली।
हदरा वरती बदरा साजे बाजूवर छत्रें धरलीं।
ठाईं ठाईं बायका नेटक्या तहानभूक पाहतां हरली।
दिवाणखाने पुढें पिलखानि हौद पाण्याचे जिल्या आटल।
कचेरीस कारंजें उडती भले लोक भवतीं दाटल॥
काय सुख वाणूं सख्याचें जणूं कलकन छाती फाटेल।
अंतरवेदी केल्या छावण्या आतां कधीं येऊन भेटेल ॥ १ ॥
छपरपलंग झोपाळे साकळ्या चांदीचे लटकती हलके।
पडदे चिकाचे रंगित संगीत जणूं घट्टा काळीज कलके।

चौतर्फाला दिले तबेले कोतवाल ठाकण चलके ।
घरीं कमी तरी काय गिवंता रंगबाज बाजती हलके ।
सुंदरी यापरी निजमंदिरा इंद्रभुवनाशीं पटेल ।
प्रीतीमधें पर्वत पडला जिवा दुःखना कसें वाटेल ॥
काय सुख वाणूं सख्याचें जणूं कलकन छाती फाटेल ।
अंतरवेदी केल्या छावण्या आतां कधीं येऊन भेटेल ॥ २ ॥
पाह्याला पण एकच केलें किनखापानें छत मढलें ।
खणोखणीं तज़बिरा काढिल्या आंग्रेजी ऐने जडले ।
शाल दुशालें महालीं बिछायत मखमाली तक्के पडले ।
पानदान चौफुले सोनेरी साच्यामधें सजीव घडले ।
पारावारा सुखसंपत्तिला दुःख दर्यो जसा लोटेल ।
घडी एक पण जाते दुःखाची उभें साल कसें काटेल ॥
काय सुख वाणूं सख्याचें जणूं कलकन छाती फाटेल ।
अंतरवेदी केल्या छावण्या आतां कधीं येऊन भेटेल ॥ ३ ॥
कधीं येतील गुणनिधी सख्यांनो मला लिखवर न्याग ।
हरणाकाळजी फारच बाई मी मला दिलासा कोणी द्याग ।
पती उतरून खालती आल्याची आनंदाची साखर द्याग ।
शिवा कवन म्हणून जन मानवले विठ्ठलाशीं अंतरी ध्याग ॥
सार्थक झालें सगळें आगळें ठरी तरी काय विठ्ठल ।
परशराम येसू महादू म्हणे भाऊबंदकी जन्माची फिटल।

काय सुख वर्णू सख्यांनो जणू कलकत्ता छाती फाटेल ।
अंतरवेदी केल्या छावण्या आतां कधीं येऊन भेटेल ॥ ४ ॥

लावणी २ री.

चाल ॥ कोण्या देशींचा पंची राजवनशी शिपाई नादर ।
सोळा वर्षांमधीं राव पुरुष दाणेदार ।
नयन सुरेख दोन्ही लाल आंगावर शाल दुपेटा जरी ।
उमदा कोणी उमराव दिसे सरदार सौभाग्य घरीं ॥ ध्रु० ॥
हजार दो चवशा किमतीचा अबलक तेजी खडक ।
नैन फेंकला तीर जसा नीट हत्तीस मारील धडक ।
पाईं पैंजण घोड्याचे थै थै नाहीं जराभर अडक ।
जडाव जीण रेखला कसून वर शिपाई बसला सडक ।
चाल ॥ वय दिसे सोळा सतरा जणू लिहिले भोजपत्रांत ।
तसबीर थेट चित्रांत ।
आले शहरांतून गरकन झरकन आली पहातां मज गिरी ।
पटकन पडलें झटकन धरलें सख्यांनीं वरच्यावरी ।
नयन सुरेख दोन्ही लाल आंगावर शाल दुपेटा जरी ।
उमदा कोणी उमराव, दिसे सरदार सौभाग्य घरीं ॥ १ ॥
फाक सुरेख नवलाख झाक वाऱ्यापरी आली झुळक ।
पटकन स्वारी सजून गेली जशी पाण्याची झुळक ।
कानीं बिगबाळी चवकडा कंठीला मोती ओविले ठळक ।

नयन सुरेख दोन्ही, लाल आंगावर शाल दुपेटा जरी ।
उमदा कोणी उमराव दिसे सरदार० ॥ २ ॥
जलद सख्यांनो जारो पाहून यारो कोठील सुभा ।
कुच खबरा आधीं ऐकल कोणी, मग पुढला मनसुभा ।
[illegible] गळ्याची आण त्याला, तो क्षणभर राहिल उभा ।
अन्न पाणी जो घेईल पिईल नीजनयनी गुण नभा ।
संकल्प मनाचा केला तो गेंद फुलाचा झेला ।
विश्वासेल तुमच्या बोला ।
आणा करून हर बहाणा विनवा जाऊन बहुता परी ।
शहाणा असेल समजेल उमजेल चंदन मैलागिरी ।
नयन सुरेख दोन्ही, लाल आंगावर शाल दुपेटा जरी ।
उमदा कोणी उमराव० ॥ ३ ॥
सरसी गोष्टी कांही वरसी बोलून युक्तीनें फिरविला ।
शहर पुण्याचा रमणा पाहून मधी मुक्काम करविला ।
नानापरी करी आरास महाली जरीचा छत चिरविला ।
करी साहित्य सरंजाम कुल तबकामधी भरविला ।

परशराम येसू महादु आण हाय सावध पडशील मरो ।
नयन सुरेख दोन्ही, लाल आंगावर शाल दुपेटा जरी ।
उमदा कोणी उमराव दिसे० ॥ ४ ॥

## लावणी २ री.

चाल ॥ हिंदुस्थान मुलुख नाट बाट पाहिला आजिट्याचा घाट ।

झाडी जंगल असेल दाट पोपट गेले ।
जणु अक्रुरानें श्रीहरी मथुरेशीं नेले ॥
॥ कुशावा ॥

करूनिया दुःख मला प्रवासाला जाल तुम्ही ।
नूतन नवी नव्रतीच्या बहार । आंगीं मदन करितो कहर ।
येते सुखशयनाची लहर । कैसें करूं मी । ध्रु० ॥
तुम्ही श्रीमंत माझे राजेसरी । असूनया छत्र माझे शिरीं ।
मजला टाकून जातां घरीं निरऊन कोणा ।
नका जाऊं धरलें तुमचे चरणां ।
तिकडे गेल्या कैचें स्मरण । इकडे अशीच झुरझुरूं मरेन ।
राजीवनयना ।

पोटीं जर एक असतें मूल बाळ ।
तयास्तव कंठून राहतें काळ । माझे दैवीं कचें भाळ ।
येऊंद्या करुणा । शीतळ चंद्र अर्गजाशी । करितो क्षयरोग केवढा ।
आळवी चितावी जैशी । विरहानळ एवढा ।
दीपकाविण मंदिर जैसें । भयंकर दिसे घरवाडा ।
घरीं असून रत्नांची खाण । तुम्ही तरी ठेविलें परस्थान ।
बिकट पडला हिंदुस्थान । ऐका स्वामी ।
करूनिया दुःख मला प्रवासा जाल तुम्ही ।
नूतन नवी नवतीचा बहार आंगी मदन करितो कहर ।
येते सुखशयनाची लहर । कैसें करूं मी ॥ १ ॥
अवघड सातपुड्याचा घाट । रस्ता न मिळे जाया वाट ।
जाळ्या वेळूच्या दाट । करकरा लवती ।
उंच गेले ताडमाड । आंबे आंवळे खिरण्या पाड ।
सागवान नारळीचे झाड । तयास्तव भवती ।
रामफळें सीताफळें आला बार । रातंजन चंदन देवदार ।
केतकी कर्दळी अकबार । बहु दाटवती ।
दाट जाळ्या करवंदीच्याही । कोणी कोणाला ना दिसती ।
वस्ती भिल भांगाण्याची मार्गी सोडुनया क्रूर असती ।
झोपड्या बांधून तरसांच्याही । देती पान तस्तातस्ती ।

नूतन नवी नवतीची बहार । आंगी मदन करितो कहर ।
येते सुखशयनाची लहर । कैसें करूं मी ॥ २ ॥
सिंह शार्दूळाचें थवे । चित्ते सांबर गेंडे भवें ।
विषय तरसाचें वाटे भय । शबरी फिरती ।
रोही रिंछ आणि सिंध अपार । उन्हाळा गव्यांची एक धार ।
वानरें करिती भुभुकार । वृक्षा वरती ।
कोमळ कांती अति सकुमारा । तुम्हाला सोसेना उनवारा ।
मजली अदल कोस बारा । मुक्काम ठरती ।
सिद्धी सळाव तट पाहूं । राधा धरली सिध्यानें ।
मगरी सुसरी बाहेर येऊन । शब्द बोलती कस्कशवाणे ।
शीर तळ हातावर घेऊन । जसे सुळावरले प्पाणे ।
मी तरी जाऊं देईना कदां । येऊन मिठी घालितें पदां ।
नाहीं तर आपल्या हस्तें वधा । एक्या कलमीं ।
करूनिया दुःख मला प्रवासाला जाल तुम्ही ।
नूतन नवी नवतीची बहार । आंगीं मदन करतो कहर ।
येते सुखशयनाची लहर । कैसें करूं मी ॥ ३ ॥
ऐकिली चतुर नारीची अर्जी । फिरली प्राणसख्याची मर्जी

रंगीत महालांत चौबुरजी । बैठक खाशी ।
कंदिल दीप लाऊन चमचमाट । पलंगीं शेज फुलांची दाट ।
करी मग तऱ्हेतऱ्हेचे थाट । होऊन सरशी ।
नूतन नवी नवतीची भवा । उतरली भर ज्वानीची हवा ।
आतां मी करीन तुमची सेवा । होऊन दासी ।
राहिला लीचे मज बुद्धी । तयाचे सागर गुण आधी ।
कवि नामीं विठ्ठल परसादी । कनया ठेविल समान बुद्धी ।
परशराम येशूचे बरदी । केला पण नेती सिद्धि ।
रामकृष्ण रामाचे छंद याती । काडोविकडी कटीबंध भेद ।
काय जाणतील मतिमंद करतील गुरमी ।
करूनिया दुःख मला प्रवासाला जाल तुम्ही ।
नूतन नवी नवतीची बहार । आंगीं मदन करितो कहर ।
येते सुखशयनाची लहर । कैसें करूं मी ॥ ४ ॥

## लावणी ४ थी.

चाल ॥ लहानखुरी अवकर बांधा नाजुक । मुखचंद्र असोलिक॥

सगनभाऊ.

रुपकिशी दूर देशीं अंतरले । प्राणपती भरी कोणाच्या भरले ॥ध्रु०॥
नार सकुमार होती मायबापाजवळी ।
केलें लग्न अज्ञान तनु कवळी ।
वय लहानसें रूप चंद्राआगळें ।

ऐक सखे पतिव्रता असू ढाळे ।
नवी भरज्वानी जीव हा तरमळे ।
कसे राघेला चुकले वनमाळे ।
चाल ॥ ती मजला झाली परी गोष्ट नाहीं बरी मी पडलें झुरणी ।
कोंवणे दिसे आज गगन लाविता लगन लोपले चरणी ।
सुखभोगायाच्या दिनीं एकली वनीं दुःख गेले करुनि ।
गेले भ्रतार दुश्चित मन काय लक्ष्मीला उणें ।
संचित फुटकें ही हीन उदासी धरली ।
प्रवासीं छंद जायाचा वारू चिंतामण ।
जीन जडित हुमा मोत्याचा तयारी केली ।
संजुक ढाल पट्ट्याची जरी पेस शिरीं मंदिल वर पटका जरी ।
कानीं भिगबाळी चबकडा जोत काय न्यारी ।
हातीं जडावाचें कडें कंठीं जडतारें ।
दिन दसरा उत्तम दिन । मुहूर्त पाहिले त्यानं । दिले डेरे परस्थान ।
चाल ॥ कांहीं तरी सखा मशीं रिझल । साजणी ।
चालला मजल दरमजल । साजणी ।
गेल्या दिल्लीस फौजा फजल । साजणी ।
गेले दिल्लीस मग हलकारे फिरले ।
बादशाही भेटी झाल्या दैवीं हातीं धरलें ।
हृषीकेशी दूर देशीं अंतरलें ।

प्राणपती भरी कोणाच्या भरले ॥ १ ॥
आले त्वरेनें जासुद माघारा । धरली चाकरी दिल्लीच्या खबरा ।
दुश्चित झाली व्याकुळ सुंदरा । धावा सैल्यांनो मशी पंखा वारा ।
जसा जिव्हाणें नसे जीवन थारा । ती पर केली मशीं चंद्रहारा ।
चाल ॥ कर्पुर कर्दळी पुटी अखेर शेवटीं–न लाधे तिजला ।
ती दमयंतीची दशा–भेट नाहीं आशा–लागली मजला ।
अशी भ्रमिष्ठ झाली खरा–कोणीकडे सखा–कोणाशीं रिझला ।
दिल्ही सोनें सहसा हिन । वय रतीं दिसे लहान । सुखभोगी
सब अज्ञान ।
जडित मंचकीं पुष्पाची शेज प्यां निद्रा ।
पतस्र्तिव सखये–निशीदिनीं पुजितें रुद्रा ।
दिसती मजला–भोवाणी बैठकी सदरा ।
रहंवर पालख्या कुंजर तेजी बरवे ।
भाव्यांत रूपल्हा बिधी मशीं बरवे ।
न्यूनता नाहीं लिकरसी भरीं आहे सर्वे ।
मिष्टान्न हर जिनसीचें– फुल हवा बागबगीचे ।
तें फिकेका मज ना रुचे ॥
चाल ॥ चंद्राविण चांदणी फिकी । साजणी ।
नाहीं सालधनी कोणी निके । साजणी ।
देव धर्म अमुक मायलेके । साजणी ।

प्राणपती मरी कोणाच्या भरले ॥ २ ॥

नेम असे एकनिष्ठा स्तव चरणीं । पतिव्रतेचा भाव पती स्मरणीं ।
कुठवर धरूं धीर मी पडले झुरणी । धन्य ईश्वरा तुझी
अघटित करणी ।
सात संवत्सर भरले निर्वाणी । कशी एकली करमूं वय तरणी ।
चाल ॥ लोटला प्राणासर जसें । लागलें पिसें ।
जळो मुठींत धरूं जीव किती । कोणाच्या हातीं धाडूं पत्रिका ।
इच्छाभोजन ब्राह्मण । करी श्रवण शास्त्र कामीन ।
चातकापरी लक्ष जीवन । त्यांत मरी सुंदर पति मार्गी
न्याहळी दृष्टि ।
ठेवी पूर्वीच्या नाकळे । नाकळे काय या गोष्टी ।
अमुक मरली—काय करूं जन सृष्टि ।
चाल ॥ धरवेना धीर मज आतां । जरा साजणी ।
उदंड नवसिले भावें देव निरवाणीं ।
विषाचा घेईन प्याला करी जहण ।
करी विचार गुणी लक्षणा । जोडी जासुदाची आणा ।
दिल्हें पत्र केलें रवाना । दिल्ही मुदत महिना सवा ।

पती पुढें लखोटे ठेवा । जासुदा
माझे प्राणपती भेटवा । जासुदा ।
हजार रुपये दिल्हें इनाम वचन हरलें ।
आनंदाची घडी दुबेळपण सरलें ।
हृषीकेशी दूरदेशीं अंतरलेजी । प्राणपती भरी कोणाच्या भरले॥ ३
पठाण गती दिली चाल जासुदालाजी ।
जलदी पावले करून रात्रदिन ।
पत्र ऐकतां श्रवणीं स्वामीलाजी । जरूर आज्ञा मागें युक्तीनें ।
झाली वर्खें दिल्ही रजा बादशाहानें । दिली नालकी
पटका निशाण ।
चाल ॥ दिली ढाल दक्षिणेकडे । चवघडा झडे हत्तीवर हवदे ।
रान बसले आंबारींत । झरझरी पीत घटाव उमदे ।
हजारो लोक जमेंत । आले उज्जनींत लोक कुल समदे ।
चाल ॥ घरीं सुंदर चंपावती । रंगमहालावर उभी होती ।
झाला शकुन होरा वर्णिती । हरुष अंतरीं ।
देखली सख्याची स्वारी । उतरली खालीं ।
खूप हवाच बनली परी । रत्नमय दीपें ।
पंचारती घेऊनया करी ।
चाल ॥ आदरें ओवाळी प्राणसखा कामिना ।
लोकांशी दिधली रजा गेली सारी सेना ।

दूर भगली बिसणीखोरा । ठेव दुरा । येसू म्हणे नाहीं नव-
शिके कुठे तरले जी ।
शिवराई पैसे अखंडांत सरले हृषीकेशी दूर अंतरले जी ।
प्राणपती भरी कोणाच्या भरले ॥ ४ ॥

## लावणी ५ वी.

चाल ॥ पती गेले हो गेले आज माझे काठेवाडीं ॥
गिरनार अबूच्या पहाडीं ॥
गेले टाकुनि मजला स्वामी । तगमगितें अंतरयामीं । ध्रु० ।
तारुण वय मदें भरलें । कूच आम्रफळ तरतरले ।
समयांत अशा अंतरलें । प्राक्तन फळ वाटे सरलें ।
प्रियकर आज रागें भरले । साधितां बहुत घाबरलें ।
कंठूं मी कशी यामी । तगमागितें अंतरयामीं । १ ॥
सुख शयनीं न गमे नयनीं । जधीपासून गेले त्यजुनी ।
अहोरात्र सख्याचे भजनी । हा देह माझा पडला झिजला साजणी ।
जीव प्राण घातला वजनीं । मरतें मी पडलें झिजणी ।
कधीं रत होईल त्याकामीं । तगमगितें अंतरयामी ॥२ ॥

पती योगें भरला चळ । नगसे मजला घडीपळ ।
गे जसा दमयंतीशी नळ । लागली बहुत तळमळ ।
त्यागिलें वनीं निढळगे । वाहे नेत्रीं निर ढळढळ ।
कोणी आणा सख्या निजग्रामीं । तगमगितें अंतरयामीं ॥ ३॥
घरांत आले सगुण गुणराशी । करी शेज फुलाची सरसी ।
नामीं विठ्ठल विठ्ठल स्मराशी । जय परशराम भव तरशी ।
मल्हराज कवीची बरशी । लागली जिव्हारीं तिरशी ।
गुणी यशवंत बहुकामी । तगमगितें अंतरयामीं ॥ ४ ॥

### लावणी ६ वी.

चाल ॥ पती गेले आज काठेंवाडीं । गिरनार आबूच्याग पहाडी ।
विनवाग बहुतांपरी । परंतु कसाहि आणवा घरीं ॥ ध्रु ० ॥
ओतिव पुतळा सुवर्ण लाटा । द्दिष्टिपुढें दिसे गोरा गोमटा ।
मज विषयाचा भरला फाटा । आला थराखून आंगाशी कांटा ।
प्राणसख्याचा महाल मोठा । जाता धरा जा चहूकूल वाटा ।
एकांता मधी जाऊन गांठा । समजाऊन आपल्याशी थाटा ।
अशा वस्तूचा बोभाटा । करा निरूपण चतुर सुकटा ।
थोर लागले झाले चिपटा । हाणीन खंजीर उरीं ।
विनवा बहुता परी । परंतु कसाही आणवा घरीं ॥ १ ॥
लावण्यासनी कोमळ विजवा । अम लागले कोणी तरी विझवा

घेऊन या तो कसाही रिझवा । उभयतांला रुपाशी गाजवा ।
वाळा घरेच पडदे भिजवा । रंगमहालाचे झुरके बुजवा ।
शेज फुलांची सुंदर सजवा । चरणकमळ मजकडून पुजवा ।
मंचकीं मज शेजारीं निजवा । प्राण प्रियकर घेईन उजवा ।
विडे देईन स्वकरीं ।
विनवाग बहुतापरी । परंतु कसा ही आणवा घरीं ॥ २ ॥
आसपास आधीं घेऊन धडवा । असल जवळ कोणी तिजला धुडवा ।
अंतरखुण प्रतीची भिडवा । अर्जी मर्जीमधें विकल्प उडवा ।
क्रोध सख्याचा समुद्र बुडवा । येईल असा कांहीं हुन्नर लढवा ।
राव्यापरी जिवलगास पढवा । कसाही त्याचा संगहा घडवा ।
यादेहीच्या करून खडावा । नेऊन तयाच्या चरणीं जडवा ।
मला धीरधरवेना वडवा । द्याील दामा तरी ।
विनवाग बहुतापरी । परंतु कसा ही आणवा घरीं ॥ ३ ॥
आसपास सख्यांचा पाळा । विनविल्या त्या जाऊन कृपाळा ।
घेऊन आल्या चतुर नृपाळा । रंगमहालीं बांधून चोपाळा ।
जशी राधा इच्छिती गोपाळा । पूर्व पुण्य आलें भाग्य कपाळा ।
लावण्यामधीं बनली चपळा । चंपुवृक्ष जैसा पुषपाळा ।
आज देईन सोन्याचा चपळा । चरणीं ठेऊन मज प्रतिपाळा ।
कटीवंद विठ्ठलाचा चपळा । परशराम छंद करी ।
विनवाग बहुता परी । परंतु कसाही आणवा घरीं ॥ ४ ॥

बा काय बोलतोशी संस्कृताची पिंगी ।                रामजोशी.

सख्यारे तुजवांतून किलवाणी माझी काया ।
पावता पत्र सत्वर निघावे राया । ध्रु० ॥
वाट किती पाहूं पाहतां मी शिणलें पोटीं ।
बहु दिस झाले तुम्ही प्रवास नाहीं गाठीं ।
देव किती नवसू नवशिले सख्या तुजसाठीं ।
आहे तसे रे यावें म्हणून चिंता करीत मोठी ।
नको धन द्रव्य द्रव्याची मजला कोटी ।
अखंड भाग्य सौभाग्यवती ओटी ।
प्रवासा माजी छावणी कोणत्या ठाया ।
जासुद जोड्या पाठविल्या खबरा राया ।
सख्यारे तुज वांचून किलवाणी माझी काया ।
पावता पत्र निघावें राया ॥ १ ॥
परदेशी जासुदा तुम्ही जा जागा ।
भरत दिल्लीच्या स्वामीच्या म्हणती यागा ।
भेट झाल्यावर चरणाशी वळकट लागा ।

येथून एक महिना लागेल तुम्हाशी जाया ।
बिकट रस्ता सांभाळून जावें त्याया ।
सख्यारे तुजवांचुन किलवाणी माझी काया ।
पावतां पत्र सत्वर निघावें राया ॥ २ ॥
रवाना जासुद मग केला त्या नारीनें ।
चालता झाला रस्ता कांचन वारीनें ।
तापी नर्मदा उतरून गेला जारीनें ।
माळवा ग्वालेर सोईचे सर्व सोईनें ।
पोंचला दिल्ली कुच मुक्काम झडकरीनें ।
भेटला त्याशीं से होते सडे स्वारीनें ।
पुढें टाकूनिया कागद लखोटा पाया ।
येऊन कसे बसले हृदयांत कांहीं नाहीं माया ।
सख्यारे तुजवांचुन किलवाणी माझी काया ।
पावतां पत्र सत्वर निघावें राया ॥ ३ ॥
वाचितां पत्र मग तयार केली स्वारी ।
फिरउन मोहरा कूल जमीयत अवघी सारी ।
कधीं भेटेल ही प्राणसखी अधिकारी ।









अशी हमेशा जिवास वाटे हुरहुरी ।
आला घरीं आपल्या गजघांट वाजवित दारीं ।
भेटतां दोघे श्रम हरले सहपरिवारीं ।
नामीं विठ्ठलचे छंद अच्युक जडणा गाया ।
परशराम येसू छंद गातो नवे नित्य पाया ।
सख्यारे तुजवांचून किलवाणी माझी काया ।
पावतां पत्र सत्वर निघावें राया ।। ४ ।।

लावणी ८ वी.

चाल ।। पती गेले आज काठेवाडीं ।
गिरनार अबूच्या पहाडीं ।
तूं बालत्वाचा मैत्र जिवाचा गडी ।
नकोरे प्रियकरा धरूं मनीं आढी ।। ध्रु० ।।
आधीं लाऊन माया आतां नको दूर धरूं ।
सख्या तुजविणा कोणाला स्मरूं ।
होईल तुजला दुःख मनीं किती झुरूं ।
माझा तूं लावण्याचा सरू ।
अमोल हिरा पाहुन घातली उडी ।
काशीस लाऊन न्या पहिल्या घडी ।
तूं बालत्वाचा मैत्र जिवाचा गडी
नकोरे प्रियकरा मनीं धरूं आढी ।। १ ।।

देखण्यांत जैसा नाजुक बटमोगरा ।
सुवासिक चंदन मैला गिरा ।
तूं कृपा समुद्र केवळ रत्नहिरा ।
चालून आलें प्रीतीच्या आगरां ।
एक चित्त असुनिया रुसवा कारे घडी ।
कोण्या सवतीनें लाविलें चढी ।
तूं बालत्वाचा मैत्र जिवाचा गडी ।
नकोरे प्रियकरा धरूं मनीं आढी ॥ २ ॥
काया कवळी नवाळी नवतीच्या शिरा ।
लाऊन शिरपेच मंदिल तुरा ।
विनोदें आनंदें विलास महालीं करा ।
सेवेमधीं उभी तुमच्या प्रियकरा ।
तो सुदिन मजला भोगीन प्रिय आवडी ।
पिकल्या पानांचे वदनीं विडी ।
तूं बालत्वाचा मैत्र जिवाचा गडी ।
नकोरे प्रियकरा धरूं मनीं आढी ॥ ३ ॥
काया परखी परद्वारीं प्राण जसा ।
जाणून भुलला देह विषयाच्या रसा ।
गोरटी धरी मनगटीं मंचकीं बसा ।
नामीं विठ्ठल कवीचा ठसा ।

गुणी परशराम छंद त्र्हेतऱ्हेचे करी ।
येसू गंगारामाच्या रुढी ।
तूं बालत्वाचा मैत्र जिवाचा गडी ।
नकोरे प्रियकरा धरूं मनीं आढी ॥ ४ ॥

## लावणी ९ वी.

॥ चाल ॥ कडे पठारीं डोळे झांकून बसला मलुराया ।
स्वामीचरण भेटीचस कैसें केलस मलुराया ।
बोले कावळा लवतो डोळा फुरफुरती बाही ।
गेले प्रवासा घरीं कधीं येतील आमचे शिपाई ॥ ध्रु० ॥
गेल्या दिवसापून कागदपत्र नाहीं आला संदेसा ।
झुरझुरु पांजर झालें शरीर किती करूं अंदेसा ।
बिकट वाट बाई कठीण मुलूख तो फारच खांदेसा ।
दुष्काळामुळें नचाले रस्ता पडला मंदेसा ।
ग्वालेरीवर तमाम फौजा एकवटली शाही ।
दक्षणच्या लोकांला आसरा दुसरा कुठें नाहीं ।
बोले कावळा लवतो डोळा फुरफुरते बाही ।
गेले प्रवासा घरीं कधीं येतील आमचे शिपाई ॥ १ ॥
सुभी गिरासे राजे रजवाडे करून तिर विरजी ।
तिकडे तिकडे टोपीवाला महुंकडे इंग्रेजी ।
आतां कशाला जाऊन राहिला पोकळ अलमरजी ।

एक प्यादडीवर काम, हत्यारें दिलीं सोडून बुरजीं ।
वंश बुडवाई होईल वाटे लष्करचे पाई ।
रत्न पोटींच्या पोटीं जिरतील जीव जाळून लाही ।
बोले कावळा लवतो डोळा फुरफुरते बाही ।
गेले प्रवासा घरीं कधीं येतील आमचे शिपाई ॥ २ ॥
अबरूसाठीं लाऊन राहिलें आंगाला माती ।
वाट प्राहतां हातपायांच्या फुल झाल्या वाती ।
ऐक सखे, मी स्वपन देखिलें आज आध्यीं रातीं ।
चोळी पातळ हिरव्या बांगडया दिल्या माझे हातीं ।
ओटी भरून हाळदी कुंकूं माझ्या निढळा लावी ।
शकुन चांगला तुजला झाला आम्ही अवघ्या गाही ।
बोले कावळा लवतो डोळा फुरफुरते बाही ।
गेले प्रवासा घरीं कधीं येतील आमचे शिपाई ॥ ३ ॥
दिल दिलासा देतें मी सखया फारच सुख मानी ।
अवचित स्वारी आली दणाणित ऐकुन या कानीं ।
लगबगून उठली मिळालें पाण्याशीं पाणी ।
नामीं विठ्ठल परशराम येसू ह्मणे चतुर शहाणी ।
रामकृष्ण गुणी रामा गातो ठिकाण मूळ वावी ।
धनवट देशामध्यें महाशूर नक्षा सवाई ।
बोले कावळा लवतो डोळा फुरफुरते बाही ।

सवाई माधवराव स्वारी निघाली नबाबावरती ॥

नाजुक रुपडें दिपडें ठिकडें जिकडे तिकडे असकारा ।
कराडची का कोलापुरची देखण्यांत बाकी तारा ॥ ध्रु० ॥
शहर पुण्याच्या भररस्त्यामधें भरनवतीचा तवर नवा ।
चुडालकाकीत जडाव अगदी कोंदण केलें मधीं रवा ।
तंग चोळीवर रंग कुसुंबी गोरे गाल जसा नरम खवा ।
ऊर पदरानें झांकून ठाकून किती चालशी सटून जिवा ।
तेडे मकोडे समले वाले भले लोक झाले गर्द चुरा ।
विन घावाविण घायाळ घुमती एक एक नामी मोहरा ।
केले कट्टन
नाजुक रुपडें दिपडें ठिकडें जिकडे तिकडे असकारा ।
कराडची का कोलापुरची देखण्यांत बाकी तारा ॥ १ ॥
जोबन गहेरे नैन तारे जशी वीज गगनी कडाडी ।
उदी शाल आंत साज भरजरी तंग काचोळी तडाडी ।
उभे थव्यावर थवे तुजसाठी नवें पांखरूं फुलवाडी ।
सारे शहरामधें पुकार पडली उभे सुभे साडोमाडी ।
मोठे मोठे सावकार धनाढ्य कोट्याधी पैका गहेरा ।

कराडची का कोलापुरची देखण्यात बाकी तारा ॥ २ ॥
काजुम खावे माजुम मेवे हाती पुडे वर्फी ताजी ।
शनवारांतून झुकत चालली केली हावद्यावर जीनबाजी ।
मोठे मोठे सरदार धारकरी दिले मोकलून भलते जी ।
जिकीर सोडून फकीर झाले जो तो रुपाला नवा जी ।
आदितवार सोमवार पेठेतून थेट निघाली करून त्वरा ।
जशी चमकली नंगी समशेर अलम पाहती भिरा भिरा ।
तुझ्याकडे ।
नाजुक रुपडें दिपडें ठिकडें जिकडे तिकडे आसकारा ।
कराडची का कोलापूरची देखण्यांत बाकी तारा ॥ ३ ॥
अक्कलकोटचे शेट राहणार चार खुट फिरलों शाही ।
थिजलों रिझलों पाहून रुपाला तुजसारखी दुसरी नाहीं ।
आम्ही शर्थी गर्ती निर्मळा साक्षभूत ईश्वर शाही ।
कर कृष्णेचें स्नान दान हा आंगीं दोष सहसा नाहीं ।
विठु परशराम ह्मणे स्वभुवना स्वस्थ जाय तूं आपल्या घरा ।
रामकृष्ण गुणी रामा गातो एकनिष्ठ एक नेमी खरा ।
खूप खंबीर ।

नाजुक रुपडें दिपडें ठिकडें जिकडे तिकडे आसकारा ।
कराडची कां कोलापुरची देखण्यांत बाकी तारा ॥ ४ ॥

लावणी ११ वी.

चाल ॥ छळितां भिऊन उगीच बसतें ।
करा सवतीचा संग सुकृत बहु व्यभिचारी बसतें ।

चाल दुसरी ॥ दैव प्राधान्य उभयतांचें ।
म्हणून भारजा रत्न लाधलेंस तूं गुणवंतांचें ।
झुरती राघोसाठीं मैना ।
पांचीप्राण तुजपाशीं लागले माझ्या मनमोहना ।
कधीं भेटेल चतुर नयना ॥ ध्रु० ॥
बारा वर्षांची उंबर माझी नवती माझ्या आंगीं ।
नवती माझ्या आंगीं रे रात्र वैऱ्याची पलंगीं ।
साता पड्द्या आंत माझा पलंग बिछाना ।
राजहंस पक्ष्याचा मिलाफ कररे भगवाना ।
झुरती राघोसाठीं मैना ।
पंच प्राण तुजपाशीं लागले माझ्या मनमोहना ।
कधीं भेटेल चतुर नयना ॥ १ ॥
गोसाव्याचें रूप धरून आलों तुझ्या द्वारीं ।
नको परत लाऊंरा माघारी ।
बत्तीस सिकक्या आहेत नारी ।

तुझ्या बंगल्याग शेजारीं ।
दोर लाऊनी येतों वरी ।
रात्रंदिवस हिंडलों फिरलों उपाय चालेना ।
झुरती राघोसाठीं मैना ।
पंचप्राण तुजपाशीं लागले माझ्या मनमोहना ।
कधीं भेटेल चतुर नयना ॥ २ ॥
गळ्यांतल्या ताईला तुला मी आंघुळ घालितें ।
गंध उगाळून ठेवितें ।
पंक्तीच्या आधीं तुला मी भोजन वाढितें ।
पाट बसाया टाकितें ।
वेळा लवंगा चिकण सुपाऱ्या पानें तबकांत ।
विडा खुप रंगला मुखांत ।
झुरती राघोसाठीं मैना ।
पंचप्राण तुजपाशीं लागले माझ्या मनमोहना ।
कधीं भेटेल चतुर नयना ॥ ३ ॥
सोवळ्याचें निमित्त करून बसले आंगणांत ।
राहुटया दिल्या खणांत ।
पाहुण्याच्या निमित्तें साजण बोलविला आंत ।
पुरविला मनचा मनोरथ ।
विठू परशराम गातो लावणी सहशूर दक्षणांत ।

जरीचा पटका सेनांत ।
झुरती राघोसाठीं मैना ।
पंचप्राण तुजपाशीं लागले माझ्या मनमोहना ।
कधीं भेटेल चतुर नयना ॥ ४ ॥

## लावणी १२ वी.

चाल ॥ आला हो वनवास पती गेला नवतीचा गडे चाहणारा ॥
थाता समजलें राजा भर्तृहरी भरतपुरचा राहणारा ॥ सगनभाऊ

निर्दय नसून मन निष्ठुर केलें प्राणसख्यानें गडणी ।
आशा सोडुन राहिला पती लागून इतराचे चढणी ॥धृ० ॥
सर्व सुख अनुकूल असूनया घरीं साहेबी सवती ।
बाल्मपटे विटे चालती शिबंद्या भवतीं ।
जसा चंद्र लखलखीत बिजेचा चढती कळा आंगीं नवती ।
बरवाली पोशाक आंगावर मुलाम नाजुक गवती ।
मजवांचुनिया प्राणसख्याला घडी एक करमत नवती ।
कसा गेला टाकून मलाग बाई केली वज्राची छाती ।
ठाईं ठाईं चौपाळे बिछाने किनखापी छत मढुनी ।
असा विलासिक राजा गेला माझ्या हातींचा उडुनी ।
निर्दय नसून मन का निष्ठुर केलें प्राणसख्यानें गडणी ।
आशा सोडुन राहिला पती लागून इतराचे चढणी ॥ १ ॥
टाकून गेले कोळ सख्या मी अगदींच ऐसी भाळ ।

झोंप येईना पलंगीं सख्याविण किती घोकण्या घाळूं ।
महालांतून आंत बाहेर येतां जड झाले नग शाळूं ।
पिंजऱ्यांत कोंडिली मैना दुःख कोणापाशीं खोलूं ।
कामचेतना झाली शरीरीं जाग नका मशीं बोलूं ।
असें वाटतें घेऊन खंजीर हृदयामधें फेलूं ।
जसा मच्छ तरमळितो वाळूमधें मनच्या मनीं तरफडूनी ।
वाट पाहातां परी पक्ष्या असें वाटतें जावें उडूनी ।
निर्दय० ॥ २ ॥
पर मुलखीं तुझी जाऊन राहिलां कांहींच येईना वार्ता ।
जासुद जोडच्या करून पाठवा असाल कोण्या तरी प्रांतां ।
उदास झालें चित्त आतां मी मिष्ट अन्न कडू खातां ।
जगेन कशी हा नाहीं भरंसा असें भासलें चित्ता ।
असे संकटीं पाव विठाई नवसूं कोणाशीं आतां ।
वणव्यामधें सांपडली हरणी तुजविण न दिसे त्राता ।
ही नवीन झालें गाय सखे गडे गगन पडलें कडकडुनी ।
वाट पाहातां नेत्र शिणले जळो तुझी अशी कशी करणी ॥
निर्दय० ॥ ३ ॥
उदास झालें चित्त आतां मी विष खाऊनिया मरतें ।
त्यांच्या माझ्या स्वर्गीं भेटी होतील कळलें पुरतें ।
एकच धरला खंबीर संकट घालुन श्रीहरी वरतें ।

पूर्ण चंद्र पोरणीमेस पाहतां आलें दर्याला भरतें ।
नामीं विठ्ठल परशराम येसूची अचुक जडणी ।
घेऊन झाले खुषी गडे चित्ताच्या पडल्या होळणी ।
निर्दय० ॥ ४ ॥

## लावणी १२ वी.

चाल ॥ इष्क उजळणी परोपरीची दाविते शरीर वळऊन पुस्ती ॥
हात चार इष्काचें आसन चौऱ्यायसी लढ्ढ कुस्ती ॥
पंच प्राण तुजपाशीं सासऱ्या घेऊन जातें कुडी ।
खुशालीचें वर्तमान लिहून कळवित जा हरघडी ॥ ध्रु० ॥
जधपासून स्नेह तुमचा माझा वियोग नव्हता कधीं ।
मम इच्छित मन विलास केले बसून आनंदामधीं ।
जनाचार जन रुढी सासऱ्या पुसून जातें आधीं ।
दया लोभ मजवरी असूंद्या प्राणसख्या गुणनिधी ।
प्रीतिमधें आड पर्वत पडला विरहानळ धडधडी ।
पंच प्राण तुजपाशीं सासऱ्या घेऊन जातें कुडी ।
खुशालीचें वर्तमान लिहून कळवित जा हरघडी ॥ १ ॥
जीवनकळा तुह्मी मालक माझे पहिल्यापासून कळा ।
कधीं येऊन भेटेन मागुती रुदन करी ढळढळा ।
वसंतकाळीं दूर अंतरली तुम्हास मी कोकिळा ।
हेंच दुःख वाटतें मनामधें मिठी घालतें गळां ।

थरथरा कांपे शरीर भरली हृदयामधीं हुडहुडी ।
पंच प्राण तुजपशीं सासऱ्या घेऊन जातें कुडी ।
खुशालीचें वर्तमान लिहून कळवित जा हरघडीं ।। २ ।।
असनीं भोजनीं गमनीं शयनीं विसर पडेना तुझा ।
रातंदिस घोकण्या रुपाच्या कारितें मानसपूजा ।
रागास कडकडून पडुंद्या मजवर अंतरच्या हितगुजा ।
आठऊन कंठू राहूं चार दिस या भेटू करूं मजा ।
नेत्र येती भरभरून बोलतां वेळीं वाचा बोबडी ।
पंच प्राण तुजपशीं सासऱ्या घेऊन जातें कुडी ।
खुशालीचें वर्तमान लिहून कळवित जा हरघडीं ।। ३ ।।
आज्ञा घेऊन गेली सासऱ्या चतुर सखी गोमटी ।
प्रेम समाधी लाऊन तप करी बसून निर्जन मठीं ।
पद जडणा चतुराई कवि नामीं विठ्ठलची हातवटी ।
परशराम येसूचे वाजले तबले देश धनवटी ।
पुरुष प्रकृति वर्णन केलें छंद कडोविकडीं ।
पंच प्राण तुजपशीं सासऱ्या घेऊन जातें कुडी ।
खुशालीचें वर्तमान लिहून कळवित जा हरघडीं ।।। ४ ।।

लावणी १४ वी.

चाल ।। साधी ।। शिरीं मंदिल बांधिला मजेचा ।।
शुभ्रदुपेटा जरी पैठणचा ।।

[illegible]
मला झोंका दिलास काल । माझे मंदिरीं चाल चाल ।
मला झोंका दिल्हास काल ॥ १ ॥
आज गाठ पडली देवाभक्ताची । प्रीत जरी तोडाल आणु रक्ताची ।
कुठवर सांगूं माजा तुमची । कोण्या सवतीघरीं जाल ।
मला झोंका दिल्हास काल । माझे मंदिरीं चाल चाल ।
मला झोंका० ॥ २ ॥
नाना यत्न केले तुसाठीं । उभी केव्हांची होतें मी कष्टी ।
अवचित स्वारी पडली दृष्टी । पाहून मन खुषी व्हाल ।
मला झोंका दिल्हास काल । माझे मंदिरीं चाल चाल ।
मला झोंका० ॥ ३ ॥
रामसखा म्हणे नार दुलंगी । बहु युक्तीनें भागून पलंगीं ।
विठु परशराम म्हणे खुषरंगी । रामकृष्ण गुणी रास ।
मला झोंका दिल्हास काल । माझे मंदिरीं चाल चाल ।
मला झोंका दिल्हास काल ॥ ४ ॥

## लावणी १५ वी.

चाल ॥ सुंदरा मनामधीं भरली हवेलींत शिरली मोत्याचा भांग ।

रामजोशी

गुंफली वेणी नागिणी लडीरे गालांवर दोहीकडे ।
पान खाऊन ओठ करी लाल आंगावर शाल झळकती चुडे।
गजगती चाले हळू हळू उरींग जोबन उमटले हुडे
चाल ॥ वय आटकर बांधा लहान। हरपलों पाहून भुकतहान ।
कर अर्पण पंचीप्राण । रणीं ग जाऊं कटून ।
स्वरुपाचे तुटती तारे कडारे कड विजवा पडतील तुटून
टुमदार कोणाची छान । नवती भरजानं पुसारे आली फुटून ।
स्वरूपाचे तुटती तारे कडारे कड विजवा पडतील तुटून ॥ १ ॥
वय बारा तेरांत ऐन आली भरांत मुई ग ठेंगणी ।
दंडीं बाजुबंद बाहुट्या सरपहुच्या हिरे जडले कंगणी ।
गगनांत चांदणी ठळक मारशी झळक उमीग आंगणीं ।
किती नटून थटून मारशील छमाछम मैनाच्या संगिणी ।
चाल ॥ झालों घावाविण घायाळ । झोंबला विखारी व्याळ ।
जणूं टाहो करी कोयाळ ।
तूं नकळे घालशी माळ कोणाला ग उठून ।
स्वरुपाचे तुटती तारे कडारे कड विजवा पडतील तुटून ।
टुमदार कोणाची छान । नवती भरजान पुसारे आली फुटून ।

स्वरूपाचे तुटती तारे० ॥ २ ॥

तो दूर देश बंगाल मुलुख तेलंग गेलो सलासैल आलों करून ।

नाहीं धन दौलतीला कमी आणिले उंट मालाचे भरून ।

चाहील तें माग या घडी देईन बिन घडी ताजवा धरून ।

तुझे मारोमार देईन सखे खैरात करीन तुजवरून ।

असा हेत मनामधें धरून राहिलों रुपाला भुलून ।

चाल ॥ चार महिने तुजसाठीं ठरून । मजा दे पटून ।

स्वरुपाचे तुटती तारे कडारें कड विजवा पडतील तुटून ।

हुमदार कोणाची छान । नवती भरजान पुसारे आली कुठून ? ।

स्वरुपाचे तुटती तारे० ॥ ३ ॥

घरीं चला राजअंबिरा गुणगंभिरा पाहिलें कसून ।

वचनाचा करावा मान करीन सन्मान पलंगीं बसून ।

सिंदु परशरामाचा नक्षा चहुंकडे दक्ष पहा पहा जा पुसून ।

गातो रामकृष्ण रामाचे तोड हे मूळ वस्तादापासून ।

चाल ॥ नवतीचे ठाकें बेसुर । चाल बदलून गाली दौर ।

पायोघरी वाजविती दौर । जशी अक्षतिजेची गौर ॥

काय तिशीरे झडून । काय तिशीरे झडून ।

स्वरुपाचे तुटती तारे कडारे कड विजवा पडतील तुटून ।

हुमदार कोणाची छान । नवती भरजान० ॥ ४ ॥

## लावणी १६ वी.

चाल ॥ हा फंदिफाकडा मज सांपडला गुंडा ।
चालूंदे प्रीत शेवटा देवा मार्तंडा ।

कुशाबा.

चाल दुसरी ॥ बा काय घालतोशी संसृतीचा पिंगा ।

रामजोशी.

किती सांगूं स्वहित नित हितगुज तुमचे पशीं ।
संताप श्राप हा माफ करावा मशी ।
सांपडे वस्तु अंधारीं न मिळतां जशी । ध्रु० ॥
वाटतें मला आज चला एकांती निजूं ।
सामानसिद्ध सेजेवर होतें मी रुजू ।
मला सौख्य धुरंधर निधी म्हणून किती मजूं ।
तुमच्या विरहित मी पाय कोणाचे पुजूं ।
मजविषयीं कांहीं तिळमात्र नका गजबजूं ।
प्रीतीच्या स्थळीं भाषण बोलावें उजू ।
आज्ञेंत सिद्ध मी उभी राहातें मागें पुढें ।
पुण्याई सबळ यशवंत माझे चुडे ।
थोरासंगें दुर्बळास पाणी चढे ।
सांपडे वस्तु आंधारीं न मिळतां जशी ।
किती सांगूं स्वहित नित हितगुज तुमचेपशीं ।

हा ढग वळला मज झालें मेघाकृति ।
पदोपदीं विनंत्या किती करूं आवृत्ति ।
मोहिलें रुपाकडे चित्त चंचळ या कृति।
जळो माझी दृष्ट लागेल मुखचंद्राप्रती ।
कोणती सवत अशी मजवर चढ भेटली ।
नवी नवी बरीच कीं तिची गोडी लागली ।
हें शास्त्र आवडतें रीत सांगा कोठली ।
गांठिविली वस्तु श्रम केल्या जातीनिशीं ।
किती सांगूं स्वहित नित हितगुज तुमचेपशीं ।
संताप श्राप हा माफ करावा मशी ॥ २ ॥

## लावणी १७ वी.

चाल ॥ पती गेले हो माझे काठेवाडी ॥ गिरनार अबूच्या पहाडीं ।
चाल दुसरी ॥ सजनारे मुख भरून बोला गोड ।
अन्योन्यामधीं काय जोड ॥

जसी संसाराची भुळवाणी । होशील कधीं शाहाणी ॥ ध्रु० ॥
जशा नवराची मी खुजीरा । माझी भुई फारच खुशीरा ।

वयात मिजवर पती मजपुन दूर निजे। पाहून परनारीवर रिझे।
जीव हा लाहीवाणी भुजे। माझें रंगत तिळ तिळ झिजे।
बाळक लई तान्ही।
आतां संसाराची धुळधाणी। होशील कधीं शाहाणी ॥ २ ॥
लग्नाआधींच मी गर्भिण। एकनळ मुलगे झाले तीन।
त्यावर प्राणपतीचें मन। बाळक लई तान्ही।
आतां संसाराची धुळधाणी। होशील कधीं शाहाणी ॥ ३ ॥
अशीग मी संसारी एक तुका। खर्च नाहीं केला रुका।
भुलविले जन पाहती टकमका। विठ्ठ परशराम गुण वाणीरे।
वयांत फारच लहानी।
आतां संसाराची धुळधाणी। होशील कधीं शाहाणी ॥ ४ ॥

## लावणी १८ वी.

चाल ॥ साजुक नाजुक कळ्या पिवळ्या गुंफीन आप हस्तकीं ॥
प्राणविसाव्या बैस मंचकीं तुरा खोवीन मस्तकीं ॥
सवती सवतीचा कज्जा लाऊन तुम्हीं देतां स्वामीराया।
लाऊन मुखीं आडवारे हस्त नाहीं तुम्हां तिळभर माया ॥ध्रु०॥
मी वचनाची खरी इमानी लक्ष तुझे चरणांजवळी।

उत्तराशी प्रतिउत्तर नाहीं तुह्मा कोण्याकाळीं ।
सवतीला तुह्मीं जवळ घेतली मला ठेविलें दूर महालीं ।
नित्य उठून रात्र पहाट बसविली रोज तुह्मीं तिजवर पाळी ।
चाल ॥ अशी काय आवड जिवलगा तुह्माला तिची जी ।
मज मागून केली तीच झाली प्रीतीची जी ।
गोरी गोमटी आवड तुह्मां सवतीची जी ।
कळ लाऊन तुह्मी देतां बसतां पलंगीं गंजिफा खेळाया ।
लाऊन मुखीं आडवारे हस्त नाहीं तुह्मां तिळभर माया ।
सवती सवतीचा कज्जा लाऊन तुह्मी देतां स्वामीराया ॥
लाऊन मुखीं आडवारे हस्त नाहीं तुम्हां तिळभर माया॥ १॥
बोले दुसरी ऐक जिवलगा गोष्ट सांगतें तुझ्याशी ।
वडील झाली ह्मणून कां तिंदां टाकून बोलल सवत मशीं ।
ही ह्मणते मी फार चांगली हिचें गोरेपण इजपाशीं ।
जरी मी अमंगळ असलें चांगुलपण नाहीं दावीत कोणाशीं ।
चाल ॥ ही मलाचि ह्मणते तूंच पती फितविला जी ।
कांहीं करून चेटक करणी मनीं मथविला जी ।
सवतीनें कसा पतिराज सुती सुतविलाजी ।
बारागळीं गुतविला लावलें मला मंदिरीं झुरवाया ।
लाऊन मुखीं आडवा हस्त नाहीं तुह्मां तिळभर माया ।
सवती सवतीचा कज्जा लाऊन तुह्मी देतां स्वामीराया ।
लाऊन० ॥ २ ॥

## लावणी १९ वी.

चाल ॥ रुंद छातीवर बुंद गेंद जणू गुलाब बहारामधीं फुलती ।
वसंत काळीं कळे कोंवळे तसे तुझे जोबन खुलती ।

प्रभाकर.

असल जरदी घोडी भिवरथडी वर बसली चांदणी ।
कानकळाशी फेरफटक्यामधीं कोणी तरी दिली आंदणी ॥ ध्रु० ॥
जडीत जोहार ल्यालीं आंगावर नवी बवतीचा नवा ।
चाळे रुमझुम पाईं छुम छुम बोलती जणू चिमणीचा चिवचिवा ।
चोळी अंजिरी जरी काठाची रंग कटारी नवा ।
कवळी कर्दळी पिवळी कांति मृदु मिन्याचा रवा ।
चिरी कुंकाची बारीक निढळीं घाम आला उवडवा ।
नेत्रीं अंजनी चित्रीं बाहुल्या पाहुनि आवडली जीवा ।
दोही बोटीं मुद्रिका दाट हातीं लखलखाट झळकती चुडे ।
वर नीळ पाचुचे खडे ।
रस्त्यांत उभी जाऊन नटून जशी वीज तुटून कडकडून पडे ।
फांकली प्रभा चहूंकडे ।
मनसुबे करुनिया सुभे राहिले उभे तुजसाठीं गडे ।
झाले गर्द निशामधें वेडे ।
कोण्या हौशाची गजगामिनी रंभा उर्वसी पुढें काय उणी ।
फिरवी गरगराट नेत्र धुनी ।

आरोपार केली जखम जिव्हारीं दुणी । घालून अक्षई
    तुजसाठीं धुणी ।
वाटतें तप करावें बसून वनीं ।
हांसून बोलतां दंत झांकिती जशा चुन्याच्या कोंदणीं ।
अस्सल जरदी घोडी मिवरथडी वर बसली चांदणी । कान०॥१॥
गेंडापट्टा गेंद जोडया रेशमी फुंदणी लाऊन तिला ।
शिरीं किसखापी कलगी मोराची मिना वरून फिरविला ।
जीन मखमाली नक्षी कलाबुत चार नाम ठेविला ।
तक्र थांबेना पळभर भूमीवर सडकेचा दुलदुला ।
सजऊन मजऊन नीट नेटकी अमोल चढली मोला ।
सरंजाम वर तसाच कंठा कोणी नजराणा दिला ।
सरसाऊन पदर नीट घेऊन ।
स्वार वर होऊन बनून फाकडी । मस्तकीं मुदराखडी ।
पुढें शिलेदीचा थाट सभोंवता दाट पाह्याला उडी ।
राहिले उभे चढवडी ।
गोरे गाल कीं ही फळ गुलाबी गाल रंगली विडी ।
नाजुक फुलांची छडी ।
परतु आलों हेत मनामधें धरून । सखे राहिलों रूपाला झुरून ।
क्षणभर उभी राहे बोल सुख भरून । व्हावें बोलणें कशाला दुरून ।
बेडौल जीव पण जिवाशीं हिरून । गडे ती घडी येईना फिरून ।

जसा सर्पानें प्राण अर्पिला मैलागिरीचंदनीं ।
कानकळाशी० ॥ ॥ २ ॥
फुलबागेची थेट खेट केली प्राणसख्या प्रियकरा ।
मागुनया तुम्ही बसून सदनीं करून जाता खरा ।
गेले घुलकावित घोडी फाकडी चळवाचा फटकारा ।
रसजुक जागा पाहून उसरले जसद अरास करा ।
वसंतकाळीं ऐन उन्हाळा राजविलासी खरा ।
केशर कस्तुरी गंध उगाळून नक्षी तबकडी भरा ।
बे बहार गुलाबी तरू । मोती सरू चंपक मोगरा ।
डवना मरवा गुलतुरा । वाळागीर पडदे आणवा ।
मंडप ताणवा कनाती चिरा ।
शिडकावा विलासी करा । मधें बैठक गुणगंभिरा ।
राजअंबिरा सगुण सुंदरा । पाहतसे मार्ग भिरभिरा ।
रंगाचे हौद गहिरे भरून । उडती कारंजीं फुगारे धरून ।
स्वारी सजनाची देखली दुरून । अवघें चित्त मन गेलें हरून ।
केली ईश्वर इच्छा पुरून । टाकी लिंबलोण उतरून ।
पाहून तुझा मुखचंद्र राजसा सुटले बहु बंदणी ।
कानकळाशी० ॥ ३ ॥
हेत बेत संकेत होता तो आला उभयतां घडून ।
करून गडे बागे सभवतीं पडदे चिकाचे सोडून ।

रंग खेळणें झालें आनंदें करी अर्जी कर जोडून ।
निज अंकीं बसवावें राजसा निःशक्ति गेली भिडून ।
अबेदार उंच मसंती पातळ हातीं दिली घडी मोडून ।
पानें गंबेरी पुढें ठेवितसे तपकामधीं निवडून ।
चारी प्रहर क्रमिली राता । राजीवनेत्रा ।
कामामधीं मोहिला चतुर गुणनिधी । झाली इच्छा मनची पुरून ।
बोला सुख भरून पार बहुनदी । न्या उतरून मजला आधीं ।
करी विलास नानापरी उभी गुलपरी नमूनया पर्दी ।
कर जोडून सेवेमधीं ।
जसा हे पक्षाच्या तयापरी । ठेऊन राहिलें सख्या तुजवरी ।
नामी विठ्ठलचा नक्षा दुरी । परशराम थेसू नित्य वर्णन करी ।
वास्तव्यस्थळ दक्षिण गोदेतिरीं । पांचा कोसांचा छट्टा दुरी ।
रामकृष्ण गुणी रामा गातो स्वर अक्षरें बांधुनीं ।
[illegible] फेरफटक्यामधीं कोणी तरी दिली आंदणी ।
[illegible]० ॥ ४ ॥

## लावणी २० वी.

चाल ॥ धन्य ईश्वराची कळ ऐक सकळ मन मोकळें ।
[illegible] चंद्र रवी झाकळ । जी जी ।

[illegible] गुलपरी । गेंद दोन उरीं ।
[illegible] सुरी । जखम केली पुरी । ध्रु० ॥

पाहून मुखचंद्र कळा । रेखिला टिळा ।
दुल्लड मोत्यांची गळा । स्वर कोकिळा ।
नेसुनि जरी सोनसळा । रंग पिवळा ।
गोरी कांती करी झळाळा । बहार कोंवळा ।
पोषाग नवे नित्य करी । कंचुकी उरीं ।
नयनांची खोचली सुरी । जखम केली पुरी ।
छबीदार सुरत गुलपरी । गेंद दोन उरीं । १ ॥
जन नाकेबंदी करून । दुरस्ता भरून ।
पहावया मार्ग तुझा धरून । राहीं चाले दुरून ।
कशी चपळा तुटली वरून । उदेला अरूण ।
धरी घोळ निऱ्या आवरून । पदर सावरून ।
जडविल्या चुन्या बेसरी । करून कुसरी ।
नयनांची खोचली सुरी । जखम केली पुरी ।
छबीदार सुरत गुलपरी । गेंद दोन उरीं ॥ २ ॥
डुब डागिन्यांत खुप सजून । रूपाका रिझून ।
सारी सभा राहिली थिजून । मनीं गजबजून ।
सौंदर्य खाण दुसरी । उमज अंतरीं ।
नयनांची खोचली सुरी । जखम केली पुरी ।
छबीदार सुरत गुलपरी । गेंद दोन उरीं । ३ ॥
शरशब्द वर्मी भेदले । चित्त वेधलें ।

तुझी कोण कुठले शोधिले । हें उत्तर दिधलें ।
शिव सांब आराधिलें । म्हणून लाधलें ।
चित्तवृत्ति मन बोधिलें । काय साधलें ।
बिलकुल लक्ष तूं धरी । बोध अंतरीं ।
नयनांची सोचली छुरी । जखम केली पुरी ।
छबीदार सुरत गुलपरी । गेंद दोन उरीं ॥ ४ ॥

## लावणी २१ वी.

चाल ॥ केशवकरणी अघटित लीळा नारायण तो कसा ।
जयाचा सकळ जनांवर ठसा ॥
वाहिली ती गंगा राहिलें तीर्थ मग आतां तरी होय शाहाणा
कारे घर वर्जिलें वैसाना ॥ ध्रु० ॥
नसून वय बरोबरीचें पाहतां ।
माझें रूप पाहुनी भाळलास तुझे हातीं कोणी गुळ दिला होता ।
विषय तुला आधीं ठाऊक नवता ।
सारे गांवभर तुझी काय बिशाद कशी येईल हातां ।
चाल । फिकरे नको माझ्या भवता भवता ।
भाळलास पंच टाकून ममता तूं कां वर्जिलें गणगोता ।
करून शाहाणा । वाहिली ती गंगा राहिलें तीर्थ मग आतां तरी
होय शाहाणा । कारे घर वर्जिलें वैसाना । वाहिली० ॥ १ ॥
नसून वय सोन्याच्या बाहाया ।

झालें उतरट वय नाजुक पुतळी येती नज जन पाहाया ।

* * * * * *

* * * * * *

चाल ॥ पुरवलें तुला सल्ले द्याया ।
मजवर तुझी काय छपराची छाया ।
तुझें मन रुतलें परठाया ।
त्यामधीं माझें काय गेलें वाया । गरजी कलीवर माया ।
हातीं अन्न । वाहिली ती गंगा राहिलें तीर्थ० ॥ २ ॥
आढळ प्रीत चालवणें तुजला ।
ज्या कोणी मिळे तुला जी नवीन तसाच राहा निजला ।
चाल ॥ धरूनि मी नको राहूं अनबुजला ।
आहे कीं नाहीं सांग तडका तोडती ।
विषकी गडी मनांत गजबजसा ।
झाली आग जसा पापड भुजला ।
कोणी तरी समजावा याजला ।
चतुर शाहाणा । वाहिली ती गंगा राहिलें तीर्थ मग आतां० ॥ ३ ॥
नारी ग तूं शिंदीचें झाड ।
तळ कोकणची असे ताड । मी नको करूं मन मोड ।
हासून तुझा शब्द काय गोड ।
जन निंदील निंदूदे करूस दाव गाढवाचें घोडें ।

चाल । कवीरे नामें विठ्ठलचे तोड ।
परशराम बेसू करी निवड । रामकृष्ण रामाची जोड ।
पाहून पैना । वाहिली० ॥ ४ ॥

## लावणी २२ वी.

चाल ॥ लाडे लाडे येतें मनरंजना । उचलुन कडेवर कां घ्याना ।
मज पुतळीच्या हारा । भरलास रागेरे फंदी शिरा ॥ ध्रु०॥
अंतर काय पडलें सांगा मला । मज कलगीच्या लाला ।
कधींही मी अडलें तुला ।
माझ्या गुलाबाच्या फुला । येतां जातां मशीं तूं बोल शिरा ।
मज पुतळीच्या हारा । भरलास रागेरे फंदी शिरा ॥ १ ॥
मजपुतें घेऊन आपल्या मांडी जवळ।मुखडा पाहीन मी निवळ।
पंचप्राण तुम्ही माझे केवळ । असें वाटतें घालावी कवळ ।
इच्छा मनची करा हेतु पुरा । मज पुतळीच्या हारा ।
भरलास रागेरे फंदी शिरा । मज पुतळीच्या हारा ॥ २ ॥
यावंताची आशा मोडूं नका । गडे माना दिलभर सखा ।
घेऊन तुम्ही मजका मुका । प्रीतीनें घ्याया माझा मुका ।
मेलें मी बरोबर नखऱ्यानें शिरा । मज पुतळीच्या हारा ।
भरलास रागेरे फंदी शिरा । मज पुतळीच्या हारा ॥ ३ ॥
माझ्या ह्या बिछोण्या पाहा जशा।चिरा उसळा माझा राव तशा।
घेऊन तुम्ही पलंगावर बसा । चौऱ्यायेशीं आसनें कसा ।

नामीं विठ्ठलचे छंद शिरा । मज पुतळीच्या हारा ।
भरलास रागेरे फंदी शिरा । मज पुतळीच्या हारा ॥ ४ ॥

## लावणी २३ वी.

चाल ॥ अशी काय अपराधी मी सख्या झालें ।
नाहीं स्पर्श कराया आज पलंगावर आलें ॥

तुरेवाले.

धावा धावा सख्यानो धावा।कोणी प्राणवल्लभाप्रती आणून मशीं दावा।
ईश्वरें दिलें रूप तारा । रूप लावण्याची नवाळी वर्षे बारा ।
वाहतसे नेत्रीं जळधारा । कोणी मंद मंद मशीं घाला शीतळ वारा।
रंगमहालीं होतो उपवारा ।कोणी प्रियकर आणवा राजेंद्राचा थारा।
श्रृंगार कशाला व्हावा । कोणी प्राणवल्लभाप्रती आणून मशी दावा ।
धावा धावा सख्यानो धावा।कोणी प्राणवल्लभाप्रती आणून०॥ १ ॥
जातसे समय ऋतुसंधि । वय नूतन माझी कवळी कळी ।
जाडुंदी श्रृंगार कंचुकी आधीं ।
कोणी झीट झिटकरून काढा शिशी फुल बिंदी ।
चंद्र चकोर जशी बंदी ।
यापरी भाव किती पाहतां खोली रुंदी ।
विष भरून आणून पुढें ठेवा ।
धावा धावा०॥२ ॥
चौताळावर जुमखाने । ठाईं ठाईं बैठका जडित मिन्याचे ऐने ।

उभे थोर जनलोक शाहाण्या पुढें सेवकजन हुद्देवाले ।
टिळा कस्तुरी गंध केशरी घामानें ओलें झालें । दिलें चोपुन ।
रूप चांदाचा टुकडा मुखडा पाहून मन धालें ।
आमदाबाद कीं शहर बडोदें पुसा कोठील राहणेवाले ॥१॥
कडें तोडे कुल जडाव अगदीं अबदागिरीची वर छाया ।
जसा आभाळीं सूर्य झांकला रिघाव होईना मुख पाह्या ।
हुन्नर लढवा ठरवा बरवा जागे सख्यांनो लवलाह्या ।
त्वरें आणागे फंदी फाकडा एक रात्रीं महालीं राह्या ।
कबुल सुरत म्हणून तन भुल झाले अर्पण केली ही काया ।
कट्टून मरावें पहा यशाच्या कीर्ति उरल्या मागें गाया ।
लाल नैन दोन्ही तारे चमकती विषयाचे घोकून भाले ।
कोणी जगवा ।
रूप चांदाचा टुकडा मुखडा पाहून मन धालें ।
आमदाबाद कीं शहर बडोदें पुसा कोठील राहणेवाले ॥२॥
एकीपुढें एक जलद धावती एक्या जाबामधीं केली अर्जी ।
मुकाम ठरऊन आलें सांगाया प्रसन्न झाली मज मर्जी ।
सरंजाम आधीं पुढें पाठविला तूप साकर मैदा सोजी ।
मान करी तुम्ही पांचे मुशाफर गरिबाची भाकर भाजी ।
हार गजरे गुंफून ठेविले शेज फुलांची केली ताजी ।
कधीं दिस जाईल रात्र होईल देह दानावर उदार जी ।

थाट करून मी वाट पहातसें पडदे चिकाचे करून खुले ।
बसर्फी लाविले गलासे जिकडे तिकडे उजाले ।
करी आरास ।
रूप चांदाचा टुकडा मुखडा पाहून मन धालें ।
अमदाबाद कीं शहर बडोदें० ॥ ३ ॥
महालीं आला खुप झोकाखालीं वदनीं सुवासिक घेऊन विडा ।
मन आळशावर गंगा वळली ऋणानुबंध पहिला जोडा ।
सन्मानानें मंचकीं बसविला समसमान मजला जोडा ।
स्वस्थ असा राजसा कल्पना चित्तांतील अवघी सोडा ।
नामी विठ्ठल परशराम म्हणे एक भाव मनीं करून धडा ।
रामकृष्ण गुणी रामा गातो ऐकुन नवशिक मनीं झुरा ।
वाची गांव राजाची जागा कविरवास जन मानवले ।
नामी मूळचे ।
रूप चांदाचा टुकडा मुखडा पाहून मन धालें ।
अमदाबाद कीं शहर बडोदें पुसा कोठील राहणेवाले ॥४॥

लावणी २५ वी.

[illegible] । यांना पेच ठरवा राव सवाई बनशी माझा हेत पुरवा ॥
[illegible] हो बंगल्याचा । राव मनशी पुरवा हेत राव मनचा ॥ ध्रु० ॥
[illegible] घराईत सख्यारे बाळपणची । पुरवावी हौस मनची ।
[illegible] पेच त्याची । सांगावी रे सजणा हौस माझ्या मनची

द्या मुका मज लाडकीचा । आज बेत कराहो बंगल्याचा ।
राव सवाई बनशी पुरवा हेत राव मनचा ॥ १ ॥
पोशाक कराहो गुलाबी । महेश्वरचें पातळ द्यावें मजला कुसुंबी ।
पलंगावर करवा नरम परांची गादी । आरसे महाल नक्षी खांबी
चित्तापासुन मी तुह्मास दावीन खुबी। किती आर्जव करुं मी तुमचा।
राव सवाई बनशी पुरवा हेत राव मनचा ।
आज बेत कराहो बंगल्याचा । राव सवाई बनशी ॥ २ ॥

## लावणी २६ वी.

॥ चाल साधी ॥

शब्द लागतो गोड पुरे धन दवलत कशाला । ध्रु० ।
सजण करावा गुणी कीं इच्छित होतें मनांत ।
बसुनि राजमंदिरीं माडीवर तिसरे खणांत ।
तुह्मी एक भोगी पुरुष माहित नवतें जनांत ।
ह्मणून लाविलीस प्रीत लुब्धलें मी तरुणपणांत ।
चाल ॥ पाहुन तुझ्यारे प्रीतीचा सुटला चळ ।
तुह्मी स्वरूप सुजाळ बहु दिसतां निर्मळ ।
मीं चित्तापासुन तुह्मा घातली गळ ।
तुह्मी सिंधू मी सरिता लुब्धलें मी तुमच्या ठशाला ।
शब्द लागतो गोड पुरे धन दवलत कशाला ॥ १ ॥
कदां सोडिना सख्यारे तुह्मी वृक्ष मी साउली ।

कम कावले यक्ष सख्यारे तुम्ही नेत्र मी बाहुली ।
तुम्ही प्राण मी कुडी माया पुरती लाविली ।
मिळऊनया चंदन प्रीती जनलोकां दाविली ।
तुम्ही हकिम माझे मी तुमची रयत ।
तुम्ही तीर मी कमान कसल्यानें मोहित ।
धन्य भाग्य माझें हें पुरलें संचित ।
तुम्हासारखा पुरुष नाहीं कुठें दाही दिशाला ।
छंद लागतो० ॥ २ ॥

## लावणी २७ वी

॥ चाल साधी ॥

कसा मशी टाकून गेला बाई ऋतुदिवसांत गे ॥ ध्रु० ॥
मशी नवतीचा पूर आंगीं भरलासे ।
आज उद्यां येतील म्हणुनि दम धरलासे ।
कोण्या सवतीचे गृहीं अनुसरलासे ।
टाकुनि उठलें पलंगीं मदन ग सातगे ।
बाई मशी टाकून गेला ऋतुदिवसांत गे ॥ १ ॥
दिस जातो इकडे तिकडे रात्र सरेना ।
पती विनोदाच्या गोष्टी कदां विसरेना ।
येऊन हंस मोतीचारा चरेना ।
काय काय कमी झालें बाई नवसांतगे ।
कसा मशी टाकून गेला बाई ऋतुदिवसांतगे ॥ २ ॥

## लावणी २८ वी.

चाल ॥ दैवानुसार गांठ पडली देवभक्ताची ॥
तोडाल प्रीत तर आण माझ्या रक्ताची ॥
माझे पंच प्राण लागले सख्या तुजपाशीं ।
प्राणावर झालें उदार अहो गुणराशी ॥ ध्रु० ॥
प्रीत चंद्र चकोरापरी अंतरीं ध्यातां ।
जीव झाला बावडी तुला न दृष्टी पाहतां ।
परभारें वांकडे दुरून दुरून कां जातां ।
विष अमृताचें केलें भासलें चित्ता ।
चाल ॥ यास्तव मी पडलें झुरणी ।
रात्रंदिस तुमच्या स्मरणीं ।
वाटतें मरावें मरणीं ।
भाळलें रूपाला पाहून जशी मधमाशी ।
दे अभय दान बेमान होऊ नये गुणराशी ॥
माझे पंचप्राण लागले सख्या तुजपाशी ।
प्राणावर झालें उदार अहो गुणराशी ॥ १ ॥
तुम्ही कल्पवृक्ष जरी पाहून शीतळ छाया ।
कल्पिल्या कल्पना अवघ्याच गेल्या वाया ।
मन निर्दय निष्ठुर कठीण केलेस राया ।
कडेलोट करून मशीं जातां परक्या ठाया ।

चाल ॥ कोण विवशी मिळाली तुजला ।
मजहून बरी तिशीं रिझला ।
खरें सांग सख्या कां थिजला ।
चंदनापरिस देह झिजला लक्ष तुजपाशीं ।
प्राणावर झालें उदार अहो गुणराशी ॥ २ ॥
नवी नवतीचा भार आंगीं आला रस पाडा ।
एकांतीं चला सुखशयनीं कल्पना सोडा ।
तुम्ही राजहंस मी हंसी नाजुक जोडा ।
आपली संगत घडली पूर्वीचा तोडा ।
चाल ॥ हीन धरम हातीं धरल्याची ।
नारकिया पदरीं मरल्याची ।
अपकीर्ति मागें सरल्याची ।
अब काम बस घ्या पदरीं मज गरिबाशी ।
प्राणावर झालें उदार अहो गुणराशी ॥ ३ ॥
एकांतीं क्रिया ज्या केल्या मनोमन गाही ।
जसे मद्याचा वरले पक्षी दुजें स्थळ नाहीं ।
समजला चतुर फाकडा आपल्या देहीं ।
नवला आलिंगून ठाई परी रचलाही
॥ चाल॥ एकचित्ती होऊन रस झालें ।
वाणी विठ्ठल कवीच्या बोले ।

गाती परशराम सुरताले ।
रामकृष्ण रामा वावीवाले ।
छंद चवमासी । चहूंकडे ठसा आहे महाशूर [illegible] ।
माझे पंच प्राण लागले सल्या तुजपाशी ।
प्राणावर झालें उदार अहो गुणराशी ॥ ४ ॥

लावणी २९ वी.

अरे चाल दूर होय क्रिया नष्टा ।कळलें तुझें ज्ञान [illegible] । ध्रु० ।
तुझ्या बुद्धीस भ्रंश पडला । हिरा म्यां [illegible] ।
अंतरीं खोटा निवडला । राजहंस मनीं जडला ।
कावळ्या दूर मेल्या भ्रष्टा । अरे चाल क्रियानष्टा ।
कळलें तुझें ज्ञान० ॥ १
आगे आम्ही म्हटलें चतुर तूं नार । कपटी ह्रदयांत निवड[illegible]
घडी पैठणी आणूं गुलजार ।तुझ्या सेवेची दासी [illegible] ।
मान कर, नको करूं चेष्टा । अरे चाल क्रियानष्टा ।
कळलें तुझें० ॥ २ ॥
तुझ्या शरीराची येती दुर्गंधी । फुगीर दोडका [illegible] ।
डोईला जाळें तुटकी चिंधी । दोन प्रहराची [illegible] ।
छंदी तूं नको पडूं नादिष्टा । अरे चाल क्रीया नष्टा ॥
कळलें तुझें ॥ ३ ॥
आगे आम्ही फंदी फाकडे गडी । पाहिल्या नारी [illegible]

## लावणी २० वी.

चाल॥ पती गेले हो मेले माझे काठेवाडीं । गिरनार अबूच्या पहाडीं

पोषाख जरीग जरबाब करुनियां जरा न वर पाहसी ।
मुखडाग तुझा धुंद सदा कैफांत धुंद राहशी ।
पोषाख जरी०॥ ध्रु०॥

निर्मळ मुखडा चंद्राकार । सरळ नाकाची शोभती धार ।
घडविली नाकीं नथणी झुमकेदार । वर चमचमाट सरजे चार ।
नेसली पातळ उंच जरतार । गळ्यामधीं नव पदरांचा हार ।
कंठ कोकिळा विण्याची तार । सणासण मारी नैनाचे मार ।
जखम विषयाची काळजापार । गडे ते समयींच होतो ठार ।
अशी लक्षांमध्यें निवडली नार । पाहती परस्परें जन सरदार ।
मूर्त निर्मितां धन्य करतार । किंवा उर्वशीचा अवतार भाग्य त्याशीं ।
पोषाख जरीग जरबाब करुनियां जरा न वर पाहशी ।
मुखडाग तुझा धुंद सदा कैफांत धुंद राहशी । पोषाख० ॥ १ ॥

मोती दैवाचें खातो हंस । त्यावर नाहीं कोणाचा धऊस ।
अशी एक जन्मली वस्तु ही धऊस । ठरा मळ्वाचा खचला पाऊस ।
केवळ पद्मिनीचा अंश । तुशीं लपटावें वाटते हौस ।

अति विषयाचा झाला भ्रंश । कांहीं तरी शंके करसी ।
पोषाख जरीग जरबाब करुनियां जरा न वर पाहसी ।
मुखडाग तुझा बुंद सदा कैफांत धुंद राहशी ॥ २ ॥
सुरत फाकडी नादर आजवा । सुकृत जन्मांतरींचा ठेवा ।
पूर्ण हरीचीं केली सेवा । तें फळ प्राप्त झालें दैवा ।
अवांतर नारी करतील हेवा । तारुणपण हा उघडा मेवा ।
परहातीं पडल्यावर मेवा । अशामधीं कांहीं विषूक करावा ।
झुरा बावरा पाहून वरावा । खुप शत्रूचा गर्व हरावा ।
जैसा मैतांशीं लंपट रावा । जिकडे तिकडे होईल वाहवा ।
प्राण प्रियकर भेशील जेव्हां । जिवांत जीव घालशील तेव्हां ।
ब्रम्हाणपुरी पोषाख नवा । किती घुंगट घेशी ।
पोषाख जरीग जरबाब करुनियां जरा न वर पाहशी ।
मुखडाग तुझा बुंद सदा कैफांत धुंद राहशी ॥ ३ ॥
चंदना परी देहींचा सुगंध । निपट सकुमार केळीचा कंद ।
चुडे हातीं गजरे बाजुबंद । रुपानें चांगट रसिक मंद ।
पाहून जनलोकांशीं आनंद । तुझा लोकांशीं लागला छंद ।
नजर लोकांची झाली मंद । वाटतो तुशीं करावा फंद ।

[illegible] राहशी ।
मुखडाग तुझा बुंद सदा कैफांत धुंद राहशी ॥ ४ ॥

## लावणी २१ वी.

चाल ॥ रुंद छातीवर बुंद गेंद जणू गुलाब बहारामधी फुलती ॥
वसंत काळीं कळें कोंवळें तसे तुझे जोबन खुलती ॥ प्रभाकर ॥
कसून तीर नेला उराशीं नवळी गवळी जशी नागन ॥
प्राणवल्लभे उभे तुसाठीं प्रभे नभाचें भरलें गगन ॥ ध्रु० ॥
कटी बारीक वेताची जशी बोंथाटी देखणी सरळ सडक ।
दाही बोटें रंगविली मेहंदी अनवट बिचवे पाईं कडक ।
गोलदार हिरवी सेलारी नागपुरी नेसुनी भडक ।
तंग चोळी अंजिरी आंगामधें गच्च गदली खातसे तडक ।
उटी लेऊन बाजुबंद बाहुट्या मोठ्या मोठ्याच्या झडी सघन ।
कसून तीर नेला उराशीं नवळी गवळी जशी नागन ।
प्राणवल्लभे उभे तुसाठीं प्रभे नभाचें भरलें गगन ॥ १ ॥
पाईं रुळे मंजुळ साकळ्या घोळ सिन्याचा वासकरी ।
थरक मुरक नैनाचे मारशी तरतरीत दोन्ही गेंद उरीं ।

प्राणवल्लभे उभे तुसाठीं प्रभे नभाचें भरलें गगन ॥ २ ॥
मस्तकीं मुद राकडी फाकडी चापचोप मधें सदा ।
हास्यवदन जशी मदनपुतळी ठुमकत चालण्यांत सदां ।
बरशी सरशी मारी नैनाची पाहून हजारो अलम फिदा ।
रस्तोरस्त मिळे तुज पाहती जन सोडूं हुद्दा ।
सारी सेना गजबजली विजली जैसी लावी आगन ।
कसून तीर मेला उराशीं नवळी गवळी जशी नागन ।
प्राणवल्लभे उभे तुसाठीं प्रभे नभाचें भरलें गगन ॥ ३ ॥
घडो संग तुज फंद पडो हा हेत मनाचा पुरल कधीं ।
वेड लागलें जसें राजसे कसें करावें सांग आधीं ।
भर्मा भर्मी वसीं बोलतों जिवांत जीव घालशील जधीं ।
अभय भाष जर देशी खुशीनें पल्लेच साकर वाटूं तधीं ।
नासीं विठ्ठल परशराम ह्मणे जिवीं जिवाशीं लावी लगन ।
कसून तीर मेला उराशीं नवळी गवळी जशी नागन ।
प्राणवल्लभे उभे तुसाठीं प्रभे नभाचें भरलें गगन ॥ ४ ॥

हेत धरून मनीं आलों पहाया भटकर बांधा खुजा ॥ ध्रु०॥
दंत दाळिंबेचे दाणे त्यावर दांतवणाच्या चिऱ्या ।
नैन चकोर गरगराट फिरविती लक्षिण जैशा सुऱ्या ।
सरळ नाक राव्याची चोंच मोती नथणीच्या तुऱ्या ।
शिशी शोभे मुखचंद्र राजसा सोळा आंगीं कुऱ्या ।
हिरवे पातळ उंच चंदेरी दाट खोविल्या निऱ्या ।
शुभ्र कंचुकी वक्षस्थळीं ही नारंग्या रसभऱ्या ।
सर्व भवताल्या उभ्या बायका थाट हजारो पऱ्या ।
त्याजमध्यें नारी तूं एक मुखरण जशी झगागी हिऱ्या ।
पाहून नेत्र गपगपा झांकती कांठीं चमकल्या विजा ।
हेत धरून मनीं आलों पहाया अटकर बांधा खुजा ।
खणाणी जसा गजघाट असा बोभाट रुपाचा तुझा ।
हेत धरून मनीं आलों पहाया अटकर बांधा खुजा ॥ १ ॥
अवयव आकृति रेखिली व्रातपोत सारखी ।
निवडणार निवडील असेल जो रत्नाचा पारखी ।
कुलपी चुडे करीं हात सर कंकण आरक्त मेहंदी नखी ।

सकळ निकिळ तूं निकोप अगदीं शब्दामध्यें नाहीं चुकी ।
स्वर ऐकून कोकिळा दडल्या गिरिकंदरीं अनबुजा ।
हेत धरून मनीं आलों पहाया अटकर बांधा खुजा ।
खणाणी जसा गजघाट असा बोभाट रुपाचा तुझा ।
हेत धरून मनीं आलों० ॥ २ ॥
कीर्त ऐकिली कानीं त्याहून अगळी तूं शतगुणी ।
नख दृष्टी नापडे घालितां अनंत जन्मीं धुणी ।
किती वर्णावी सीमा रुपाची पाहतां नापुरे धणी ।
झांक जरा मुखचंद्र फाकडे दृष्ट होईल तुज झणी ।
लावण्याची सकळ संपदा सहज उभी नवखणी ।
नेत्र जखाचे शटस्थ पाहुनि घायाळ घुमती रणीं ।
अचेताशीं चेतवशील जरी इच्छा धरशी मनीं ।
महान महाची तपें डाळलीं मारक होशील कुणी ।
चंचळ अचपळ चालक रमणी आम्ही जाणून मूळबीजा ।
हेत धरून मनीं आलों पहाया अटकर बांधा खुजा ।
खणाणी जसा गजघाट असा बोभाट रुपाचा तुझा ।
हेत धरून मनीं०॥ ३ ॥

उभा दंड पर एकच पाणी येरंडा आणि उसा ।
आपल्या मोलानें विकतील खूण चतुराला पुसा ।
परशराम ह्मणे हा काळ निभला शाहिरकीचा ठसा ।
एक अभंगीं गाणें गाऊन येसू करी नित मजा ।
हेत धरून मनीं आलों पहाया अटकर बांधा खुजा ।
खणाणी जसा गजघाट असा बोभाट रुपाचा तुझा ।
हेत धरून मनीं आलों०॥ ४ ॥

## लावणी २३ वी.

चाल ॥ इष्क उजळणी परोपरीची दाविते शरीर वळऊन पुस्ती ।
हात चार इष्काचे आसन चौऱ्याशी लढ्ढू कुस्ती ।
डौल ज्वानीचा फूल गुलाबी रूप नादर गुलपरी ।
पाई जोडवीं खणण वाजे तंग चोळी तरतरी ॥ ध्रु० ॥
थाट नवे नीत होट लाल करी पानें खाउनी सदा ।
असल शहरची राहाणेवाली करी झुरक्यांतून अदा ।
जरी किनारी कोरदार तंग चोळीवर रंग उदा ।

वांचीवशील तर वांचीव कांहीं धावाधावी करी ।
डौल ज्वानीचा फूल गुलाबी रूप नादर गुलपरी ।
पाईं जोडवीं खणण वाजे तंग चोळी तरतरी ॥ १ ॥
सडक पातळ विजना कंबर पीतांबर नेसली ।
न्हाण अलिं असेल अथवा येईल वय इतकी भासली ।
चटी पटी चाप चोपीमधें नवती मुसमुसली ।
दाट बांगड्या पाहती ताऱ्यांच्या भरतां कळ सोसली ।
चाल ॥ मोती भांगांत भरून । करून शृंगार कधीं यशी ।
सखे तुझी वाट धरून । भुलून राहिले कैक हावशी ।
जखम इषकाची चरून । लागली उरीं सुरी जैशी ।
देहभान विसरलों घसरलों झाली आशा पुरी ।
जसा गज हस्ती अंदु लेऊन करी ठाणावर घुरी ।
डौल ज्वानीचा फूल गुलाबी रूप नादर गुलपरी ।
पाईं जोडवीं० ॥ २ ॥
देऊन विसरला रूप हे दाता हातां चढशील कधीं ।
तुझा आपला संग घडल गडे कर ऐसी या मधीं ।

सकळ नायिकांत तू सगुण । गुण रत्नाची खाणी ।
कंठ कोकिळा परी । स्वर ऐकुन पडली मोहनी ।
एक एक तुझे बोल असोल ऐकुन जीव हुरहुरी ।
अशी जयाला वस्तु लाधेल कमाई त्याची पुरी ।
डौल ज्यातीचा फुल गुलाबी रूप नादर गुलपरी ।
पाई जोडवीं० ॥ ३ ॥
इषकीबाज इषकाची दर्दी साज करून होती उभी ।
कबुल सुरत खुप पाहून रिझली छेल छबिला खुबी ।
नजर विडा पाठविला सुचविली अंतर खुण मनसुबी ।
आज रात्रीं या महालीं सखया पूर्ण हेतकर खुबी ।
चाल ॥ करून खूण मुद्राशी । चतुर गुणराशी घरीं नेला ।
आवड मनीं फार होती । मोगिला पुष्पाचा झेला ।
मोगिला भाव धरून नामीं विठ्ठलच्या या बोला ।
अटीतटीच्या जडणा घडणा परशराम नित करी ।
चंग रंग दंग ऐकुन झाले पळाले हरदास तरी ।

धार इच्छेनें आसन चौऱ्यायशी लई कुस्ती ॥
बोल आम्हाशीं झोल नको देऊं तोल संभाळून पाहे पुढें ।
उदार मजवर दुधार आणवा पऱ्हेदार लेऊन चुडे ॥ ध्रु० ॥
लाल आंगावर शाल शोभली मशाल जैशी राजसभे ।
हाट तुसाठीं थाट दुरस्त पहायाला जन दाट उभे ।
जखम जिव्हारीं भकम लागली रकम कानीं सोन्याचे झुबे ।
जर पदराला हातभर त्यावर बहार बहार अंतरीं क्षुभे ।
सजली बिजली थिजली मजालस गर्क पाहून जन वेडे ।
नथ सरजाला सुतीं दाणे गालावरती प्रभा पडे ।
बोल आम्हाशीं झोल नको देऊं तोल संभाळून पाहे पुढें ।
उदार मजवर दुधार आणवा पऱ्हेदार लेऊन चुडे ॥ १ ॥
कवळी नवळी कटांत चवळी पिवळी कांति भुत घेऊन ।
कोण्या सभाग्याशीं अशी खाशी तनमन झालें गर्क पाहून ।
असपास लई सुवास जैसा कोस कोस परिमळा मोहून ।
रंभा कीं उर्वसी उमटल्या चकीतकीं गेली लाजून ।
हलक झाले खलक पाहून माल मवाशानें सुगडे ।







महान महानी तपें ढाळिली जपी तपी फिरती उघडे
बोल आम्हाशीं झोल नको देऊं तोल संभाळून पहा पुढें ।
उदार मजवर दुधार आणवा पन्हेदार लेऊन चुडे ॥ २ ॥
सुरतबिना रंग मिना फिरविल्या मैना जशी बोलें करी ।
हार पुतळ्याचे भार गळाभर जवमाळा वर लेऊन सरी ।
गच्च गजरे पाटल्या दाटल्या आटल्या मोहरा अकबरी ।
धरी आवरुन लुगडें कुच उघडें किंचित् झांकुन पदर वरी ।
चोळी वसंती पसंत केली वसंत पाहून बुद गंडे ।
दोही बोटीं मुद्रिका दाटल्या लखलखीत वर रत्नाचे खडे ।
बोल आम्हाशीं झोल नको देऊं तोल संभाळून पहा पुढें ।
उदार मजवर दुधार आणवा पन्हेदार लेऊन चुडे ॥ ३ ॥
रूप नादर करी आदर सादर भ्रांति ती ठेऊन परती ।
आंगरूप मी छाया राया असूया माया मजवरती ।
चाल सख्या तूं झेल्या फुलाच्या सगुण गुणाच्या मूर्ति ।
स्वस्थ असा राजसा आतां मी दासी पुढे सेवा करिती ।
विठ्ठल नामी मनोरथ झाले मग विकले सोळा पाडे ।
परशराम येसू महादूचे खर अक्षर रूपयांत गढे ।
बोल आम्हाशीं झोल नको देऊं तोल संभाळून पाहे पुढें ।
उदार मजवर दुधार आणवा पन्हेपार लेऊन चुडे ॥ ४ ॥

## लावणी ३१ वी.

चाल ॥ केशव करणी अघटित लीळा नारायण तो कसा ॥
जयाचा सकल जनांवर ठसा ॥

किती तरी छळशील प्राणसख्या ।
तुज मज जन वैरी, । नको होऊं अधीर क्षणभरी ।
येशील किंवा ना येशील असें ।
नाहीं कळलें पुरतें, । परी हें लक्ष तुझ्या वरतें ।
आंगणांत मी उभी राहून ।
मार्ग तुझा धरितें । महालीं आंत बाहेर फिरतें ।
कसा येशील तूं लपून छपून ।
अशी चिंता करितें । देखल कोणी अबरूला मरतें ।
होय निश्चळ गुणी चतुरा । ममाजु घरीं दे फितुरा ।
अझून पहिला प्रहरा । असतील जागे घरचे कोणी ।
हें भय अंतरीं नको होऊं अधीर क्षणभरीं ।
किती तरी छळशील प्राणसख्या ॥ १ ॥
समाचार ना घेशील ह्मणून । आज रागे भरले ।
तूं ना पुसशील रितें भरलें। तुझी खूण तुजला ना समजलें।
याकरितां झुरलें गळालें मांस हाडें उरलें ।
मीच बोलतें उलटी तुशीं । कां मौन धरिलें बरोबर करितां
मन हरलें ।

तुला अति विषयाची आवडी । भोगविलास करून मशीं ।
परी रात थोडी पाहशी नित्य नूतन गोडीं ।
दहा द्वारें पुजशील जेव्हां मग तुजला सोडीं ।
पुससें खूण सांगा एवढी ।
जपु तरी । ॥ २ ॥

## लावणी २६ वी.

॥ चाल साधी ॥

रंग महालावर उभी । खुबी कर छबी उघडल्या सजा ।
कवळी कांत साजणी सकुमार साजणी अटकर बांधा खुजा ॥ ध्रु० ॥
कटी सिंहाची मान आजखा साज केला भरगच्ची ।
डागिन्यांत खुप लुटपुट झाली लवली करदळी जशी ।
दोन्ही भवया कमाना कसून रसून तिर नैनाचे मारशी ।
वाणी उदमी दुकानदार सोडून घरदार पाहाया तुशीं ।
सजदार सजवली सजली बिजली कोण कोणाची अशी ।
रंगमहालावर उभी । खुबीकर छबी उघडल्यास जा ।
कवळीकांत साजणी सकुमार साजणी अटकर बांधा खुजा ॥ १ ॥

B5

A4

B4

गेंद उरावर झोक-नोक आणि शौक उभी रेखली ।
तुटती रुपाचे तारे छनांछन अवचित तुज देखली ।
मज पाहून तनभुल-फुल मखमुल अंजेरी खुली ।
अत्तर लाऊन न्हालीस लटगा कंवर नागीन डुली ।
पान खाऊन रंगेल अधर पदर घे सरसा लाजून जरा ।
✓ बोलणें मधुर स्वर तार विण्याची अमदाबादी तऱ्हा ॥ २ ॥

## लावणी २७ वी.

चाल ॥ केशव करणीं अघटित लिळा नारायण तो कसा
जयाचा सकळ जनावर ठसा ।

छेल छबिला नाजुक मुद्रा उंबर कांहीं एक वर्षांची ।
पुसावी कोण्या हवशाची ॥ ध्रु० ॥
देहकांति कर्दळीचा गाभा प्रभा तिच्या मुखचंद्राची ।
तुच परी कांहीं इंद्राची ।
नथ सरज्याला मोती सुढाळिक शहर सुर्ती बंद्राची ।
किंमत हजार पंधराशाची ।
चाल ॥ शुद्ध दिसे खुप कद्राची । चपळ जैसी साळू इंद्राची ।
पर्वत मेरू मंद्राची । महान महाची लपे ढाळिली एकुलती
एक नवशाची ।
पुसावी कोण्या हवशाची
छेलछबिली नाजुक मुद्रा उंबर कांहीं एक वर्षांची ।

पुसावी कोण्या हवशाची ॥ १ ॥
छडी फुलांची कंबर बारीक पितांबर नेसून नटली ।
जणूं रागना उचिट तुटली । वखेसोनेरी तेज झळाळी ।
हळदीनें केवळ उटली । नवविध कंचुकी तटतटली ।
चाल ॥ चैतन्याची मुस आढळली । अंत कळेना आहे कुठली ।
त्रिगुण गुणाची मती खुंटली ।
ती तालावर नित्य बैठका बिलोरी दोन्ही आरशाची ।
पुसावी कोण्या हवशाची ।
छेल छबिली नाजुक मुद्रा० ॥ २ ॥
अनवट बिचवे पाई पोल्हारे वाक साकळ्या गज अंदु ।
खचित भासली जग भोंदू । अघटित जिचा खेळ दिसेना ।
झांकून चाले मुख इंदु । म्हणे एकली कशी नांदू ।
चाल । अथाक भरले गुणसिंधु । सदांच विषयामधीं धुंदु ।
ठाई पडेना मूळ कंदु ।
वचन फाकडे खुषीनें द्यावें लोभी जात पुरुषाची ।
पुसावी कोण्या हवशाची ।
छेल छबेली नाजुक मुद्रा० ॥ ३ ॥
ज्याजी त्यास लख लाभ असो आम्ही मुशाफर अकल्यारी
पहा बाहुलें जसें भिंतीवर चित्र काढितो चितारी ।
निराजिव सरजिव चितारी । लक्ष घालील काय पथारी

होय साह्य मज आतारी । सीव नदी तीरचा उतारी ।
नामीं विठ्ठल परशराम ह्मणे शिरा धन्या ही हर्षाची ।
पुसावी कोण्या हवशाची ।
छेल छबिली नाजुक मुद्रा उंबर कांहीं एक वर्षाची ।
पुसावी कोण्या हवशाची ॥ ४ ॥

लावणी २८ वी.

चाल ॥ केशव करणी अघटित लीळा नारायण तो कसा ।
जयाचा सकल जनांवर ठसा ॥

चौभोताल्या उभ्या बायका त्यांजमधें नारी तूं जळभरशी ।
नाकीं नथणी करी सरशी ॥ ध्रु० ॥
पदर जरीचा घाटा घेऊन भारानें कदली लवली ।
घोळमिऱ्या आवरून धरशी ।
ठळक हातामधीं चुडे झळाळी डागिन्यांत रुण गवगवशी ।
रूपरसा केवळ हावशी ॥ १ ॥
चौभोताल्या उभ्या बायका त्यांजमधें नारी तूं जळ भरशी ।
नाकीं नथणी करी सरशी ॥ १ ॥
डोल रुप्याचा दोर रेषमी जपून झपून पाणी भरशी ।
देश आमचा प्रांत माळवा मूळ दक्षणचे राहाणारू ।
शहर पुण्याला जाणारू ।
छानछबेली सुरत फाकडी पुढें वसतीमधें येणारू ।

अशी भेट कधीं होणार ।
तुशीं बोलाया भिड ना लोटे जिवा लागली चुरचुरशी ।
डोल रुप्याचा दोर रेषमी जपून झपून पाणी भरशी ।
चौफेताल्या उभ्या बायका त्यांजमध्यें नारी तूं जळ भरशी ।
नाकीं नथणी करी सरशी ॥ २ ॥
लहान पराई उंबर कवळी वर्षे बारा तेराची ।
प्रत्यक्ष आळई बोराची ।
पाहून पराई आलीस पाण्या दिसते कोण्या थोराची ।
बुंद राखडी मोराची ।
पाज आम्हाला शीतळपाणी । धर्म घडेल घडी घडी ठरशी ।
नाकीं नथणीं करी सरशी ॥ ३ ॥
कशी मी पाणी पाजूं तुम्हाला आम्ही नारी गतीं अबरूच्या ।
जन पाहील जाईल रुच्या ।
चतुर सखा मग नेला रंगमहालीं करी विनंती रावरूच्या ।
लक्षपदीं विठ्ठल गुरूच्या ।
रामकृष्ण गुणी रासा गातो छंद तऱ्हेचे चौभाशी ।
नाकीं नथणी करी सरशी० ॥ ४ ॥

## लावणी २९ वी.

रे मी उभी केव्हांची द्वारीं । कर्मिली रात मंदिरांत कोणा शेजारीं ।
रे मी उभी केव्हांची द्वारीं ॥ ध्रु० ॥

तूं दगलबाज बेमाना अरे दुस्माना ।
रे कापिल्या किती एक माना ।
घिरट्या घालून मोहिलेस माझे प्राणा ।
रे घेतलें हिरून देहभाना ।
ही इष्क सुळावरली पोळी आणाकीं ध्याना ।
रे खूप समजलें चतुर शाहाणा ।
सुख नाहीं मला दुःख या संसारीं जाणगे नारी ।
रे मी उभी केव्हांची द्वारीं । कमिली रात मंदिरांत
कोणा शेजारीं ॥ १ ॥
काल घरचे स्त्रियेस दिवस होता चौथा ।
गे गुंतलों सर्व त्याकारितां ।
कार्यकारण रत तिशीं झालों एकांता ।
गे शास्त्रमार्ग केली वार्ता ।
हा वक्त चुकविल्या रुजू नाहीं रे भगवंता ।
रे हें दूषण आपुले माथा ।
हा देह ठेवी जीव तारी अथवा मारी ।
रे मी उभी केव्हांची द्वारीं । कमिली रात मंदिरांत
कोणा शेजारीं । ॥ २ ॥
बरे मोलाचें बोलणें मनीं तुझ्या वसलें ।
रे छिन्न भिन्न अवघे दिसले ।

ममतेचे विचारें काल तुह्मांला मीं पुसलें ।
कपट्याचें कपटपण दिसलें ।
अन्याय झाला तरी मी बोलून फसलें ।
खूण करा समोर मी बसलें ।
खरें किंवा खोटें साक्ष देतील परभारी ।
मी उभी केव्हांची द्वारीं । कर्मिली रात मंदि० ॥ २ ॥

लावणी ४० वी.

भवई कमान भारी अदाची बाण गेली सररखी जगराना ॥ध्रु०॥
शालु रंग लाल वर पिवळी दुशाल तिची तऱ्हेदार चाल ।
सारे जन पाहती भिरभिरा ।
अनारीदार तिची किनारीदार तंग चोळी शहरी तऱ्हा
सुरे मदनांत लाल विडी वदनांत ।
खुप सुख सदनांत जशी कमान लवे करकरा ।
ज्य महिन्यांत उभी होती शयनांत खुप अदाची मारी लहरा ।
चाल ॥ स्वर्गीची जशी अप्सरा । फिरविशी नयन गरगरा ।
उभी राहून बोल कां जरा ।
चाल ॥ दोन्ही गाल मखमूल । करी नवती तुलतुल ।
नारी डुल पडली सारी जनांत ।
भवई कमान० ॥ १ ॥
गजरे बाजुबंद लाऊनी रेशमी गोंडे दोन दोन ।

छातीवर गेंद अंगांत चोळी तडतडी ।
सरज्याची नथ तिची हिऱ्याची जोत खुप आणवा सुरत फाकडी ।
केश सदा सोनेरी ।
वरून काढूनी बुटी जरी नेसून पैठणी शेलारी ।
तिची नवीन मोडली घडी ।
जवाची माळ हार मोती सुढाळ करी टाहो कोयाळ घडघडी ।
चाल ।। ऐकूनी भरली हुडहुडी तुजसाठीं शहरचे गडी ।
झाली कितिक देशोधडी ।
करी शब्दाचा मान । नको सोडूं इमान । तुज पुढें ठेविली मान ।
हा देह जावो भंगना । भवई कमान० ।। २ ।।
चुडा नक्षीदार । वरती तीधारी चाल ।
चाले गजभार फार । नार नटून ।
उठे घनघोर । फिरकी विरोधाला सोर ।
टाकी भुईवर पाय आपटून । तऱ्हेदार थाट ।
लक्ष मनुष्याचा हाट । नाहीं प्रहावयाशी वाट ।
घडोघडीं जन पाहती उठून । खूप झाला धूर ।
दिला ईश्वरानें नूर । जशी नदी भरली एकवटून ।
चाल ।। कैकांनीं पाहिलें झटून । काम येईना कोणाचें पटून ।
गेले आपआपणामधें कटून ।
।। स्वरूपाची तार सारी फेंकून कटार जशी फिरंग दुधार ।

चमकली समरंगणा ॥ भ० ॥ ३ ॥
पती प्रियकर । उभे जोडूनी दोन्ही कर ।
करी क्षमा मजवर । तुह्मी माझे प्राणवल्लभा ।
करी आदर मग धरी पदर । तुह्मी बृहस्पती मी सभा ।
कृपा न्याहाल मशी करा बाहाल । पहा रंगीत महाल ।
मग अवघी दाऊन सभा ।
होऊनी अमळ धरी चरण कमळ देह भावें वंदिलें नभा ।
चा० ॥ विठ्ठल ज्ञानाचा गाभा । ते आलेत पाहून सभा ।
काय छुर्याचा मनसुभा । परशरामाची तोड ।
मोडी बिसणी खोड । जशी घतान्याची मोड ।
कोणी घेईना दुप्पट वजना । तेजी विशारत गध्याशीं टोणपा
तसाच कागागना ॥ भ० ॥ ४ ॥

## लावणी ५१ वी.

चाल । फंदीच्या फटक्याची

मुलाम रूप सोन्याचे तगठ । असें हें जिकडे तिकडे प्रगट ।
चांगुलपण हे पद्मिनीचा मुगुट । सरमोत्याचे भरील काय फुगट ।
नको धरूं शाहाणा बिसणी सगट । पाहुन गुंडा त्याशी लगट ।
आम्ही जरी तुशीं करावी लगट । पोकळ गलका वाजेल जगेट ।
नारी ये समयीं येथून झुगट । स्थळ एकांती येऊनिया बिगट ।
ओळखुन मैलागिरीशीं लगट । अतिशितळा ।

सहज लागतां सुवर्ण मग तरी करशील काय पितळा ।
बरा पहात रुपानें नितळा । जोवर बहार आहे प्रीयकर ।
दिलभार कर पाहून पुतळा ॥ १ ॥
गाल दोनी लाल नारंगी बनात । वय द्वादश नूतन
आली पणांत ।
जशी ताणून चिरली कनात । रुपडें खूप हवई भवनांत ।
राहा विषयाच्या योजनात । तारुणपण जाईल क्षणांत ।
जो कोणी ठसला असेल ध्यानांत । परकरतळा ।
नादर आदरावर नथ चमके आवर जरी पितळ ।
जोवर बहार आहे प्रीयकर दिलभर कर पाहून पुतळा ।
बरा पहा स्वरुपानें नितळा ॥ २ ॥
उरीं दोन्ही गेंद गुलाबी संगीत । वर कंचुकी त्याली तंगतंगीत ।
मुखरण दोचवशाच्या त्युंगीत । पाई पोलारे नाद सारंगीत ।
पटली तुमच्या आमच्या सांगीत । बहु अनिवार
चवळीच्या शेंगेंत ।
पहावी अशी वस्तु वानगीत । द्यावी द्रव्याची तुला ।
जोवर बहार आहे प्रीयकर दिलभर कर पाहून पुतळा ।
बरा पहा स्वरुपानें नितळा ॥ ३ ॥
मी राधा तुम्ही यदुराया । नका कल्पना धरूं तिळप्राया ।
करूं नमन भागिर्थी समवाया । नेला रंग महाली मजा
जरी पाह्या ।

मसालेदार मिठाई खाया । सोडले शत्रु करनिया [illegible] ।
कवि नासी विठल गुरुच्या पाया । प्रसाद [illegible]
गर्जीत राया ।
परशराम लीन हरी गुणगाया । छंदबंद करनिया ।
राहे यावी स्थळां । स्वरूपानें नितळा ।
जोवर बहार आहे प्रीयकर दिलभार कर पाहून [illegible]

---

